

नोंदणी क्र. एफ.१६०९४(मुंबई)




महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com





# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

# नवभारत

डिसेंबर २००६ - जानेवारी २००७

## श्रद्धा विवेक आणि समाज

## विकासाची विविध प्रतिमाने






## 'उत्तर-नव' भारत सुसंवादासाठी







अनुक्रमणिका

# स्वानुभूतीची गोष्ट

भगवान गौतमबुद्धांची एक कथा आहे. गौतम-बुद्धांकडे खूप लांबून अनेक विद्वान, तपस्वी, साधक येऊन, त्यांना आपल्या शंका विचारु लागत. बुद्ध त्यांना म्हणत, 'तुमच्या प्रश्नांची उत्तरं मी कशीही दिली तरी त्यावर तुमच्या प्रतिशंका चालूच राहतील. शंकांना अंत नसतो. त्यापेक्षा तुम्ही माझ्या सहवासात शांतपणानं, न बोलता मौन पाळून रोज नुसते बसत जा. दोन वर्षं पुरी होताच तुम्हाला जे काय विचारायचं असेल ते विचारा. त्याची उत्तरं मी अवश्य देईन.' लोक हिरमुसले होत. कारण त्यांच्यापैकी बहुतेक केवळ उत्सुकतेपोटी, वाद करण्याच्या ईर्ष्येनेच येत. सत्याचा शोध घ्यावा, अनुभव घ्यावा अशी त्यांना आस नसे. असे लोक मग परत जात.

एकदा एक मोठा विचारवंत तत्त्वज्ञानाचा गाढा अभ्यासक, पाचशे शिष्य असलेल्या गुरुकुलाचा प्राचार्य मोग्गलायन, आपल्या शिष्यांसह त्यांच्याकडे आला. वादात आपण गौतम बुद्धाला सहज पराभूत करु शकू व आपल्या आचार्यपदाचा विद्वत्तेचा डंका सर्वत्र वाजेल याची त्याला खात्री होती. बुद्धांनी त्याला विचारलं, 'आपल्याला सत्याचा - त्या परम तत्त्वाचा बोध झाला का? जे आपण सांगता त्याची प्रत्यक्ष अनुभूती आपण घेतली आहे का? घेतली असेल तर त्यावर वाद करून उपयोग काय? कशाकरता ही डोकंफोड करायची? मला त्यात स्वारस्य नाही. आपण सत्याची अनुभूती मिळवली काय ते सांगा.'

मोग्गलायन प्रामाणिक, सत्यनिष्ठ होता. तो नम्रपणे म्हणाला, 'नाही. सत्याची अंतिम अवस्थेची अनुभूती मला आलेली नाही. ग्रंथ वाचून मी फक्त शाब्दिक ज्ञान सांगतो. तर्कसंगत ते असतं. त्यानं प्रतिस्पर्धी हरतो व माझा विजय कबूल करतो. त्याला निरुत्तर व्हावं लागतं.' बुद्ध म्हणाले, 'न पाहता, गंध माहीत

(मुखपृष्ठ क्र० ३ पहावे.)

अनुक्रमणिका








प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ६० । अंक ३-४ । डिसेंबर २००६, जानेवारी २००७
मार्गशीर्ष-पौष शके १९२८
वार्षिक वर्गणी २०० रुपये.
या अंकाची किंमत रु. ४०/-



## नवभारतची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संगृहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोनानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्य-निष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.

* नवभारत, ऑक्टोबर १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील के० शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.



**संपादकीय पत्रव्यवहार :**
संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा).

**व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :**
घ. वा. जोशी
व्यवस्थापक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५ गंगापुरी,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा).

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाने या नियत-कालिकाला अनुदान दिले असले तरी या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी मंडळ व राज्य शासन सहमत असेलच, असे नाही.



अनुक्रमणिका








# नवा धर्म - नवा देव

अजून धर्म स्थापन झालेला नाही. हिंदू-मुसलमान,
ख्रिस्ती इत्यादी, हे धर्म नसून पंथ आहेत.
'प्रथम पाऊली पावविला पंथ!' पहिली पावले टाकण्यासाठी
हे सगळे पंथ निर्माण झालेले आहेत. हे सगळे दिवे लावले आहेत.
सूर्य उगवला नाही तोवर हे दिवे राहणार.
पहिली पाऊले टाकताना आपण अंधारात चाचपडू नये
म्हणून या लहानलहान दिवट्या लावल्या आहेत.
आजपर्यंत खरा धर्म बनला नाही, कारण तो
मानसिक भूमिकेवर राहिला. आता तो
विज्ञानाच्या भूमिकेवर येईल, तेव्हा खरा धर्म बनेल.
विज्ञानामुळे जगाचे स्वरूप स्वच्छ कळेल.

विज्ञानामुळे अधर्म टिकणार नाही, धर्मच टिकणार.
बुद्धीच्या कसोटीवर कसला जाणारा,
मानसिक कल्पना-कामना इत्यादींच्यावर गेलेला,
व जगातले सगळे भेदभाव - उपासनेसकट सगळे भेदभाव
काढून टाकणारा धर्मच टिकणार.

विज्ञान आणि आत्मज्ञान ह्या दोन साधनांनी
सर्वांचे प्रेम आणि सहकार्य साधून आपल्याला
धर्म स्थापना करायची आहे. सर्व मानवांचा तो एकच धर्म होईल.
आता आम्हाला मानवप्रेमाचा धर्म स्थापन करायचा आहे.
त्यात पूजा-अर्चा राहणार नसून मानव-सेवा येईल.

मूर्तीपूजेचे युग बदलून राहिले आहे. आता
मानव समाजाच्या रूपात भगवंताची
सेवा आणि पूजा करण्याचे नवे युग आले आहे.

अनुक्रमणिका








दुःखी लोकांची सेवा, अनाथांची सेवा, भुकेलेल्यांची सेवा
ही ईश्वरसेवा आहे. ही सर्वोत्तम सेवा आहे.
अशा तऱ्हेची सेवा करण्याचे प्रयत्न जेथे होतील
ती स्थाने या युगात आमच्या यात्रेची स्थाने मानली जातील.

गावाची जनता महादेव आहे; स्वयंभू महादेव आहे.
तुम्ही जर महादेवाचे पूजक असाल
तर तुम्हाला तिच्याजवळ गेले पाहिजे.
लोकसेवा आमची नुसती पूजा आहे.
गाव किंवा गावाचा समूह आमचे महामंदीर आहे.

**आचार्य विनोबा भावे**

अनुक्रमणिका

## अनुक्रमणिका

### श्रद्धा - विवेक आणि समाज



### उत्तर-नव भारत : सुसंवादासाठी



**नवलेखक स्वागत :**


मीरा धांडगे :
अधिव्याखाता, डॉ० बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद

सुभाष आठल्ये :
Indian Liberal Group, कार्यकर्ते, कोल्हापूर

श्रीकांत कारंजेकर :
पर्यायी ऊर्जा विशेषज्ञ, सहसचिव धरामित्र, माजी संचालक, ग्रामोपयोगी विज्ञान केंद्र, वर्धा



मुखपृष्ठ :
प्रकाशकांच्या सौजन्याने











# अतिथी संपादकीय

देवदत्त दाभोलकर

जे. पी. नाईक हे भारताच्या शिक्षण क्षेत्रातील एक उत्तुंग व्यक्तिमत्त्व. भारतात व आंतरराष्ट्रीय स्तरावरही आदरणीय मान्यता असलेले. त्यांचे हे जन्मशताब्दी वर्ष.

'भारतीय जनतेचे शिक्षण' हा त्यांच्या प्रत्येक श्वासाचा ध्यास होता. हे भावनात्मक विधान नाही. ते शास्त्रकाट्याच्या कसोटीवर देखील सिद्ध करता येईल.

उत्तर-नव भारत आपल्याला नकळत परंतु आपल्या डोळ्यासमोर घडत आहे. शिक्षण व्यवस्था या परिवर्तनाचा कणा आहे, असणे आवश्यक आहे. या विचारमंथनात नवभारत आपला खारीचा वाटा उचलण्याचा प्रयत्न करणार आहे. 'शिक्षण आणि परिवर्तन' हा नवभारतचा विशेषांक दोन वर्षांपूर्वीच प्रसिद्ध झाला आहे.

या संदर्भात 'उत्तर-नव भारतात भारतीय जनतेचे शिक्षण : नवे संदर्भ, समस्या आणि उत्तरे' या विषयावर दोन दिवसांचे एक कृतिचर्चासत्र सहभागींच्या सर्वसाधारण सोयीप्रमाणे सातारा, वाई किंवा पुणे येथे दि. ३१ ऑगस्ट तें ६ सप्टेंबर २००७ या सप्ताहात आयोजित केले जात आहे. सर्व समवृत्तीच्या व्यक्तींच्या विचारशील - कृतिशील सहभागाचे सहकार्याचे स्वागत आहे.

उत्तर-नव भारतातील नवभारताचे जाणकारां कडून उत्तेजन देणारे स्वागत होत आहे याचा आनंद होत आहे.

हा अंक प्रामुख्याने आधी प्रकट केल्याप्रमाणे 'श्रद्धा - विवेक आणि समाज' या विषयाला वाहिलेला आहे. प्रा. मे. पु. रेगे आणि प्रा. दि. य. देशपांडे या ज्येष्ठ विचारवंतातील वादविषयाच्या दिशेने मागोवा घेण्याचा व काही मांडणी करण्याचा हा प्रयत्न आहे. या विषयावर या उभयतांच्या विषयी आदर, आस्था असणाऱ्या डॉ. सुनीती देव प्रा. रेगे यांच्या स्मृतिदिनी सविस्तर मांडणी करतील. त्यांच्या समवेत तशाच अधिकाराचे प्रा. प्र. बा. कुलकर्णी उपस्थित असतील. 'नवभारत'ला या चर्चेत अनेक कारणांनी रस आहे.

'उत्तर-नव भारत : सुसंवादासाठी' हा विभागही या हीरक वर्षात चालविला जाईल. त्याचे सामान्यतः स्वरूप या अंकातील मांडणीवरून लक्षात यावे.

यापुढील अंक 'महिला : मानववंशाचा उपेक्षित, शोषित उत्तमार्ध' या विषयाशी संबंधित असेल. सजग वाचकांकडून सूचनांचे, टीकेचे, सहकार्याचे स्वागत आहे.

❖❖❖

सह नौ अवतु।
सह नौ भुनक्तु।

अनुक्रमणिका






## चर्चासत्रांविषयी

# 'उत्तर-नव' भारत
# विकासाची विविध प्रतिमाने

संयोजक : नवभारत मासिक, प्राज्ञपाठशाळा, वाई
अलदा निकेतन, सातारा (अलदा : अच्युत लक्ष्मण दाभोलकर, १८९३-१९५५)
(या खेरीज अन्य कोणा व्यक्तीचे, संघटनेचे उत्स्फूर्त सहकार्य आल्यास त्याचाही साभार स्वीकार करण्यात येईल.)

चर्चासत्रांविषयीची निवेदने व सूचना या आधीच्या अंकातून आलेल्या आहेत. यापुढील संदर्भात :

१. 'श्रद्धा - विवेक आणि समाज' या विषयावरील चर्चासत्र वाई येथे प्रा. रेगे यांच्या स्मृतिदिनी २८ डिसेंबर रोजी होईल. सकाळी १०.०० ते १.०० लेखांची टिपणांची मांडणी लेखक करतील. दुपारी १.०० ते ३.०० मध्यंतर. या वेळात सहभागींनी आपल्या प्रतिक्रिया व प्रश्न लेखी स्वरूपात द्यावयाचे आहेत. त्यावर चर्चा ३.०० ते ५.०० या वेळात होईल. सूत्रसंचालन प्रा. देवदत्त दाभोलकर करतील. डॉ. सुनीती देव व डॉ. प्र. बा. कुलकर्णी सहभागी होण्यासाठी नागपूरहून येत आहेत.

२. 'विचारशील आणि समाजपरिवर्तन' या विषयावरील कृति-चर्चासत्र दि. ३० जानेवारी २००७ या दिवशी सातारा येथे वरील वेळापत्रकाप्रमाणेच होईल.

३. 'लोकशाही समाजवाद' या विषयावरील चर्चासत्र वाई येथे दि. २७, २८ मे २००७ रोजी होईल.

४. सप्टेंबर २००७ च्या पहिल्या आठवड्यात सहभागी होऊ इच्छिणाऱ्यांच्या सर्वसाधारण सोयीच्या दिवशी जे. पी. नाईक जन्मशताब्दीच्या निमित्ताने 'उत्तर-नवभारतात भारतीय जनतेचे शिक्षण : नवे संदर्भ, समस्या व उत्तरे' या विषयावर सातारा, वाई वा पुणे येथे दोन दिवसांचे चर्चासत्र होईल. या चर्चासत्रासाठी प्रा. देवदत्त दाभोलकर यांच्याशी संपर्क साधावा.

कोणत्याही चर्चासत्रात सहभागी होऊ इच्छिणाऱ्यांनी आधी शंभर रुपयांची मनिऑर्डर सचिव, प्राज्ञपाठपाळा मंडळ यांच्याकडे केल्यास त्यांना चर्चासत्राविषयी टिपणे पाठविली जातील.

संपर्कासाठी पत्ते -

**प्रा. देवदत्त दाभोलकर**
**निवास :** शांतिनिकेतन
४३, गुरुकृपा हौ. सो.
शाहूनगर, सातारा ४१५००१
दूरध्वनी : (०२१६२) २२०३७८
E-mail : ndabholkar@rediffmail.com

**प्रा. यशवंत कळमकर**
**निवास :** २४१०-क, सोनगीरवाडी,
दूरध्वनी कॉलनी रस्ता, वाई ४१२८०३
दूरध्वनी : (०२१६७) २२२७०४
**कार्यालय :** सचिव, प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई
दूरध्वनी : (०२१६७) २२०००६






# श्रद्धा - विवेक आणि समाज

## श्रद्धा - विवेक

मे० पुं० रेगे

### १
### धार्मिक श्रद्धा आणि ईश्वराचे अस्तित्व

मी स्वाभाविकपणे धार्मिक असलेला माणूस नाही. मी पूजाअर्चा, उपासतापास करणारा किंवा व्रतवैकल्ये पाळणारा असा माणूस नाही. मी प्रार्थना करीत नाही. पण मला प्रार्थना करता येत नाही याचे मला वाईट वाटते. कधीतरी मनोभावे प्रार्थना करण्याची क्षमता मला प्राप्त होईल, 'ईश्वरनिष्ठांच्या मांदियाळी'त कधीतरी प्रवेश मिळेल अशी आशा आहे. हे सोपे नाही. 'चणे खावे लोखंडाचे'. आपण स्वत: तर धार्मिक नाही. पण धार्मिक माणूस जसा विचार करतो तसा विचार करण्याचा, त्या दृष्टीने गोष्टींकडे पाहण्याचा प्रयत्न आपण करतो, असे व्हिट्गेन्स्टाईनने कोठेतरी म्हटले आहे. माझी अवस्था अशीच आहे. 'कालनिर्णय'मधील उल्लेखित लेखांत मी धार्मिकतेची phenomenology मांडण्याचा प्रयत्न केला. ते personal confession नव्हते. Personal confession येथे देतो आहे.

धार्मिकतेचा, अध्यात्माचा प्रांत धूसर आहे. पण विश्वाचा समग्र मानवी अनुभव घेतला तर ह्या अनुभवाचा अविभेद्य असा तो प्रांत आहे. विश्वाला माणसाकडून जो प्रतिसाद मिळतो त्यात दृश्य, इंद्रियगोचर जगापलीकडे असलेल्या आणि या जगाला आधारभूत असलेल्या अशा तत्त्वाची जाणीव हा एक अनिवार्य घटक असतो. (जगातील सौंदर्याला दिलेली दाद आणि त्यातून उद्‌भवणारी सौंदर्यनिर्मितीची प्रेरणा हाही या प्रतिसादाचा एक अनिवार्य घटक आहे.) दृश्य जग अप्रतिष्ठित आहे, पण स्वयंभू, प्रतिष्ठित असे तत्त्व आहे; दृश्य जग त्याचा मर्यादित आविष्कार आहे; ह्या अतीत तत्त्वाशी माणसाचे साक्षात नाते जोडणारा असा एक घटक मानवी व्यक्तीमध्ये आहे आणि या घटकाचा (थोडक्यात आत्म्याचा) विकास करणे हे माणसाचे सर्वोच्च श्रेय आहे, अशी स्वाभाविक मानवी धारणा आहे. 'माणसाने सबंध जग मिळविले पण आत्मा गमावला तर त्याच्यात त्याचा काय लाभ आहे?'

विश्वाला माणसाकडून मिळणाऱ्या प्रतिसादातील हा घटक म्हणजे माणसाची स्वाभाविक धार्मिकता. मानवी प्रकृतीतील इतर प्रेरणा - प्रवृत्तींप्रमाणे ह्या धार्मिकतेचाही विकास इतिहासात झाला आहे. भिन्न संस्कृतीत तिने भिन्न रूपे धारण केली आहेत. ईश्वरावरील श्रद्धा हे तिचे एक रूप आहे; बौद्ध निर्वाण हे तिचे वेगळे रूप आहे - Peace that passeth understanding. अनेक धार्मिक परंपरा इतिहासात विकसित झाल्या आहेत. त्या त्या समाजातील व्यक्ती आपापल्या परंपरेपासून धार्मिक श्रद्धेचा आशय स्वीकारतात, आत्मसात करतात आणि ह्या आशयाशी सुसंगत अशा रीतीने जगण्याचा प्रयत्न करतात. ही श्रद्धा व्यक्त करणाऱ्या आचरणाची रूपेही समाजात दृढमूल झालेली असतात आणि सर्वसामान्य माणसे त्यांना अनुसरतात - पूजाअर्चेच्या पद्धती, सण, उत्सव, नीतिनियम, मनोवृत्तीचे आणि आचरणाचे आदर्श, इत्यादी. उत्कट धार्मिकतेची माणसे अशा रूढ धार्मिक चाकोरीत पूर्णपणे सामावू शकत नाहीत. त्यांच्या वैयक्तिक धार्मिक अनुभवाचा आविष्कार, उद्रेक जेव्हा रूढ प्रथांशी विसंगत ठरतो तेव्हा त्याचा गतानुगतिक समाजाशी संघर्ष होतो, त्यांचा छळही होतो. ह्यातून त्यांची धार्मिक एकनिष्ठता तावूनसुलाखून बाहेर पडली तर ते 'संत' इत्यादी पदवीला पोचतात. ते प्रतिभाशाली असले तर धार्मिक श्रद्धेला नवे रूप आणि आशय देऊ शकतात. उदाहरणार्थ, बुद्ध किंवा ख्रिस्त.

ह्या परिचित गोष्टी आहेत. पण पाखंडी सुशिक्षितांना त्यांची आठवण करून देणे आवश्यक ठरावे असा काळ आला आहे. आणखी एक परिचित गोष्ट येथे नमूद करणे भाग आहे. अतीत अस्तित्व किंवा परतत्त्व ह्याच्या स्वरूपाविषयीच्या,

अनुक्रमणिका






त्याच्या निसर्गाशी किंवा माणसाशी असलेल्या संबंधा-विषयीच्या अनेक भिन्न संकल्पना किंवा सिद्धांत भिन्न धर्मांच्या, पंथांच्या मुळाशी आढळतात. हा अनेकान्तवादाचा प्रांत आहे. ह्या विसंगतीचा परिहार कसा करणार हा एक प्रश्न आहे. त्याचा पुढे विचार करू. मला येथे जो मुद्दा मांडायचा आहे तो असा की विज्ञानाच्या उदयानंतर ही सर्व धार्मिक जीवनपद्धती कालबाह्य झाली आहे; आज जर ती टिकून राहिली असेल तर विज्ञानपूर्व तमोयुगातील संस्कृतीचा तो क्षीण, मुमुर्षू असा अवशेष आहे; जोमदार, आशयसंपन्न मानवी जीवन उभारण्याच्या आड येणारा तो अडसर आहे अशी समजूत आज व्यापक प्रमाणात फैलावली आहे. लॉक, हॉब्ज, ह्यूम, पुढे बेन्थम, मिल ह्यांनी विकसित केलेली अनुभववादी, उपयुक्ततावादी (विवेकवादी) विचारधारा ही बऱ्याच प्रमाणात आजची शिष्टसंमत (orthodox) मतप्रणाली आहे. महाराष्ट्रात तिचे तत्त्वज्ञानात्मक नेतृत्व प्रा. दि. य. देशपांडे समर्थपणे करीत आहेत. तिला छेद देणाऱ्या, माणसाच्या स्वायत्ततेची, आत्मनिर्मितीच्या शक्तीची बूज राखणाऱ्या कांट, हेगेल इत्यादींनी विकसित केलेल्या विचारधारेची पुरेशी दखल महाराष्ट्रात घेण्यात येत नाही.

चिंतनशील माणसाला विश्वाविषयी स्वाभाविकपणे पडणारे प्रश्न अर्थशून्य म्हणून झटकून टाकण्याची फॅशन ॲकॅडेमिक तत्त्वज्ञानात रूढ आहे (हे मी विश्लेषक तत्त्वज्ञाना-विषयी म्हणत आहे). हे प्रश्न बावळट वाटतील पण ते माणसांना पडतात : उदा. कालाला प्रारंभ आहे का? कालाला प्रारंभ असणे शक्य नाही; कारण ज्या कशाला प्रारंभ असतो तो कालात असतो व म्हणून स्वतः कालाला प्रारंभ असणार नाही. मग, काल जर अनादी असेल तर, आतापर्यंत अनंत काल लोटला असणार. पण जे अनंत आहे ते लोटून पुरे होणे कसे शक्य आहे? (हा कांटने उपस्थित केलेला प्रश्न आहे.) ह्या प्रश्नाला मिळणारे पठडीतील एक उत्तर असे की, जी अनादी, अनंत आहे आणि जिच्या कोणत्याही दोन घटकांच्या दरम्यान तिचा निदान एक घटक असतो अशा श्रेणीची (series) संकल्पना आपण सुसंगतपणे करू शकतो आणि काल ही क्षणांची अशी एक श्रेणी आहे. पण ह्याने समाधान होत नाही. काल लोटतो की नाही? त्याला प्रवाह आहे की नाही? अनंत काल लोटला आहे की नाही? वर्तमान क्षण आहे; कारण तो वर्तमान आहे. मग ह्या क्षणापर्यंत अनंत काल लोटला आहे की नाही? दुसरा एक प्रश्न : काहीच नव्हते असे असणे शक्य आहे का? की काहीतरी असणे अनिवार्य आहे? असे असेल तर, अनिवार्यपणे अस्तित्वात असणारे असे तत्त्व आहे असे होते. जे नसणे शक्य होते पण प्रत्यक्षात जे अस्तित्वात आहेत अशा पदार्थांचा समूह म्हणजे विश्व होय असे आहे का? मग ह्या विश्वाला बूड नाही का? हे पदार्थ नियमांना अनुसरून वागतात हा केवळ योगायोग आहे का? एका बाजूने पाहता, कालातीत अस्तित्व, स्वयंभू, अनिवार्य अस्तित्व ह्या संकल्पनांना आपण आनुभविक आशय देऊ शकत नाही असे वाटते. दुसऱ्या बाजूने पाहता अनुभवगम्य विश्वाची सापेक्षता, त्याची मर्यादितता दाखवून देणाऱ्या ह्या संकल्पना आहेत असेही वाटते. अनुभवगम्य विश्व स्पष्टपणे तेथे आहे आणि ते जसे प्रत्ययाला येते तसे स्वीकारण्यात शहाणपणा आहे असे वाटते. दुसऱ्या बाजूने हे विश्व असावे आणि ते जसे आहे तसे ते असावे हेच एक गूढ वाटते.

अशा स्वरूपाच्या अशिक्षित, तत्त्वज्ञानात्मक बुचकळ्यातून अतीत, स्वयंभू अशा तत्त्वाची संकल्पना उदयाला येते असे माझे म्हणणे नाही; पण असे प्रश्न तिला पोषक आहेत. ही एक स्वाभाविक मानवी संकल्पना आहे आणि संस्कृतीच्या इतिहासात ती अधिकाधिक शुद्ध, परिष्कृत होत आली आहे अशीच माझी भूमिका आहे. मी ह्या तत्त्वज्ञानात्मक समस्यांचा उल्लेख केला तो हे दाखवून देण्यासाठी, की अनुभववादी विचारसरणी ही सरळ, साधी, सोपी, प्रामाणिक विचारसरणी आहे आणि अतीतवादी (transcendentalists) निष्कारण गुंतागुंत निर्माण करतात, अशी स्थिती नाही. काही अटळ प्रश्न निरर्थक, पोकळ म्हणून बाजूला सारण्याच्या जाणीवपूर्वक (किंवा अजाणता) घेतलेल्या निर्णयावर अनुभववाद आधारलेला आहे. अनुभववादाच्या परिभाषेत असा प्रश्न विचारता येईल : 'जे पदार्थ इंद्रिया-नुभवाला गोचर असतात (आणि अशा पदार्थांचे वैज्ञानिक पद्धतीप्रमाणे स्पष्टीकरण करण्यासाठी ज्या पदार्थांचे अस्तित्व कल्पिण्यात येते) असे पदार्थच अस्तित्वात असतात' हे विधान संश्लेषक (synthetic) आहे की विश्लेषक आहे? ते संश्लेषक असेल तर त्याची सत्यता इंद्रियानुभवाच्या आधारे सिद्ध करावी लागेल पण तसे करता येणार नाही; तसे करण्याचा प्रयत्न केला तर तो वर्तुलात्मक ठरेल हे उघड आहे. हे विधान विश्लेषक असेल तर ती एक व्याख्या ठरेल. ही व्याख्या का स्वीकारावी

असा प्रश्न उपस्थित होईल. आणि ही व्याख्या स्वीकारणे सयुक्तिक (resonable) आहे असेच त्याचे उत्तर द्यावे लागेल. पण ही सयुक्तिकता अनुभववादी चौकट गृहीत धरते.

इंद्रियानुभवातीत तत्त्वांची संकल्पना मानवी विवेक-शक्ती अनिवार्यपणे निर्माण करते, पण ह्या संकल्पना (किंवा परिकल्पना - ideas) ज्ञानाच्या क्षेत्रात पोकळ असतात, ही कांटची भूमिका होती. पण त्याची पुढची भूमिका अशी होती की आपण स्वायत्त, विवेकशील कर्ते आहोत, अशा नैतिक कर्त्यांच्या मंडळाचे सदस्य आहोत, ह्या आत्मप्रत्ययाद्वारा अतीतच्या परिकल्पनेला आशय देता येतो. हा आशय ज्ञानाच्या स्वरुपाचा नसतो. हे आत्मदर्शन आणि त्याच्याद्वारा होणारे विश्वतत्त्वाचे - सोप्या भाषेत ईश्वराचे - होणारे दर्शन ही श्रद्धा (faith) आहे, असे त्याचे म्हणणे आहे. असे म्हणण्याचे एक कारण 'ज्ञान' ही संकल्पना कांट वैज्ञानिक ज्ञानापुरती मर्यादित करतो. शिवाय कांट 'पायेटिस्ट' (Pietist) वातावरणात वाढला होता. इतर प्रॉटेस्टंटांप्रमाणे पायेटिस्टही ईश्वराला साक्षी ठेवून आपले आचरण नैतिकदृष्ट्या शुद्ध ठेवण्यात, शुद्धतेची परिसीमा गाठण्यात खरे मानवी श्रेय आहे असे मानीत. (ईश्वराने आपल्याला दिलेल्या शक्तींचा विकास करुन ह्या विकसित शक्तींचा विनियोग ईश्वराच्या सेवेसाठी करणे - for the greater glory God - हेही आपले नैतिक कर्तव्य आहे असे मानीत.) कांट प्रबोधनाचा (Enlightn-ment) वारस होता. म्हणून भावनोत्कटतेचे (enthusiasm) त्याला वावडे होते. ह्यामुळेही परिशुद्ध नैतिकतेला स्वतःमध्ये सामावून घेऊन तिच्या पलीकडे जाणाऱ्या अध्यात्मिक अनुभवांचे महत्त्व कमी करण्याकडे त्याचा कल होता. उदाहरणार्थ, ख्रिस्ती प्रेम किंवा faith, love, hope आणि charity हे ख्रिस्ती प्रमुख सद्‌गुण (cardinal virtues) हे अनुभवसुद्धा अतीतच्या संकल्पनेला आशय देणारे अनुभव आहेत ही गोष्ट एऱ्हवी त्याने ओळखली असती.

वर म्हटल्याप्रमाणे, सर्वसामान्य माणसांना त्यांची धार्मिक श्रद्धा, तिचा आशय, तिच्या आविष्काराची रुपे, तिने प्रमाणित केलेली साध्ये त्यांच्या धार्मिक परंपरेपासून लाभतात. आधुनिक काळात परंपरेच्या प्रामाण्यावर हल्ले करण्यात आले आहेत. आधुनिकतेचे तत्त्वज्ञानाच्या क्षेत्रातील प्रणेते देकार्त आणि लॉक ह्यांची भूमिका अशी की व्यक्तीला जगाची ओळख करुन घेण्यासाठी नव्याने स्वतःपासून प्रारंभ करावा लागतो. पण मानवी जग परंपरेने घडविलेले असते आणि त्या संकल्पनांच्या माध्यमातून त्याचे ज्ञान करुन घेता येते आणि घ्यावे लागते त्या संकल्पना, निसर्गाविषयीच्या संकल्पना धरुन, परंपरेने निर्माण केलेल्या असतात आणि परंपरेत अनुप्रवेश करुन व्यक्तीला त्या आत्मसात कराव्या लागतात. धार्मिक, अध्यात्मिक अनुभवाच्या बाबतीतही हे खरे आहे. आता, मानवी संस्कृतीत भिन्न धार्मिक-अध्यात्मिक परंपरा विकसित झाल्या आहेत आणि त्या अनेक बाबतीत परस्पर विसंगत आहेत. त्यांचा मेळ कसा घालणार? हा एक खरा जटील प्रश्न आहे. दुसरा जटील प्रश्न असा आहे की, अध्यात्मिक आणि ऐहिक जीवनाचा मेळ कसा घालणार? माणूस प्राणी आहे, पण तो केवळ प्राणी नाही; तो सामाजिक प्राणी आहे, पण केवळ सामाजिक प्राणी नाही. हे सर्व असून तो आत्मजाणीव असलेला, विश्वाशी नाते जोडू शकणारा असा आहे. ह्या व्यामिश्र प्रकृतीवर सुसंवादी जीवनसरणी कशी आधारता येईल?

हे खरेखुरे प्रश्न आहेत आणि त्यांची चर्चा धर्मविषयक तत्त्वज्ञानात करणे आवश्यक आहे (अशा तत्त्वज्ञानाचीही परंपरा आहे). ह्या प्रश्नांना देण्यात आलेली परंपरागत उत्तरे अशी की अतीताचा साक्षात्कार साधकाला अनेक रुपांत होतो. ह्याचा कदाचित अधिकारभेदाच्या संकल्पनेशी संबंध असेल. कैवल्य (Absolute) अनेक भिन्न पवित्रे सुसंगतपणे धारण करु शकते असे श्रीअरविंदांनी प्रतिपादन केले आहे. ऐहिकता आणि अध्यात्मिकता यांचा मेळ धर्म-अर्थ-काम-मोक्ष ह्या चतुर्वर्गाच्या आधारे घालावा लागतो, घालता येतो हा पारंपरिक विचार सुपरिचित आहे.

हे सर्व धूसर आहे ह्यात शंका नाही. पण ते धूसर आहे म्हणूनच तत्त्वजिज्ञासेला त्यातून आव्हान मिळते आणि आवाहनही मिळते. शिवाय, जे सूर्यप्रकाशासारखे ढळढळीत आहे असे वाटते तेही वास्तविक धूसर असते. मी बर्ट्रांड रसेलचे एक अवतरण येथे देतो. 'धर्माचे सार' (The Essence of Religion) ह्या आपल्या निबंधात, नास्तिकांच्या ह्या मुकुटमणीने असे म्हटले आहे की, माणसाच्या दोन प्रकृती (nature) असतात; एक 'विशिष्ट, सान्त, आत्मकेंद्रित; दुसरी सार्विक, अनंत आणि अपक्ष.' ({one}particular, finite, self-centred; the other universal, infinite and impartial). त्याची अनंत प्रकृती

'नि:पक्षपातीपणे प्रकाशत' असते (shines impartially). जे वर्तमान आहे आणि जवळचे आहे त्याच्याइतकीच दूरची युगे आणि प्रदेश तिच्या दृष्टीने वास्तव असतात. विचाराच्या क्षेत्रात, ती इंद्रियसंवेदनांच्या क्षेत्रावर उत्थान करते आणि जे सार्विक आहे आणि सर्वांसाठी खुले आहे त्याचा ती नेहमी शोध घेत असते. आपल्या इच्छांमध्ये आणि संकल्पनांमध्ये, जे श्रेय आहे ते साध्य म्हणून ती स्वीकारते. ते श्रेय मला लाभते की तुला ह्याकडे ती लक्ष देत नाही. भावनांच्या क्षेत्रात ती सर्वांना प्रेम अर्पण करते, केवळ आपल्या उद्दिष्टांना अनुकूल ठरेल असे वागणाऱ्यांना ती ते अर्पण करीत नाही. ती अपक्ष असते. ह्या बाबतीत सान्त प्रकृतीहून ती भिन्न असते. ह्या अपक्ष वृत्तीमुळे विचाराच्या क्षेत्रात ती सत्य शोधून काढू शकते, कृत्यांच्या क्षेत्रात न्याय साधते आणि भावनांच्या क्षेत्रात ती सर्वांवर प्रेम करते." (Distatnt ages and remote regions of space are as real to it as what is present and near. In thought it rises above the life of the senses, seeking always what is general and open to all men. In desire and will, it aims simply at the good, without regarding the good as mine or yours. In feeling, it gives love to all not only to those who further the purposes of the self. Unlike the finite self, is impartial; its impartiality leads to truth in thought, justice in action, and universal love in feeling.) - (Quoted in Ronald Clark, *Bertrand Russel*, London, Cape १९७५, P. ९०).

आणि रसेल अधिक व्यक्तिगत पातळीवर म्हणतात, 'माझ्यात जे अपार (endless) युद्ध चाललेले असते त्याच्यामुळे जे काही अंतर्गत संघर्षाशिवाय कृती करू शकते ते मला आवडते; ह्यामुळे मला अनिवार्यता (necessity) आणि गतीचे नियम आणि, सामान्यत: जडद्रव्याच्या हालचाली आवडतात. जो अंतर्गत संघर्षाने ओतप्रोत भरलेला नाही अशा ईश्वराची कल्पना मी करू शकत नाही... तेव्हा ईश्वर नसणे मी पसंत करतो. जीवन हे मूलत: मनोविकास, संघर्ष, क्रोध यांचा खेळ आहे असे मला वाटते. शांतीचे क्षण अल्पकालीन असतात आणि स्वत:ला नष्ट करतात. ईश्वर हा स्पिनोझाच्या ईश्वराप्रमाणे शांत, अक्षुब्ध असला पाहिजे; तो केवळ निसर्गाचा ओघ असला पाहिजे. (पण) हे सर्व आत्म-चरित्रात्मक आहे; हे तत्त्वज्ञान नव्हे.' 'The endless battle within me makes me like what acts without inward battling; that is why I like necessity and th laws of motion and doings of dead matter generally. I can't imagine God not full of conflict... so I prefer no God. Life seems to me essentially passion, conflict, rage; moments of peace are brief and destroy themselves. A God must be calm like Spinoza's, merely the course of nature. All this autobiography, not philosofy.' (कित्ता. पृ. १७४).

आपण रसेल ह्यांना म्हणू की, 'This is very much philosophy'. तत्त्वज्ञानात मानवी प्रकृतीच्या सर्व अंगांचा विचार झाला पाहिजे. जी जीवनसरणी रसेल यांना श्रेयस्कर वाटते ती धार्मिक आहे. ज्या अनंत मानवी प्रकृतीचे वर्णन रसेल करतात तिचे भगवद्गीतेत केलेले वर्णन असे आहे-

अद्वेष्टा सर्वभूतानां मैत्र: करुण एव च।
निर्ममो निरहंकार: समदु:खसुख: क्षमी।। १२-१३

संघर्षरहित आचरणाचे दिग्दर्शन असे आहे :

नियतं संगरहितम् अरागद्वेषत: कृतम्।
अफलप्रेप्सुना कर्म यत् तत्सात्त्विकम् उच्यते।। १८-२३

खरा धार्मिक माणूस शांत असतो. रसेल ह्यांनी सान्त मानवी प्रकृती म्हणून जिचा निर्देश केला आहे तिला पारंपरिक भारतीय भाषेत 'अहंकार' असे म्हटले आहे आणि अहंकाराचे विसर्जन करणे हे सर्व धार्मिक साधनांचे समान साध्य आहे.

देव यांनी 'विज्ञाननिष्ठ' हा शब्द आपल्या विवरणात वापरला आहे. त्याच्यावर थोडे भाष्य करावे असे मला वाटते. ह्यात असे अभिप्रेत आहे की मी ईश्वरावर श्रद्धा ठेवतो ह्यावरून मी विज्ञाननिष्ठ नाही असे निष्पन्न होते. हे कसे निष्पन्न होते हे मला कळत नाही. विज्ञानाच्या प्रस्थापनेत न्यूटनचा सिंहाचा वाटा होता. न्यूटन एरिअन पंथाचा ख्रिस्ती होता. त्याची ईश्वरावर श्रद्धा होती. न्यूटनच्या बरोबरीने ज्याचा आदराने उल्लेख केला जातो तो जेम्स क्लार्क मॅक्स्वेल हाही श्रद्धेने ख्रिस्ती होता. हे विज्ञाननिष्ठ नव्हते असे कसे म्हणता येईल? हे दोघे अत्युच्च दर्जाचे वैज्ञानिक होते. फार तर असे म्हणता येईल

की ते सुसंगत नव्हते. वैज्ञानिक विचारपद्धती त्यांनी सुसंगतपणे सर्व क्षेत्रात वापरली नाही. पण, मी वर म्हटल्याप्रमाणे, जे आहे त्याच्या भिन्न इयत्ता, पातळ्या, दर्जे असतील, तर सर्व प्रकारच्या अस्तित्वाचे स्वरूप वैज्ञानिक पद्धतीला अनुसरून शोधता येईल असे मानणे गैर ठरेल. एखादा अणुशास्त्रज्ञ गंध लावून देवपूजा करतो हे पाहून अनेकांना धक्का बसतो. त्यांना विज्ञान कशाशी खातात हेही माहिती नसेल, पण ईश्वर नाही हे विज्ञानाने सिद्ध केले आहे अशी त्यांची खात्री असते. ईश्वर आहे की नाही हा वैज्ञानिक प्रश्न नाही, तो तत्त्वज्ञानात्मक प्रश्न आहे आणि सर्वच तत्त्वज्ञानात्मक प्रश्नांसारखा तो जटील आहे. त्याचे सर्वमान्य उत्तर लाभणे कठीण आहे.

देव म्हणतात, "...मी माणूस आहे, माझ्याचसारखी दुसरीही व्यक्ती माणूस आहे. ज्या ज्या गोष्टींनी मला आनंद, सुख होते त्या त्या गोष्टींनी त्यालाही होत असणार. ज्या गोष्टींनी मला दुःख होते त्या गोष्टींनी इतरांनाही दुःख होत असणार, त्यामुळे मी त्या प्रकारचे वर्तन इतरांप्रती करू नये हे माझे कर्तव्य ठरते. ही भूमिका समजण्यासारखी वाटते. माझे कर्तव्य कोणते? मी कसे जगावे? हे कोणत्या तरी काल्पनिक शक्तीने मला सांगण्याची गरज नाही. मला ते निरीक्षणाने, अनुभवाने समजू शकते." आता, मला निरीक्षणाने, अनुभवाने काय समजू शकेल? फार तर इतर माणसेही माझ्यासारखी आहेत तेव्हा ज्या गोष्टींनी मला सुखदुःख होते त्यांनी त्यांनाही सुखदुःख होते हे समजू शकेल. (येथे एक खोल प्रश्न आहे. इतर माणसे माझ्यासारखीच माणसे आहेत हे मला निरीक्षणाने समजते का? माझे माणूसपण मी प्रथम ओळखतो आणि मग इतरांचे माणूसपण निरीक्षणाने, तर्काने ओळखतो असे असते का? की, एका समाजात (community) त्यांच्यासोबत वाढण्यात, जगण्यात, संवाद साधण्यात त्या समाजातील सर्वांचे माणूसपण गृहीत असते आणि इतरांना माणसे म्हणून ओळखता आल्याशिवाय स्वतःच्या माणूसपणाचा शोध व्यक्तीला लागणार नाही, असे असते? पण हा प्रश्न बाजूला ठेवू.) समजा, एखादा माणूस असे म्हणाला की इतर माणसांच्या प्रतिक्रिया कशा होतात हे मला समजते ही माझ्या फायद्याची गोष्ट आहे. ह्या माझ्या ज्ञानाचा उपयोग करून त्यांच्या प्रतिक्रिया माझ्या हिताला अनुकूल ठरतील अशा रीतीने मी त्यांना वागवीन. मी त्यांना साधने म्हणून वापरीन. उदाहरणार्थ, ती घाबरट असली तर त्यांना धाकदपशा दाखवून माझ्या इच्छेप्रमाणे वागायला भाग पाडीन. मानवी स्वभावाच्या ज्ञानाचा उपयोग करून माणसांना आपल्या हिताची साधने म्हणून वापरणे गैर आहे हे कोणत्या निरीक्षणाच्या आधारे ठरते?

दुसरा मुद्दा असा : देव म्हणतात की, "विज्ञाननिष्ठ नास्तिकाची भूमिका अशी असते की "मी जे करतो त्याला मीच जबाबदार आहे." आता एखादा विज्ञाननिष्ठ नास्तिक जर असे म्हणाला की सर्वच घटना कार्यकारणनियमांना अनुसरून घडतात; जनुकांनी केलेली माझी जैविक घडण, माझ्यावर झालेले संस्कार आणि प्राप्त परिस्थिती यांपासून माझी कृत्ये अनिवार्यपणे निष्पन्न होतात. काय करावे हा निर्णय घेण्याचे स्वातंत्र्य मला नाही. असा निर्णय मी घेतला तरी तो कार्यकारणनियमांना अनुसरून निर्धारित असतो. तेव्हा या निर्णयाला मी जबाबदार नाही. किंबहुना मी असा कुणी नाहीच. शारीरिक-मानसिक अवस्था आणि त्यांच्यावर कार्य करणारी चेतके (stimuli) आणि त्यांच्यापासून उद्‌भवणारे बाह्य वर्तन एवढे कार्य काय ते येथे आहे. ह्या म्हणण्याला देव काय उत्तर देणार? वैज्ञानिक विश्वात 'जबाबदारी' ही संकल्पना बसत नाही. व्हिट्‌गेन्स्टाईनचे एक उद्धरण देतो. "Our life is like a dream. But in our better hours we wake up just enough to realise that we are dreaming. Most of the time, though, we are fast asleep" (Wittgenstein - Anthony Kenny, p.३). म्हणजे, "आपले जीवन स्वप्नासारखे असते. पण जेव्हा आपण चांगल्या मनःस्थितीत असतो तेव्हा आपण स्वप्न पाहत आहोत हे जाणण्यापुरते काय ते आपण जागे होते. पण बहुतेक वेळा आपण गाढ झोपेत असतो."

या निशा सर्वभूतानां तस्यां जागर्ति संयमी ।।
यस्यां जाग्रती भूतानि सा निशा पश्यतो मुनेः ।।

व्हिट्‌गेन्स्टाइन प्रतिभावंत तर्कशास्त्रज्ञ आणि विश्लेषक तत्त्ववेत्ता होता. शिवाय त्याची दृष्टी अध्यात्मिक होती. मी अध्यात्मिक वृत्तीने जगत नाही. पण तत्त्वज्ञानाचा अभ्यासक म्हणून विश्वाचा पसारा समजून घेण्यात अध्यात्मिक दृष्टीला स्थान आहे असे मानतो.

धर्माचे पालन, धार्मिक आचरण ही एक गोष्ट आहे; धर्माचे तत्त्वज्ञान, धर्मशास्त्र, देवशास्त्र, (theology) ही वेगळी गोष्ट आहे. ईश्वर जर सर्वशक्तिमान आणि परमकृपाळू






अनुक्रमणिका

आहे तर जगात इतके दुःख, अन्याय का? हा देवशास्त्रातील प्रश्न आहे. धार्मिक माणूस ह्या साऱ्या दुःखाचा भार ईश्वरावर सोडून परदुःखाचा यशाशक्य परिहार करण्याचा प्रयत्न करील. जे काही होते ते ईश्वराच्या इच्छेप्रमाणे होते असे जर असेल तर पापी माणसाचे वर्तनही ईश्वराच्या इच्छेप्रमाणे होत असणार. मग पापी माणसाला दोष का द्या? हाही देवशास्त्रातील प्रश्न आहे. धार्मिक माणूस पाप करणार नाही; त्याने पाप केले तर तो पश्चात्ताप करील; सद्बुद्धी दे म्हणून ईश्वराची प्रार्थना करील; करुणा भाकेल. (निरीश्वरवादी बौद्ध असे करणार नाही, पण आपले अंतःकरण अधिक शुद्ध करण्याचा प्रयत्न करील. पण बौद्धांपुढेही प्रश्न आहे. कारण ते कर्मसिद्धांत स्वीकारतात. मग कर्माने नियत असलेल्या वासना स्वतःच्या प्रयत्नांशी कशा शुद्ध करता येतील?) ह्यात तार्किक विसंगती आहे असे बाहेरून पाहणाऱ्याला वाटेल. पण ज्याचा धार्मिकतेत अनुप्रवेश झाला आहे तो ही विसंगती स्वीकारून आपल्या वाटेने जातो. सर्व गूढांची उकल करणे आपल्या शक्तीपलीकडचे आहे, ते आपले कामही नव्हे, विहित जीवनमार्गापासून न ढळणे एवढेच आपले काम आहे अशी त्याची धारणा असते - one step enough for me. कलानुभवाची जशी स्वायत्त भाषा असते तशीच धार्मिक श्रद्धेचीही असते.



## २

## विवेकवादाच्या मर्यादा

'रॅशनलिझम' (rationalism) चे विवेकवाद हे भाषांतर आहे अशी कल्पना मी करतो. 'बुद्धिप्रामाण्यवाद' हा त्याचा दुसरा पर्याय आहे. विवेक म्हणजे जी दोन भिन्न वस्तूंत भेद करते ती शक्ती. रीझन (reason) ही संकल्पना पाश्चात्त्य तत्त्वज्ञानपरंपरेत विकसित झालेली संकल्पना आहे. तिच्यासारखी संकल्पना भारतीय परंपरेत नाही. रीझन ही संकल्पना पाश्चात्त्य तत्त्वज्ञानातच अनेकार्थी आहे. एक प्लेटो, ॲरिस्टॉटल ह्यांनी विकसित केलेली संकल्पना. तिचे स्थूल वर्णन असे करता येईल की, जी तत्त्वे अनुभवातून आपल्याला लाभत नाहीत, ज्यांचे प्रामाण्य ऐंद्रिय अनुभवाच्या निकषावर सिद्ध होत नाही आणि करावे लागत नाही, पण जी माणूस स्वतः ग्रहण करू शकतो, ती ग्रहण करण्याची एक शक्ती माणसाच्या ठिकाणी आहे. ऐंद्रिय अनुभवाच्या पलीकडे असलेले हे सार्वत्रिक आणि अनिवार्य (necessary) ज्ञान ह्या विवेकशक्तीच्या वापरातून माणसाला लाभते ही जी विवेकासंबंधीची संकल्पना आहे त्या प्रकारची ज्ञानमीमांसा आपल्याकडे नाही. ही संकल्पना विशेषतः गणितामध्ये आधुनिक पाश्चात्त्य तत्त्वज्ञानाने स्वीकारलेली आहे.

ऐंद्रिय अनुभवाच्या माध्यमाने प्राप्त होणाऱ्या ज्ञानापलीकडे असणारे सत्य (ज्ञान) ग्रहण करणारी शक्ती म्हणजे विवेकशक्ती आहे असे जे मानतात त्यांना रॅशनॅलिस्ट (rationalist) म्हणजेच विवेकवादी म्हणतात आणि (यावरून) मग अशी शक्ती आहे का असा एक कूट प्रश्न ज्ञानमीमांसेत उत्पन्न होतो तसा सत्ताशास्त्रातही उत्पन्न होतो.

रॅशनॅलिझमचा दुसरा अर्थ १८ व्या शतकापासून मान्य व्हायला लागला आहे. हळूहळू स्थिर होत आहे. पहिल्या अर्थाने विवेक या शक्तीचा विरोध अनुभवाशी होता. दुसऱ्या अर्थाने या शक्तीचा विरोध श्रद्धेशी आहे. ही दुसरी विवेकाची कल्पना, जेव्हा आपण 'रँगलर परांजपे रॅशनलिस्ट होते' असे म्हणतो किंवा इंग्लंडमध्ये रॅशनलिस्ट असोसिएशन होती असे म्हणतो, त्या बोलण्यातून व्यक्त होते. ही रीझनची संकल्पना प्लेटॉनिक रीझनच्या संकल्पनेहून अत्यंत वेगळी आहे. आम्ही श्रद्धेने कोणतेही तत्त्व स्वीकारणार नाही, अनुभवावर म्हणजे ऐंद्रिय अनुभव आणि सुसंगत तर्क या प्रमाणांवर जे सत्य ठरेल तेच आम्ही स्वीकारू अशी ही भूमिका आहे. ह्याला (फार तर) लोकांमध्ये पसरलेले तत्त्वज्ञान असे आपण म्हणू. म्हणजे आता रीझन हा तांत्रिक तत्त्वज्ञानाचा विषय राहिला नाही. असे हे एक वैचारिक आंदोलन युरोपमध्ये सुरू झाले. ज्याला आपण Enlightenment म्हणतो - १८ व्या शतकातले प्रबोधन - त्याचा हा वारसा. 'रीझन'ची ही दुसरी संकल्पना युयुत्सू बनली.

श्रद्धेने आणि परंपरेने स्वीकारल्या गेलेल्या अनेक सत्यांचा, त्याचबरोबर सामाजिक संस्थांचा, सामाजिक रचनांचा स्वीकार करणे म्हणजे असत्याला आणि अन्यायाला शरण जाणे आहे; म्हणून आता विवेकावर आधारलेले आणि विवेकाने प्राप्त करून दिलेले सत्य, त्यावर आधारलेल्या सामाजिक संस्था, सामाजिक रचना आपण इथे आणल्या पाहिजेत असे प्रखर वैचारिक आंदोलन युरोपात उभे राहिले. त्यामुळे युरोपीय समाजात बऱ्याच प्रमाणात अंतर्बाह्य वैचारिक









अनुक्रमणिका

आणि सामाजिक क्रांती झाली. हे क्रांतीचे लोण आपल्याकडे आले ही अत्यंत स्वागतार्ह गोष्ट आहे असे मी मानतो. ह्या क्रांतीमागची प्रेरणा काय होती? आधुनिक विज्ञानाचा उदय साधारणपणे १५ व्या शतकापासून सुरु झाला. या स्वरुपाचे ज्ञान मानवी संस्कृतीत पूर्वी कधी नव्हते. त्याचे धागेदोरे ग्रीक विज्ञानाशी आपण जोडू शकू. आर्किमिडिज किंवा यूक्लिडपर्यंत. चिनी, भारतीय, ग्रीक इत्यादी संस्कृतीही प्रगत संस्कृती होत्या. त्यांच्यामध्ये अनेक प्रकारची तंत्रकौशल्ये होती. अनुभवावर, चिकित्सेवर अधिष्ठित संकल्पनाव्यूहांचा वापर करणारी अशी विज्ञाने होती. आपले वैशेषिक दर्शन हे त्या प्रकारचेच विज्ञान आहे. आयुर्वेदात या दोघांचाही उपयोग केला आहे. आयुर्वेद हे एका दृष्टीने तंत्र आहे तर एका दृष्टीने विज्ञान आहे. पण जे निखळ आधुनिक असे विज्ञान आहे त्याची जी पद्धती आहे, जी अंतर्गत घडण (structure) आहे, तशा प्रकारचे विज्ञान हे साधारणपणे १७ व्या शतकाच्या पूर्वी कुठेही नव्हते. त्यामुळे ज्ञानाचा एक आदर्श येथे या विज्ञानाच्या रुपात माणसापुढे उभा राहिला हे स्वीकारले पाहिजे. एवढेच नव्हे तर हे एकमेव प्रमाण अशा प्रकारचे ज्ञान आहे; वैज्ञानिक ज्ञान हेच संपूर्ण ज्ञान, ज्ञानाचा एकमेव प्रकार आहे अशी धारणा निर्माण झाली.

विज्ञानाचे स्वरुप काय आहे? एकतर ते अनुभवावर आधारलेले असते. याचा अर्थ असा की, ज्या दृश्य घटना आहेत त्यांचा उलगडा करण्यासाठी तुम्ही कोणत्याही अदृश्य अशा संकल्पनांची, पदार्थांची कल्पना करु शकता, पण एक पथ्य तुम्हाला पाळावे लागते, एक मर्यादा पाळावी लागते. ती अशी की, ज्या पदार्थांची तुम्ही कल्पना करता त्यांची नेमकेपणाने कल्पना केली पाहिजे. त्यांच्यापासून विशिष्ट परिस्थितीत कोणते निष्कर्ष तर्काला अनुसरुन आणि गणिताला अनुसरुन काढता येतात ते दाखवून दिले पाहिजे. ते अनुभवाने पडताळा घेता येतील असे असले पाहिजेत. ते दृश्य निष्कर्ष असले पाहिजेत. म्हणजे तुम्ही अभ्युपगम (hypotheses) केले असतील किंवा ज्या इंद्रियातीत शक्तींची किंवा पदार्थांची कल्पना केली असेल ते पदार्थ खरोखर तेथे आहेत असे मानता येईल. हा अभ्युपगम (hypothesis) स्वीकारता येईल असे मानता येईल. ह्या स्वरुपाचे ज्ञान, या पद्धतीवर आधारलेले ज्ञान पूर्वी कुठेही नव्हते.

दुसरी एक गोष्ट वैज्ञानिक ज्ञानाच्या संबंधात सांगितली पाहिजे. ती अशी की भिन्न पदार्थ, भिन्न प्रकारच्या घटना (phenomena) यांचे या स्वरुपाचे ज्ञान प्राप्त करुन घेण्याच्या प्रयत्नातून हळूहळू जे स्थिर होणारे अभ्युपगम (hypothesis) असतात किंवा उपपत्ती असतात त्यांचा एकमेकांशी संबंध जोडता येतो. या उपपत्तींपासून अधिक सामान्य असा निष्कर्ष (सिद्धांत) तर्काने प्राप्त करुन, या उपपत्तींची एक वीण तयार होते. त्यांच्यामध्ये भौतिक पदार्थ, रासायनिक पदार्थ, जैव पदार्थ, ज्यांच्यामध्ये मानसिक घटना घडतात अशा प्रकारचे जीव - या सर्वांविषयीच्या घटनांचे एक सुसंगत, तपशीलवार, त्यांचे प्रामाण्य सिद्ध केले पाहिजे अशा तऱ्हेचे वर्णन आपल्याला मिळते. त्यामुळे असा विश्वास माणसाला वाटतो की, मला जे वरवर दिसते त्याच्यामागे जे खरोखर आहे, ज्याच्याकडे मी केवळ अनुभवाने पोचू शकत नाही असे सूक्ष्म पदार्थ, सूक्ष्म शक्ती ह्यांचे ज्ञान मिळविण्याचा हा एक प्रभावी मार्ग आहे. आणि हे जे ज्ञान मिळालेले आहे ते स्थिर ज्ञान नाही. पुढे विज्ञानाचा विकास होईल तेव्हा त्याच्यात काही बदल होतीलच. पण ते बदल अशा स्वरुपाचे असतील की, आज जी सत्ये आहेत त्यांचे एका वेगळ्या रीतीने अर्थ लावणारे अशा प्रकारचे अधिक व्यापक उपपत्तींचे व्यूह आजच्या मर्यादित उपपत्तींच्या जागी माणसाला प्राप्त झालेले असतील.

अशा रीतीने सबंध विश्वाला आपल्या आवाक्यात घेणारे असे वैज्ञानिक ज्ञान तेथे निर्माण होईल. तेव्हा मग जे काही आहे ते - त्याच्यामध्ये जशी इतर माणसे आहेत तसा मीही आहे, - हे जे अंतर्बाह्य सर्व (काही) आहे त्याचे संपूर्ण स्वरुप जेव्हा विज्ञान संपूर्ण होईल तेव्हा आपल्याला लाभेल. आज आपण त्या दिशेने वाटचाल करत आहोत आणि करत असले पाहिजे. ही विचारसरणी या रॅशनलिझमचे एक अंग आहे. त्यामुळे जे ज्ञान म्हणून आतापर्यंत चालत आलेले आहे ते जर वैज्ञानिक ज्ञानाशी सुसंगत असेल तर ते त्याचा भाग बनू शकते. नसेल तर मग ते ज्ञान नव्हे. आपण उदार दृष्टीने हे माणसाच्या हिताचे विश्वास आहेत असे समजू शकतो. ज्याला History of ideas मध्ये रस असेल तो त्यांचा अभ्यास करील. पण ते ज्ञान म्हणून मान्य होऊ शकत नाही. मग श्रद्धेने जी सत्ये स्वीकारली असतील ती स्वीकारणे अशक्य होईल. अतीत असे काही तत्त्व असणार नाही. अतीतसुद्धा एक भ्रम ठरेल. ह्या भ्रमाचासुद्धा वैज्ञानिक उलगडा देता येतो. म्हणजे, जे अतीत

मानतात तसे अतीत नाही हे सिद्ध होते; त्यांचा तो भ्रम आहे हे सिद्ध होते. आणि त्या अतीताचीसुद्धा एक वैज्ञानिक कारणमीमांसा मिळते.

रॅशनलिझमचा दुसरा भाग असा, की जसे ज्ञानाच्या बाबतीत प्रमाण ज्ञान मिळविण्याची एक प्रमाण पद्धती आहे तिला अनुसरुनच ज्ञान मिळाले पाहिजे (म्हणजे) ते वैज्ञानिक ज्ञान होते. तसे माणसाचा जो व्यवहार आहे, जे आचरण आहे, वर्तन आहे त्यांचे नियमन करणारी तत्त्वेही विवेकावर आधारलेली असली पाहिजेत. पूर्वापार स्वीकारली गेलेली जी तत्त्वे होती ती श्रद्धेने स्वीकारलेली होती. जसे, ख्रिश्चन नीती होती. तिला ख्रिश्चन धर्मग्रंथाचे - बायबलसारखे - अधिष्ठान होते; आणि विशिष्ट प्रसंगी जर आपल्याला काही प्रश्न पडला तर त्यांचे उत्तर देणारे अधिकारी धर्मगुरू (फादर्स्) होते. पण आचरण, व्यक्तीचे वर्तन, त्याची कृती हीसुद्धा विवेकावर आधारित असली पाहिजे हा या विवेकवादाचा दुसरा अर्थ आहे.

कृती विवेकावर आधारलेली असली पाहिजे म्हणजे काय? ज्ञानाच्या बाबतीत आपण समजू शकतो की सर्व ज्ञान एका विशिष्ट पद्धतीने प्राप्त करून घ्यायचे. पण कर्माच्या क्षेत्रात विवेकाची तत्त्वे कोणती? ह्यात दोन तत्त्वे आहेत. पहिली गोष्ट म्हणजे पारलौकिक कल्याणाचा प्रश्न बाजूला पडला. याचे कारण हे की अतीत तत्त्व नाही. ते श्रद्धेने स्वीकारावे लागते. ज्याला हवे त्याने स्वीकारावे. त्याचे त्याला स्वातंत्र्य असेल. परंतु ते ज्ञान म्हणून काही प्रमाण नाही. मग दोन तत्त्वेच राहतात.

एक तत्त्व असे की, माणूस कृती करतो ती त्याची साध्ये साधण्यासाठी करतो. अमुक परिस्थितीला विशिष्ट वळण द्यायला, काहीतरी घडवून आणायला तो कृती करतो. तेव्हा योग्य कृतींचा एक स्वाभाविक निकष लाभतो. तो असा की, जे आपले साध्य असेल ते सिद्ध करण्याचा परिणामकारक मार्ग असे जे कृत्य असेल ते कृत्य योग्य होईल. माणसाला आपल्या इच्छांचे समाधान पाहिजे असते. तेव्हा ज्या कृत्यांच्या योगे माणसाच्या इच्छांचे समाधान होते ते कृत्य योग्य. त्याला नैतिक म्हणायचे असेल तर ते कृत्य नैतिक. पण माणसाच्या इच्छा मर्यादित असत नाहीत. जन्मापासून मरणापर्यंत त्यांचा प्रवाह चालू असतो तेव्हा त्याच्या इच्छांचे जास्तीतजास्त समाधान ज्याने होईल आणि हे होत असताना त्याच्या कमीतकमी इच्छा विफल होतील अशी जी कृत्ये असतात ती योग्य कृत्ये. हा उपयुक्ततावादी निकष, नियम, किंवा तत्त्व. विवेकवादाचा हा वेगळा अर्थ आहे. पण पहिल्याला पूरक आहे.

परत असा प्रश्न आहे की, माणूस समाजात राहतो. एखादे कृत्य आपले साध्य परिणामकारक रीतीने सिद्ध करण्याचे साधन असेल तर योग्य कृत्य आहे हा जसा निकष, त्याप्रमाणे जर समाजात राहून माणसाने ही कृत्ये करायची असतील तर त्यांचे नियमन करण्यासाठी न्याय हे तत्त्वही विवेकाचे तत्त्व म्हणून घेतले पाहिजे. जे कडवे उपयुक्ततावादी आहेत ते न्याय हे तत्त्व उपयुक्ततावादी तत्त्वाचा एक उपनियम (corollary) मानतात. पण आपण जरा उदारपणे न्यायाचे तत्त्व हे विवेकाचे तत्त्व म्हणून मानू. या दृष्टीने पाहिले तर हे तत्त्व खरे तर समतेचे तत्त्व आहे. ते असे की कोणाही दोन व्यक्तींचे समान सुख असेल तर त्याला कृतींचे साध्य म्हणून समान महत्त्व दिले पाहिजे. बैन्थॅमचे असे वचन आहे की, Every one is to count for one and nobody than one. म्हणजे कोणाचीही गणना एकाहून अधिक अशी करता कामा नये. जमीनदाराच्या सुखाला शूद्राच्या सुखाच्या दुप्पट महत्त्व असणार नाही. याप्रमाणे सर्वांच्या समान सुखाला समान महत्त्व हे विवेकाचे दुसरे तत्त्व आहे.

वैज्ञानिक ज्ञान आणि समान व्यक्तींच्या आचरणाचे निमयन करणारे उपयुक्ततावादी तत्त्व ही दोन तत्त्वे मिळून आधुनिक विवेकवाद, १८ व्या शतकापासून विकसित होत १९ व्या शतकात याप्रमाणे व्यक्त होतो. तो आपल्या विवेकवादी तत्त्ववेत्त्यांनी, उदाहरणार्थ - ज्योतिबा फुले, आगरकर इत्यादींनी स्वीकारला. ह्याच्यातून एक सामाजिक कार्यक्रम निर्माण होतो. तो असा की, ज्या पारंपरिक संस्था आहेत आणि जे (पारंपरिक) वर्तनाचे नियम आहेत त्यांची, आणि जे आचरणाचे दंडक आहेत त्यांची, जसे पारंपरिक ज्ञानाची चिकित्सा वैज्ञानिक ज्ञानाच्या स्वरूपाच्या निकषावर करून ग्राह्य-अग्राह्य याचा हिशोब मांडावा लागतो आणि जे त्याज्य आहे त्याचा त्याग करावा लागतो तसे, म्हणजे पारंपरिक नीतीची- सामाजिक आणि वैयक्तिकसुद्धा - चिकित्सा करून या तत्त्वांच्या आधारावर तिची फेररचना करावी लागते. सर्व व्यक्तीव्यक्तींमधील संबंधांची, या समतेच्या सुखोत्पादक कर्तव्याच्या निकषावर त्यांची चिकित्सा करून जी ह्या दोन तत्त्वांशी सुसंगत असते अशी नीती समाजात रूढ करणे, अशा









संस्था समाजात उभारणे, पूर्वीच्या संस्थांचे विसर्जन करून किंवा त्यांचे विघटन करून - त्यांना बाजूला सारूनसुद्धा - हा एक कार्यक्रम युरोपमध्ये सुरुवातीला स्वीकारला गेला आणि बऱ्याच प्रमाणात पार पाडला गेला. भारतातही तो आपल्या तत्त्ववेत्त्यांनी स्वीकारला. अनेक सुशिक्षितांनीही तो स्वीकारला.

हा विवेकवाद आधुनिक संस्कृतीने मानवजातीला दिलेली एक अतिशय मूल्यवान देणगी आहे असे मी मानतो. हा विवेकवाद एका धार्मिक समाजाच्या विकासाचा टप्पा आहे. हा धार्मिक समाज म्हणजे ख्रिस्ती समाज. ज्या ख्रिस्ती धर्मातून, अध्यात्मिक तत्त्वज्ञानातून, अध्यात्मिक व्यवहारातून त्या समाजाची परंपरा विकसित होत गेली तिच्यात ग्रीक तत्त्वज्ञानाचाही महत्त्वाचा वाटा आहे. ख्रिश्चन थिऑलॉजी-मध्ये ग्रीक संकल्पना आणि सिद्धांत कसे स्वीकारले आहेत आणि जीझसच्या साध्या भोळ्या एका दर्शनाला एका तात्त्विक दर्शनाचे कसे रूप दिले आहे हे आपल्या ध्यानात येते. हा व्यवहार होताना युरोपमध्ये अनेक आततायी प्रकार झाले. फ्रेंच राज्यक्रांतीमध्ये अरिस्टोक्रॅट लोकांबरोबर अनेक निरपराधी लोकसुद्धा मारले गेले. एक प्रकारचा पिसाटपणाही त्या आंदोलनामध्ये झाला. आपल्याकडेही असा प्रकार झाला नाही असे नाही. पण त्याबरोबरच दीर्घ दृष्टिक्षेप टाकला तर तुम्हाला असे आढळेल की, युरोपीय समाजाची समतेच्या तत्त्वावर, न्यायाच्या तत्त्वावर, जीवन अधिक सुखी करणारी जी तत्त्वे असतील तीच नैतिक तत्त्वे, या निकषाला अनुसरून बरीच प्रगती झाली. ही इष्ट अशी गोष्ट आहे असे मी मानतो. त्या प्रकारची प्रगती इथे आपल्याला करावी लागेल आणि हे सर्व केवळ साधारण धर्माच्या दृष्टीने करावे लागेल असे माझे म्हणणे आहे. त्या दृष्टीने हे जे वैचारिक आंदोलन आहे त्याचे आपण स्वागत केले पाहिजे.

पण जसे एका धार्मिक समाजात हे तत्त्वज्ञान निर्माण झाले म्हणून त्याचे जे उपयोजन झाले त्याच्यामागे धार्मिक प्रेरणा, अध्यात्मिक प्रेरणा राहीलच. त्याप्रमाणे जी भारतीय परंपरा आहे तिच्याशीसुद्धा हे जे वैचारिक आंदोलन आहे त्याचा सांधा जुळवला पाहिजे. इथे आपल्याला त्यासाठी अधिक प्रयास पडतील. तिथे ते एका अर्थाने स्वाभाविक झाले. आपण ही देणगी पश्चिमेकडून स्वीकारली आहे. तिचा आणि आपल्या सांस्कृतिक वारशाचा सांधा जोडला पाहिजे आणि तो जोडता येतो असे मला वाटते. तो जोडण्याचा खरा मार्ग म्हणजे 'साधारण धर्मा'चा मार्ग. या संकल्पनेला आपण नैतिक, सामाजिक जीवनात मध्यवर्ती स्थान देणे इष्ट व आवश्यक होय असे मला वाटते. मी याच्यावर भर देतो आहे की, हा जो विवेकवाद आहे तो एका अध्यात्मिक समाजात, काही धारणांवर आधारलेल्या समाजात निर्माण झालेला विचारपंथ आहे. म्हणून, तो आपल्या ठिकाणी प्रमाण असला तरी, त्याला मर्यादा आहेत. त्या मर्यादा मी स्पष्ट करतो. हे माझे विवेचन व्यवहाराच्या, नीतीच्या क्षेत्रापुरते मर्यादित आहे.

आपल्याला नेहमी जे दिसते ते जग आणि वैज्ञानिक उपपत्तीमध्ये जी जगाची कल्पना केलेली असते ते जग एकच आहे काय? त्यांचा संबंध काय आहे हा एक मोठा कूट प्रश्न, तत्त्वज्ञानातला प्रश्न आहे. मी एका पर्वतशिखरावरून न्याहाळतो तो आजूबाजूचा प्रदेश, त्या दऱ्याखोऱ्या, एखादा पाण्याचा प्रवाह, झाडे, प्राणी आणि एक उल्हास माझ्या मनात आहे आणि तो असतानासुद्धा भरून पाहिला आहे असा माझा अनुभव आहे. निळे आकाश मला दिसते आहे. हा जो सबंध अनुभव, जे मला दिसते आहे ते आणि विज्ञानाचे प्रकट केलेले जे जग आहे ते यांचा काय संबंध आहे? मला एखादी गाय दिसते, ती इतकी गोजिरवाणी आहे, निष्पाप आहे की जे वत्सल आहे, सौम्य आहे, निरुपद्रवी आहे, सहनशील आहे त्याचे प्रतीक म्हणून मला ती दिसते. हा माझा अनुभव विज्ञानाने प्रकट केलेले जे जग आहे त्याच्याशी मिळताजुळता आहे? हे प्रश्न वैज्ञानिक उपस्थित करत नाहीत हे ठीक आहे. हे प्रश्न तत्त्ववेत्त्याने उपस्थित केले पाहिजेत. पण त्या बिचाऱ्यांना, विज्ञान येत नसल्यामुळे, विज्ञानाची इतकी दहशत असते, की त्यांच्याकडून त्या प्रकारचे प्रश्न गंभीरपणे उपस्थित केले जाऊ शकत नाहीत. तुम्ही जर phenomenological परंपरा घेतली तर तिच्यात या स्वरूपाचे प्रश्न विचारले जातात, त्यांचा गंभीर विचार होतो. पण त्यांच्यात आणि आमच्यात एक प्रकारचा दुरावा निर्माण झाला आहे. तो दुर्दैवी आहे.

नीतीच्या दृष्टीने असे म्हणता येईल की, मी काही मूल्यांचा विचार करतो. त्यातील एक मूल्य म्हणजे सर्व पंथांतून, अध्यात्मिक पंथांतून दिसणारी तापसवृत्ती (asceticism). म्हणजे अशा रीतीने जगायचे की माझ्या ज्या इच्छा आहेत त्या शक्य तितक्या कमी करायच्या. विशेषत: सुख असावे, स्वास्थ्य असावे - शरीराचे, मनाचे - ही जी माझी अतिशय खोल गरज सतत असते ती मी काबूत आणीन, मी हे स्वातंत्र्य मिळवीन. मी

कोणाच्याही अधीन नाही. रसेलने हे म्हटले आहे, की दोन तऱ्हेचे ॲसेटिसिझम (asceticism) आहेत. त्यात एक स्पार्टन ॲसेटिसिझम आहे. स्पार्टन हे लढवय्ये लोक होते. क्षत्रियाला आपल्या इंद्रियांशी निगडित असलेल्या मोहांवर खराखुरा काबू ठेवावा लागतो, कारण त्याला शरीराने आणि मनाने कणखर असावे लागते. त्याला शरीराला त्रास द्यावा लागतो. त्रास सहन करण्याची ताकद वाढवावी लागते. त्यासाठी त्याला एक ॲसेटिक ट्रेनिंग देतात. हे त्याच्या प्रशिक्षणाचे अंग असते. तसे दुसरे एक अध्यात्मिक ॲसेटिसिझम आहे. मी माझ्या सर्व इंद्रियांवर असा विजय मिळविला पाहिजे की मी त्यांच्या आधीन होणार नाही. हे मूल्य कसे आले? हे माणूस का निर्माण करतो? हे कसे निर्माण होते? आणि एखाद्या विशिष्ट समाजातच निर्माण झालेले - ज्याचा आपण अचंबा करावा - असे हे मूल्य नाही. हे जगाच्या संस्कृतीत अनेक पंथांतून निर्माण झालेले मूल्य आहे. पण आपण आधुनिक दृष्टीने पाहिले तर त्यात विक्षिप्तपणा आहे. समाजात अनेक प्रकारचा आचरटपणा चालतो तसा हाही आहे असे हवे तर म्हणा.

आत्मजाणिवेवर आधारलेल्या नैतिकतेत, मूल्य निर्माण करण्याच्या माणसाच्या सामर्थ्यात या अतीव तत्त्वाची चाहूल आपल्याला लागते. काही विशिष्ट संकल्पनांच्या माध्यमातून ती नेमकी पकडता येते. निर्णायक रीतीने ती पकडता येते, अशी ती आहे. आणि म्हणून इथे माणसाविषयीची, माणसाशी निगडित असलेल्या विश्वाच्या वेगवेगळ्या संकल्पनांची अशी अनेक प्रकारची रचना तुम्हाला आढळते. हासुद्धा मानवी नीतीचा अनिवार्य भाग आहे. ही मानवाची सान्तता (finitude) आहे. त्याची ही सान्तता आहे की त्याला अतीताची जाणीव आहे आणि त्याला हे अतीत ज्ञानामध्ये ग्रहण करता येते आणि ह्याच तणावातून मानवी श्रद्धा निर्माण होते. ही जी श्रद्धा आहे तिचा आविष्कार बौद्धिक रचनांमधून केवळ अनुषंगाने होतो. तिचा खरा आविष्कार जगण्याच्या वेगवेगळ्या पद्धतींतून होतो. गेल्या पिढीतले - आपल्या किंचित अगोदरचे - महान रॅशनलिस्ट म्हणजे बर्ट्रांड रसेल. त्यांचा 'A Free Man's Worship' हा निबंध आपण अवश्य वाचावा, अनेकजण तो हिस्टेरिकल समजतात, तो काहीसा हिस्टेरिकल आहेही. त्यात रसेल म्हणतो की, हे जे भौतिक विश्व आहे त्यात माणूस एकटा आहे आणि सर्व सृष्टीच्या नियमांप्रमाणे त्यातील घडामोडी होत असतात. आणि मी (म्हणजे माणूस) हा अल्पकाळ इथे जगणार. पण मी माझी निष्ठा (integrity) सांभाळत जगणार. मी विश्वातल्या दुर्दम्य अशा शक्तींपुढे वाकणार नाही. जे सत्य आहे, जे सुंदर आहे त्याची उपासना मी करणार. ही श्रद्धा नाही; हे माझे आत्मदर्शन आहे. असे म्हणण्याची मुभा आहे. हे आत्मदर्शन एका प्रकारचे अध्यात्मिक दर्शन आहे. आणि अन्य प्रकारची अशी अध्यात्मिक दर्शने विकसित झालेली आपल्याला माहीत आहेत. हा आता जो विचार मी मांडला त्याचा उगम कांटमध्ये आहे. अन्य दृष्टींनीही त्याचा विस्तार त्याने केला आहे.

रसेल म्हणतो की हा माणसाचा अहंकार आहे. म्हणजे, माणसाला विश्वात एक काहीतरी खास स्थान आहे असे तुम्ही मानता. विज्ञानाच्या दृष्टीने असे कोणाला काही खास स्थान नाही. सर्व वैज्ञानिक पदार्थ आहेत. त्यांच्या वेगवेगळ्या रचना आहेत. त्या कमी-अधिक गुंतागुंतीच्या आहेत. माणूस त्यातलाच एक आहे. असा विनय माणसाने बाळगणे अयोग्य आहे, कारण ती सत्याशी प्रतारणा आहे, असे मला वाटते. माणूस हा प्रश्न उपस्थित करू शकतो ह्याच्यातच त्याला एक स्थान आहे असे दिसून येते. इथे जे अनंत आहे आणि जे सान्त आहे त्याचे क्षितिज माणसात आहे. ह्या त्याच्या सामर्थ्याचा आविष्कार मूल्यांच्या निर्मितीतून, जगण्याच्या पद्धतींचा विकास करण्यातून, जीवनाला अर्थ देण्याच्या शक्तीतून होतो. त्याचे हे जे सामर्थ्य आहे त्याचा उलगडा करणे विवेकवादाच्या पलीकडचे आहे असे मला वाटते.



## ३
## विवेकनिष्ठ जीवन

'एखादा माणूस विवेकवादी आहे' ह्या म्हणण्याच्या अर्थामध्ये तो विवेकानुसारी जीवन जगतो (निदान तसे जगण्याचा प्रयत्न करतो) हे म्हणणे ज़र अंतर्भूत असेल, तर विवेकानुसारी जीवनक्रमाचे स्वरूप तरी काय असते ह्या प्रश्नाला तोंड द्यावे लागेल. माणसाने कोणत्या तत्त्वांचे व नियमांचे पालन आपल्या आचरणात करणे योग्य असते असे विवेकशक्तीला अनुसरून ठरते? किंवा कोणती साध्ये प्राप्त

अनुक्रमणिका

करून घेण्याचा प्रयत्न करणे योग्य असते असे विवेकशक्ती म्हणते? कदाचित हे दोन भिन्न प्रश्न नसून ही एकाच प्रश्नाची दोन प्रकारे केलेली मांडणी असेल.

दुसरा एक प्रश्न उपस्थित होतो. समजा, विवेक-शक्तीपासून आचरणाची योग्य तत्त्वे किंवा साध्ये निष्पन्न होतात. मग प्रश्न उपस्थित होतो तो असा : विश्वात काय आहे, काय घडते आणि ते कसे घडते ह्याचे यथार्थ ज्ञान प्राप्त करून देणारी विचारपद्धती विवेकाकडूनच आपल्याला लाभते असे विवेकवादाचे म्हणणे आहे. ह्या पद्धतीला अनुसरून जे प्रमाण ठरते ते सर्व स्वीकारावे आणि अन्य कशावर विश्वास ठेवू नये ही विवेकवादी भूमिका आहे. ह्या निर्णयपद्धतीचा, सोयीसाठी, वैज्ञानिक पद्धतीचा आणि ज्या तत्त्वांवर किंवा साध्यांवर विवेकानुसारी जीवनसरणी आधारलेली असते त्यांचा परस्परसंबंध काय असतो? ही तत्त्वे किंवा साध्ये वैज्ञानिक पद्धतीला अनुसरून प्रमाण ठरतात का? पण असे असणे प्रथमदर्शनी तरी अशक्य दिसते. कारण वैज्ञानिक पद्धती केवळ काय आहे आणि काय घडते ह्याचे यथार्थ ज्ञान आपल्याला देऊ शकते. उदाहरणार्थ, माणसांची कृत्ये ह्या विश्वात घडणाऱ्या काही घटना आहेत. तेव्हा घटना कशा घडतात, मानवी वर्तन कसे घडून येते ह्याचे ज्ञान वैज्ञानिक पद्धतीला अनुसरून आपण प्राप्त करून घेऊ शकू. पण माणसाने कसे वागावे, कोणती कृत्ये करणे योग्य असते, ह्याचे ज्ञान वैज्ञानिक पद्धती आपल्याला देऊ शकत नाही.

मग असे म्हणता येईल का, की जिला आपण विवेकशक्ती म्हणतो तिचे दोन घटक असतात. एका घटकापासून वैज्ञानिक पद्धती ज्या तत्त्वांवर आणि संकल्पनांवर आधारलेली असते त्यांची निष्पत्ती होते आणि योग्य आचरणाची जी तत्त्वे आहेत त्यांचा उगम विवेकशक्तीच्या दुसऱ्या घटकात असतो. पण मग पुढचा प्रश्न असा की, हे दोन घटक एकाच विवेकशक्तीचे घटक आहेत असे का मानावे? म्हणजे वैज्ञानिक पद्धतीचे स्वरूप निश्चित करणारी तत्त्वे आणि मानवाला योग्य अशा जीवनक्रमाचे स्वरूप निश्चित करणारी तत्त्वे ही दोन्ही विवेकानुसारी, विवेकजन्य आहेत असे मानायला आधार काय? असे मानायचे तर या दोन प्रकारच्या तत्त्वांत काही साम्य असले पाहिजे आणि हे साम्य ही दोन्ही प्रकारची तत्त्वे विवेकजन्य असण्याशी निगडित असले पाहिजे. तेव्हा योग्य जीवनक्रमाचे स्वरूप निश्चित करणारी विवेकजन्य तत्त्वे कोणती आहेत आणि ह्या प्रश्नाचे उत्तर म्हणून जी तत्त्वे नमूद करण्यात येतील आणि ती विवेकाधिष्ठित आहेत हे कशाच्या आधारे ठरविता येते, असे आपले दोन प्रश्न आहेत.

विवेकशक्ती अशी एक विशिष्ट, जिला आपण ओळखू शकतो अशी ज्ञानशक्ती आहे आणि तिच्यापासून जी तत्त्वे निःसृत होतात ती तिच्यापासून निःसृत झालेली असतात म्हणून प्रमाण असतात अशी भूमिका स्वीकारणे विचित्र ठरेल. काही तत्त्वे त्यांची चिकित्सा केली असता प्रमाण असल्याचे दिसून येते आणि ती प्रमाण असल्याचे दिसून येत असल्यामुळे त्यांचा स्वीकार करणे आणि अनुसरणे विवेकानुसारी ठरते असे आपण म्हटले पाहिजे. मग आपल्यापुढे दोन प्रश्न उपस्थितीत होतात. वैज्ञानिक विचारपद्धती ज्या तत्त्वांवर आधारलेली आहे ती कशामुळे प्रमाण ठरतात? त्यांच्या प्रामाण्याचा अर्थ काय? पण, हा आता आपल्यापुढे असलेला प्रश्न नाही. येथे आपल्यापुढे असलेला प्रश्न दुसरा आहे. योग्य जीवनक्रम ज्या तत्त्वांवर आधारलेला असतो त्यांचे प्रामाण्य कसे ठरते? ह्या प्रश्नाचे एक सरळ, साधे उत्तर आहे असे अनेक विवेकवाद्यांना वाटते; पण वस्तुस्थिती तशी नाही.

विवेकनिष्ठ दृष्टीपासून दोन नकारी निष्कर्ष निष्पन्न होतील. धार्मिक श्रद्धेवर नैतिक नियमांचे प्रामाण्य आधारता येणार नाही हा एक निष्कर्ष. पण हा निष्कर्ष स्वीकारला म्हणून धार्मिक श्रद्धेवर आधारलेल्या एखाद्या विशिष्ट नीतीचा आशय, या विशिष्ट नीतीला आधारभूत असलेली तत्त्वे आणि नियम, त्याज्य ठरतात असे नाही. ही तत्त्वे आणि नियम यांना धार्मिक श्रद्धेचा पाठिंबा आहे म्हणून ती प्रमाण ठरतात असे म्हणता येणार नाही. पण तरीही ती प्रमाण असू शकतील. ती प्रमाण आहेत की नाहीत हे चिकित्सापूर्वक ठरवावे लागेल. ही चिकित्सा करण्याची योग्य पद्धती कोणती, नैतिक नियमांचे प्रामाण्य ज्यांच्या कसोटीवर ठरविणे योग्य असते असे त्यांच्या प्रामाण्याचे निकष कोणते, हे कसे ठरविणार, हा प्रश्न आहे.

विवेकनिष्ठ दृष्टीपासून निष्पन्न होणारा दुसरा निष्कर्ष असा की, वैज्ञानिक पद्धतीला अनुसरून ज्या वस्तूंचे अस्तित्व सिद्ध करता येत नाही त्यांच्याशी संबंधित अशी साध्ये माणसाने स्वीकारणे गैर आहे, हे गैर आहे, कारण अशी साध्ये खरीखुरी नसतात, भ्रामक असतात; म्हणजे, ती गाठणे अशक्य असते, ती गाठणे अतिशय दुर्घट असते. मानवी शक्तीच्या पलीकडेच असते आणि म्हणून ती गाठणे अशक्य असते असे नव्हे, तर ती







अनुक्रमणिका

साध्ये म्हणजे ज्या अस्तित्वात अशू शकतील अशा वस्तूच नसल्यामुळे ती गाठली गेली आहेत अशी वस्तुस्थिती असणेही अशक्य असते. उदाहरणार्थ, परब्रह्म असे काही नाही असे वैज्ञानिक पद्धतीप्रमाणे ठरते. म्हणून परब्रह्माशी एकरूप होणे हे योग्य साध्य होऊ शकत नाही. परब्रह्म नसल्यामुळे त्याच्याशी एकरूप झाले असण्याची स्थिती असू शकत नाही, म्हणून ती प्रयत्नाने साधता येत नाही आणि म्हणून हे भ्रामक साध्य ठरते. वर्तुळाशी सम असा चौकोन असू शकत नाही, म्हणून वर्तुळाशी सम असलेला चौकोन ज्याने काढला आहे असा माणूस असू शकत नाही आणि म्हणून गुप्त पोलिस कितीही चतुर आणि इमानाने काम करणारे असले तरी ते अशा माणसाचा शोध लावू शकणार नाहीत.

हे मान्य करूनही योग्य मानवी आचरणाचे स्वरूप निश्चित करणाऱ्या तत्त्वांचे प्रमाण्य निश्चित करण्याची किंवा योग्य मानवी साध्ये निश्चित करण्याची पद्धत कोणती हा प्रश्न उरतोच. उदाहरणार्थ, व्यासमुनी आपल्याला असे सांगतात, की परोपकार पुण्यप्रद असतो आणि परपीडन पापप्रद असते. आता, 'पुण्य' आणि 'पाप' ह्या गूढ संकल्पना आहेत म्हणून वैज्ञानिक पद्धतीला अनुसरुन त्या अप्रमाण आहेत असे मानू. एखादा माणूस दयाळू आहे की नाही हे तो कोणत्या परिस्थितीत कसे वर्तन करतो ह्याचे निरीक्षण करून ठरविता येते. म्हणून 'दयाळू' ही संकल्पना अनुभवाधिष्ठित आहे आणि ह्या संकल्पनेचा उपयोग करून एखाद्या माणसाचे वर्णन करणारे विधान सत्य आहे की नाही हे अनुभवाच्या आधारे ठरविता येते. पण एखादा माणूस पुण्यवान आहे की नाही हे असे निरीक्षणाच्या आधारे ठरविता येत नाही. तेव्हा ह्या स्वरूपाचे विधान वैज्ञानिक पद्धतीला अनुसरुन सत्य म्हणून स्वीकारता येत नाही.

आपण वरील व्यासोक्तीचे भाषांतर करू : इतरांचे भले करणारी, त्यांचे कल्याण साधणारी कृत्ये करणे योग्य असते आणि इतरांना अपाय करणारी, त्यांचे अकल्याण करणारी कृत्ये करणे अयोग्य असते. (योग्य आणि अयोग्य ह्या संकल्पना अनुभवाधिष्ठित नाहीत, निरीक्षणाने 'काय आहे' हे आपल्याला कळून येऊ शकते. काय असले पाहिजे, काय असणे योग्य आहे हे कळू शकत नाही हे आपण पाहिले. पण ह्यामुळे आपला प्रश्न उपस्थित करण्यात काही अडचण येत नाही. कारण 'कोणती कृत्ये करणे योग्य असते?' किंवा 'कोणती साध्ये स्वीकारणे योग्य असते?' ह्या प्रश्नांची प्रमाण उत्तरे देण्याची पद्धत आहे व ती वैज्ञानिक पद्धतीहून वेगळी आहे हे आपण गृहीत धरलेले आहे. फक्त ही कोणती पद्धती आहे ह्याचा विचार आपण करीत आहोत.) तेव्हा आपला प्रश्न असा आहे : 'इतरांचे कल्याण साधणारी किंवा साधू पाहणारी कृत्ये करणे योग्य असते' हे तत्त्व प्रमाण आहे हे कोणत्या पद्धतीला अनुसरून ठरविता येते? हा प्रश्न म्हणजे दोन प्रश्न आहेत. माणसाचे कल्याण किंवा हित कशात असते, मानवी कल्याणाचा आशय काय असतो ह्याचा निर्णय करण्याची योग्य पद्धती कोणती? दुसरा प्रश्न असा, की ह्या पहिल्या प्रश्नाचे उत्तर काही असो इतरांचे कल्याण साधणारी कृत्ये करणे योग्य असते ह्या तत्त्वाचे प्रामाण्य (किंवा अप्रामाण्य) प्रस्थापित करण्याची योग्य पद्धती कोणती? पहिला प्रश्न सध्या बाजूला ठेवू. दुसऱ्या प्रश्नाचे उत्तर आपण कसे देणार? आपण हे लक्षात घेतले पाहिजे की, आपण कसे वागणे योग्य असते हे सांगणारे हे तत्त्व आहे. समजा, एखादा माणूस असे म्हणाला, 'काही लोकांची प्रवृत्ती माझे भले करण्याची असते आणि काही लोकांची प्रवृत्ती माझे वाईट करण्याची असते. जे माझे भले करतात ते मला आवडतात. त्यांना मी चांगले म्हणतो. जे माझे वाईट करतात त्यांना मी वाईट म्हणतो.' इतर माणसांचेही असेच असते. तेही त्यांचे जे भले करतात त्यांना चांगले म्हणतात. आता प्रत्येकाला इतरांनी आपल्याला चांगले मानावे आणि म्हणावे असे वाटत असते. तेव्हा त्याने इतरांचे शक्य तितके भले करणे शहाणपणाचे आणि म्हणून योग्य ठरेल. हे म्हणणे मान्य होण्यासारखे आहे.

पण ते माणसे कशी असतात, कशी वागतात, त्यांच्या इच्छा कोणत्या असतात आणि त्या तृप्त होण्याचे मार्ग कोणते ह्याच्याविषयीचे म्हणणे आहे. आपल्यापुढे असलेले तत्त्व वेगळ्या प्रकारचे तत्त्व आहे. माणसाने कसे वागणे, कोणत्या प्रकारची कृत्ये करणे योग्य आहे हे सांगणारे हे तत्त्व आहे. सर्व किंवा बहुसंख्य माणसे, सर्व किंवा बहुसंख्य प्रसंगी कोणत्या प्रकारची कृत्ये करतात आणि ह्या कृत्यांना कोणत्या प्रकारच्या प्रतिक्रिया होतात हे निरीक्षणाने कळू शकेल. कोणत्या प्रकारची कृत्ये करणे योग्य असते हे सांगणारे तत्त्व निरीक्षणाच्या आधारे प्रस्थापित करता येणार नाही.

एखाद्या प्रकारचे कृत्य मी करणे योग्य आहे असे जेव्हा मी मानतो तेव्हा त्या प्रकारचे कृत्य करणे माझ्यावर बंधनकारक









आहे असे मी मानतो. त्या प्रकारचे कृत्य मी केले नाही तर माझे वर्तन दोषार्ह ठरते. आणि ह्याचा अर्थ, ह्या परिस्थितीत सर्व किंवा बहुसंख्य माणसे, त्यांना माझ्या वर्तनाची कल्पना आली की मला दोष देतील असा नाही; तर कुणीही माझ्या वर्तनामुळे मला दोष देणे योग्य ठरेल असा आहे. सर्व किंवा बहुसंख्य माणसे एका विशिष्ट प्रकारच्या परिस्थितीत कशी वागतात एवढेच सांगणारा नियम आपल्यापुढे असेल आणि त्या परिस्थितीत तशा प्रकारे मी वागत नसेन, तर वरील नियमाला मी अपवाद आहे एवढेच ठरेल. अर्थात सर्व माणसे ह्या प्रकारच्या परिस्थितीत अशी वागतात हा नियम माझ्या अपवादामुळेच कोलमडेल. बहुसंख्य माणसे तशी वागतात ह्या स्वरूपात फार तर तो नियम लागू राहील. माझे वागणे विक्षिप्त आहे असे म्हणता येईल. पण 'विक्षिप्त' ह्याचा अर्थ बहुसंख्य वागतात त्याहून वेगळ्या प्रकारे वागणारा एवढाच राहील. ह्या अर्थाने दिगंबर अवस्थेत वावरणाऱ्या स्त्री-पुरुषांच्या वसाहतीत कपडे घालणारे माणूस विक्षिप्त ठरेल. पण 'विक्षिप्त' ह्या वर्णनात हे वागणे कोणत्याही प्रकारे किंवा प्रमाणात गैर, अनुचित आहे असे अभिप्रेत असणार नाही.

पण कुणीही माणसाने विशिष्ट प्रकारच्या परिस्थितीत कसे वागणे योग्य आहे हे सांगणाऱ्या नियमाप्रमाणे मी जर वागलो नाही तर माझे असे वागणे त्या नियमाला अपवाद आहे असे होत नाही; त्या नियमाचा मी भंग केला असे होते. माझे वागणे गैर ठरते. माणसांच्या हातून जे वर्तन घडते त्याचे मूल्यमापन करणारा मानदंड उपलब्ध करून देणारा हा नियम असतो. माणसाने कसे वागावे ह्याचा आदेश देणारा तो नियम असतो.

ह्या प्रकारच्या नियमांचे प्रामाण्य आपण कसे प्रस्थापित करू शकतो, हा आपल्यापुढील प्रश्न आहे आणि ह्याचे एक सहज सुचणारे असे उत्तर आहे. 'इतरांचे कल्याण ज्यामुळे होईल अशी कृत्ये माणसाने करणे योग्य आहे.' हे तत्त्व प्रमाण आहे हे आपल्याला सरळ दिसून येते असे आपण म्हणू शकू. उदाहरणार्थ, 'कुठल्याही दोन वस्तू जर एकाच तिसऱ्या वस्तूशी समान असल्या तर त्या परस्परांशी समान असतात' हे विधान घ्या. हे सत्य आहे असे आपण मानतो. पण हे सत्य निरीक्षणावर आधारलेले नाही. निरीक्षणाने फार तर ह्या विधानाच्या सत्यतेचे प्रत्यंतर आपल्याला येईल. ह्या सत्यतेचे ग्रहण करायला उपयोगी ठरेल असे एक मूर्त उदाहरण आपल्याला लाभेल. पण हे तत्त्व सार्वत्रिकतेने सत्य आहे असे आपण मानतो आणि ह्या तत्त्वाच्या सार्वत्रिक सत्यतेचे ग्रहण आपण करतो ते निरीक्षणापासून लाभलेल्या पुराव्याच्या आधारावर करीत नाही. हे विधान सत्य आहे हे युक्तिवादाने सिद्ध करता येत नाही. पण ते सिद्ध करावे लागतही नाही. ह्या विधानाचा अर्थ जेव्हा आपल्या ध्यानात येतो, तेव्हा ते सत्य असलेच पाहिजे ह्याचे आपल्याला सरळ साक्षात आकलन होते.

आपल्याला असे म्हणता येईल की, आपल्या ज्ञानशक्तीची घडणच अशी आहे की कित्येक मूलभूत तत्त्वे प्रमाण आहेत ह्याचे तिला साक्षात आकलन होते. त्यांचे प्रामाण्य सिद्ध करावे लागत नाही आणि ते सिद्ध करताही येत नाही. कारण ही तत्त्वे इतकी मूलभूत असतात की, काहीही सिद्ध करायचे झाले तर ते ह्या तत्त्वांच्या आधारानेच सिद्ध करावे लागते आणि म्हणून त्यांचे प्रामाण्य सिद्ध करण्यासाठीही त्यांचा स्वतःचा आधार घ्यावा लागतो. तेव्हा त्यांचे प्रामाण्य सिद्ध करण्याचा प्रयत्न व्यर्थ असतो, पण तो अनावश्यकही असतो.

तेव्हा आपण असे म्हणू की, माणसाने कोणत्या प्रकारची कृत्ये करणे योग्य असते हे सांगणारी मूलभूत तत्त्वे अशी असतात की, माणसाच्या ज्ञानशक्तीला त्यांचे प्रामाण्य साक्षात प्रतीत होते. उदाहरणार्थ, 'सर्व माणसे समान आहेत आणि सर्वांना समान हक्क असतात' हे एक मूलभूत तत्त्व आहे. हे प्रमाण आहे असे आपल्याला साक्षात प्रतीत होते. त्याचे प्रामाण्य सिद्ध करता येत नाही, पण सिद्ध करावे लागतही नाही.

पण आता एक अडचण उभी राहते. ती अशी की, ज्या तत्त्वांचे प्रामाण्य अशा रीतीने आपल्या ज्ञानशक्तीला साक्षात प्रतीत होते असे आपण म्हणू, त्यांच्या प्रामाण्याविषयी एकवाक्यता असली पाहिजे, अशी आपली अपेक्षा राहील. 'एकाच वस्तूशी समान असलेल्या कोणत्याही दोन वस्तू परस्परांशी समान असतात' ह्या विधानाच्या प्रामाण्याविषयी दुमत आढळत नाही. एखाद्याने ह्या विधानाच्या सत्यतेविषयी संशय व्यक्त केला, तर ह्या विधानाचा अर्थ त्याला नीट कळलेला नाही असे आपण म्हणू आणि तो त्याला समजावून देऊ. पण 'सर्व माणसे समान आहेत आणि सर्वांना समान हक्क असतात' ह्या तत्त्वाविषयी अशी एकवाक्यता नाही.

अनुक्रमणिका

उदाहरणार्थ, भगवान मनुमहर्षी ह्यांना हे तत्त्व पूर्णपणे अमान्य होते. इहवादी भारतात मनूचा हवाला देणे गैर असल्यामुळे आदरणीय व्यक्तींचा निर्देश करू. प्लेटो आणि ॲरिस्टॉटल यांना हे तत्त्व अमान्य होते आणि इस्लामचे प्रेषित महंमद पैगंबर यांनाही ते अमान्य होते. आणि ह्यांसारख्या विभूतींना ह्या तत्त्वाचा अर्थ नीट न कळल्यामुळे त्याचे प्रामाण्य त्यांना प्रतीत झाले नाही असे म्हणणे धाष्टर्याचे ठरेल.

समजा, परंपरागत हिंदू संस्कृतीत वाढलेली एखादी बाई म्हणाली की, 'नवरा बायकोशी कसाही वागला तरी बायकोने नवऱ्याशी पूर्णपणे एकनिष्ठ राहून त्याची सेवा करणे योग्य असते. हे तत्त्व प्रमाण आहे असे माझ्या ज्ञानशक्तीला साक्षात प्रतीत होते' हे ती अतिशय प्रामाणिकपणे म्हणत असेल पण तिची ही प्रतीती आपण प्रमाण म्हणून मान्य करणार नाही. आपण पुरोगामी असू, तर तिचे ब्रेनवॉशिंग झाले आहे; तिच्यावर वेडगळ संस्कार करण्यात आले आहेत; तिची पिळवणूक करण्यात येत आहे, पण ते तिला समजत नाही, असे आपण म्हणू. 'पुरुषाला (चारपर्यंत) अनेक स्त्रियांशी लग्न करण्याचा हक्क असतो' हे विधान प्रमाण आहे अशी साक्षात प्रतीती जर एखाद्या मुसलमान स्त्रीला झाली तर, आपण पुरोगामी असू तर, आपण मोठ्याने काही बोलणार नाही; पण तरीही ही प्रतीती प्रमाण आहे असे आपण मानणार नाही.

असे असते का, की व्यक्ती ज्या संस्कृतीत वाढली असेल त्या संस्कृतीला घडविणाऱ्या प्रथा, चालीरीती, रूढी, संकेत, नियम, आदर्श प्रमाण आहेत असा साक्षात प्रत्यय तिला येतो? असे असेल तर नीती आणि मूल्ये संस्कृतिसापेक्ष असतात असे म्हणावे लागेल. मग 'विवेकाधिष्ठित जीवनसरणी' ह्या संकल्पनेला अर्थ राहतो का? ह्या प्रश्नांना तोंड दिल्याशिवाय विवेकवाद्यांना आपली भूमिका मांडायला सुरुवातही करता येणार नाही.



## ४
## विवेकवाद

विवेकवाद ही सामाजिक समता, समाजवाद, इहवाद, पुरोगामित्व ह्या गोष्टींप्रमाणेच एक चांगली गोष्ट आहे, ह्याविषयी सर्व सत्प्रवृत्त व्यक्तींचे एकमत आहे. ह्या सर्व चांगल्या गोष्टी आहेत, असे जाहीर केल्यानंतर त्यांच्याविषयी अधिक विचार करण्याचे कारण नाही ह्याविषयी महाराष्ट्रातील सत्प्रवृत्त मंडळींचे, काही अपवाद सोडता, एकमत दिसते.

जर एखाद्या माणसाने 'सामाजिक समता म्हणजे काय?' आणि 'सामाजिक समता चांगली आहे असे का मानावे?' असे प्रश्न उपस्थित केले तर तो आडमुठा आहे हे स्पष्ट होईल. जेथे एकमताचा सुसंवाद नांदत आहे तेथे भलते प्रश्न उपस्थित करून त्याच्यात बिघाड निर्माण करण्याचा प्रयत्न करणे हे आडमुठेपणाचे लक्षण आहे. हे प्रश्न त्याने गंभीरपणे विचारले असतील, म्हणजे सामाजिक समता चांगली आहे की नाही असा संशय खरोखर त्याच्या मनात असेल, तर तो सत्प्रवृत्त नाही ह्याचे ते निदर्शक ठरेल. कारण विवेकवाद, सामाजिक समता, समाजवाद, इहवाद आणि पुरोगामित्व ह्या चांगल्या गोष्टी आहेत असे जो मानतो तो सत्प्रवृत्त अशी सत्प्रवृत्तपणाची व्याख्याच आहे.

पण समजा, 'एखाद्याने विवेकवाद म्हणजे काय?' हा प्रश्न आडमुठेपणे उपस्थित केला, आणि अधिक आडमुठेपणे त्याचा पिच्छा सोडला नाही, तर त्याचे समाधान कसे करता येईल? पाश्चात्त्य तत्त्वज्ञानाच्या इतिहासाशी परिचय असलेल्यांपुढे जी एक शाब्दिक अडचण उभी राहील तिचे सुरुवातीलाच थोडक्यात निवारण करणे इष्ट ठरेल. विवेकवाद (रॅशनॅलिझम) ही ज्ञानमीमांसेतील एका उपपत्तीला देण्यात येणारी संज्ञा आहे. ही उपपत्ती थोडक्यात अशी मांडता येईल : इंद्रियानुभवाने आपल्याला इंद्रियगोचर वस्तूंच्या अस्तित्वाचे, त्यांच्या गुणधर्मांचे, त्यांच्यामधील परस्परसंबंधांचे आणि त्यांच्यात घडणाऱ्या बदलांचे ज्ञान होते. पण हे ज्ञान कनिष्ठ प्रकारचे ज्ञान असते; कारण ते पूर्णपणे प्रमाण असे ज्ञान नसते. पण पूर्णपणे संशयातीत, अनिवार्यपणे सत्य असलेले ज्ञान असते; आणि हे ज्ञान आपल्याला अनुभवापासून प्राप्त होत नाही, ते विवेकशक्तीपासून प्राप्त होते. गणिती ज्ञान हा आदर्श मानवी ज्ञानाचा नमुना आहे आणि ते विवेकजन्य असे ज्ञान आहे. आता विवेकवादाचा सिद्धांत असा की, वस्तूंविषयीचे किंवा विश्वाविषयीचे किंवा जे म्हणून अस्तित्वात आहे त्याचे गणिती ज्ञानाप्रमाणे संशयातीत आणि अनिवार्यपणे सत्य असलेले असे ज्ञान आपल्याला प्राप्त करून घेता येते; हे ज्ञान अनुभवापासून प्राप्त होत नाही, ते विवेकशक्तीपासून प्राप्त

अनुक्रमणिका

होते. ह्या विवेकवादी सिद्धांताच्या विरोधी सिद्धांताचा पुरस्कार अनुभववादाने केला. अनुभववादाचा गाभा हा की वस्तूविषयीचे, जे आहे त्याच्याविषयीचे ज्ञान अनुभवाआधारेच होऊ शकते. आणि अनुभवाधिष्ठित ज्ञान जर संशयास्पद असेल तर, वस्तूविषयीचे ज्ञान अनुभवाधिष्ठितच असल्यामुळे, वस्तूविषयी संशयातीत असे ज्ञान आपल्याला होऊ शकत नाही, एवढाच निष्कर्ष ह्यापासून निघतो.

सतराव्या आणि अठराव्या शतकांतील युरोपियन तत्त्वज्ञानाचा इतिहास हा प्रामुख्याने विवेकवाद आणि अनुभववाद यांच्यामधील विवादाचा इतिहास आहे असे त्याचे वर्णन करणे योग्य ठरेल. ह्या वादाचा निकाल कान्टने लावला, आणि एकंदरीत हा निकाल विवेकवादाविरुद्ध गेला. अनुभवाच्या आधाराशिवाय वस्तूंचे, जे आहे त्याचे, ज्ञान होऊ शकते; असे ज्ञान प्राप्त करून देणारी ज्ञानशक्ती आपल्यापाशी आहे हा विवेकवादाचा मूल सिद्धांत त्याज्य ठरला. पण विवेकवादाचा पुरस्कार आज आपल्याकडे करण्यात येतो, विशेषत: आपल्या जीवनात आपण विवेकवादाची कास धरली पाहिजे, आपली नीती विवेकवादावर आधारलेली असली पाहिजे असे जेव्हा म्हणण्यात येते, तेव्हा तत्त्वज्ञानाच्या इतिहासात एकेकाळी प्रभावी असलेला आणि नंतर ओसरून गेलेला हा विवेकवाद आपल्याला अभिप्रेत नसतो. हा दुसरा विवेकवाद कशाचा पुरस्कार करतो आणि कशाचा अव्हेर करतो?

थोडक्यात असे म्हणता येईल की, ह्या अर्थाने विवेकवाद म्हणजे आपल्या समजुती, विश्वास सत्य किंवा स्वीकारार्ह ठरविण्याची, किंवा असत्य व / किंवा त्याज्य ठरविण्याची एक विशिष्ट पद्धती आहे. आपले विश्वास, म्हणजे आपण स्वीकारलेली विधाने, सत्य कशावरून ठरतात आणि असत्य कशावरून ठरतात ह्याचा निकष विवेकवादापासून लागतो. विवेकवादी असणे म्हणजे ह्या पद्धतीला अनुसरून जी विधाने सत्य ठरतील तेवढीच सत्य म्हणून स्वीकारणे, जी सत्य ठरणार नाहीत ती सत्य म्हणून न स्वीकारणे; ही पद्धती म्हणजे वैज्ञानिक पद्धती अनुभवावर आधारलेली असते, ह्यात शंका नाही. पण अनुभवाला गोचर असणाऱ्या पदार्थांचे आणि घटनांचे जे गुणधर्म आपल्या साक्षात प्रत्ययाला आले असतील तेवढ्याचे वर्णन करण्यावर वैज्ञानिक पद्धती समाधानी नसते. म्हणजे 'हे पाणी त्या पाण्याहून अधिक गरम आहे', 'सूर्य उगवताना लाल दिसतो', 'ह्या झाडांची पाने डिसेंबर महिन्यात गळून पडली', ह्यासारख्या आपल्या अनुभवाच्या आधारे ज्यांची सत्यता सिद्ध झाली आहे अशी विधाने नमूद करून वैज्ञानिक पद्धती थांबत नाही. 'अणू', 'मूलभूत कण', 'विद्युत्चुंबकीय क्षेत्र', इत्यादी इंद्रियातीत - ज्यांचा आपल्याला साक्षात अनुभवातून प्रत्यय येत नाही अशा - पदार्थांचे गुणधर्म आणि शक्तींचे अस्तित्वही विज्ञानात मानले जाते, आणि त्यांचे अस्तित्व व गुणधर्म वैज्ञानिक पद्धतीला अनुसरून प्रस्थापित झाले आहेत म्हणून मानले जाते.

तेव्हा, वैज्ञानिक पद्धती आपल्या साक्षात अनुभवांचे वर्णन करणाऱ्या विधानांपलीकडे जाते. आपल्या अनुभवाला आलेल्या पदार्थांच्या गुणधर्मांचा आणि घटनांचा उलगडा करण्यासाठी वैज्ञानिक पद्धतीमध्ये गृहीतक (हायपॉथिसिस) रचण्यात येते. आणि हे गृहीतक मुक्त असते. इंद्रियातीत अशा पदार्थांची आणि शक्तींची कल्पना करायला आणि त्या आहेत असे मानायला गृहीतक मोकळे असते. त्याला एवढीच अट पाळावी लागते, की एक तर ह्या कल्पना स्पष्ट असल्या पाहिजेत; ह्या कल्पित पदार्थांच्या आणि शक्तींच्या ठिकाणी नेमके कोणते धर्म असल्याचे आपण कल्पिलेले आहे, हे निश्चित असले पाहिजे - म्हणजे या कल्पिलेल्या धर्मांना अनुसरून, ह्या धर्मांचा परिणाम म्हणून विशिष्ट परिस्थितीत हे पदार्थ व शक्ती कशा वागतील, कोणत्या घटना घडून येतील ह्याचे निगमन (डिडक्शन) करता येत असले पाहिजे - आणि हे पदार्थ आणि शक्ती यांच्या कल्पिलेल्या स्वभावधर्मापासून, विशिष्ट परिस्थितीत, जे परिणाम घडून येतील असा निष्कर्ष प्राप्त होत असेल त्या परिणामांचा इंद्रियानुभवात, म्हणजे निरीक्षणाने, पडताळा घेता आला पाहिजे. जे परिणाम घडून येतील असा निष्कर्ष असेल ते घडून आले असे निरीक्षणाने आढळून आले, तर ही सर्व कल्पित रचना प्रमाण, ग्राह्य ठरते. उलट हे निष्कर्ष आणि निरीक्षणाला आढळून आलेली प्रत्यक्ष वस्तुस्थिती यांच्यात विसंगती असेल तर गृहीतक आहे त्या स्वरूपात त्याज्य ठरते. त्याच्यात काही बदल तरी करावे लागतील किंवा ते समूळ बाजूला सारून त्याच्या जागी वेगळी कल्पित रचना, वेगळे गृहीतक रचावे लागेल.

तेव्हा, वैज्ञानिक पद्धती अनुभवावर आधारलेली असते; अनुभवांचे सार्वभौम प्रामाण्य मान्य करते; पण

अनुभवाला येणांऱ्या घटनांचा उलगडा करताना ज्या संकल्पनांचा आणि उपपत्तींचा वापर वैज्ञानिक पद्धती करते त्या, अनुभवाच्या साक्षात क्षेत्रात असलेले पदार्थ आणि घटना यांनी सीमित झालेल्या नसतात. ह्या संकल्पना आणि उपपत्ती आपण मुक्तपणे कल्पू शकतो. फक्त ह्या मुक्त कल्पना, त्यांच्यापासून तार्किक अनुमाने निष्पन्न होणारे निष्कर्ष, अनुभवाशी जुळणारे असले पाहिजेत. अनुभवाचे जोखड झुगारुन देऊन कल्पनाशक्तीने केलेला स्वैर संचार आणि ह्या संचारानंतर अनुभवाकडे परतण्याचे, त्याचा निष्कर्ष स्वीकारण्याचे तिने पत्करलेले बंधन, या दोहोंचा - ही स्वैरता आणि शिस्त यांचा - संगम हे वैज्ञानिक पद्धतीचे स्वभाववैशिष्ट्य आहे आणि ह्याच्यात वैज्ञानिक पद्धतीच्या प्रमाण ज्ञानाचा आवाका वाढविण्याच्या अमोघ सामर्थ्याचे बीज आहे.

नैसर्गिक विज्ञानात - भौतिकी, रसायनशास्त्र, जीवशास्त्र इत्यादी - लागलेले शोध आणि त्यांच्यावर आधारलेले तंत्रज्ञान ही वैज्ञानिक पद्धतीची सर्वात नाट्यपूर्ण व रोमहर्षक फळे आहेत. पण जेथे जेथे वस्तुस्थिती काय आहे ह्याचा शोध घ्यायचा असतो तेथे तेथे तो वैज्ञानिक पद्धतीच्या आधारेच घ्यावा लागतो. पोलिसापेक्षा अधिक चतुर, चाणाक्ष आणि निरीक्षणकुशल असलेला डिटेक्टिव्ह गुन्ह्याचे रहस्य जेव्हा शोधून काढतो तेव्हा तो वैज्ञानिक पद्धतीचा वापर करीत असतो. पोलिसांच्या निरीक्षणातून निसटलेल्या काही अर्थपूर्ण घटना आणि कृत्ये त्याच्या ध्यानी आलेल्या असतात. कोणी काय, का केले असेल ह्याविषयीचे आडाखे - ज्यांना प्रौढ भाषेत गृहीतक म्हणतात - बांधण्यात तो अधिक पटाईत असतो, पण हे आडाखे त्याला निरीक्षणाद्धारे जमविलेल्या अतिशय टणक पुराव्याच्या आधारे सिद्ध करावे लागतात. 'गुन्हा कोणी, कधी, कसा केला?' 'पानिपतच्या लढाईच्या पूर्वी, लढाईत व नंतर खरोखर काय घडले?' ह्यांसारख्या प्रश्नांची उत्तरे इतिहासकार वैज्ञानिक पद्धतीला अनुसरून देत असतो. थोडक्यात 'काय, काय आहे, काय घडले होते, काय घडत आहे, काय घडेल?' ह्या स्वरूपाचे प्रश्न कोणत्याही संदर्भात विचारले गेले तर त्यांना उत्तरे देण्याची, दिलेली उत्तरे तपासण्याची आणि सुधारण्याची एकमेव प्रमाण रीत म्हणजे वैज्ञानिक रीत.

ह्या स्वरूपाच्या प्रश्नांची उत्तरे ज्या प्रकारच्या विधानांद्धारे देण्यात येतात त्यांना वस्तुस्थितीवाचक विधाने म्हणूया. मग थोडक्यात असे म्हणता येईल की वस्तुस्थिती-वाचक विधानांची सत्यता ठरविण्याची किंवा पारखण्याची एकमेव रीत म्हणजे वैज्ञानिक रीत. उदाहरणार्थ, 'वानरसेनेने तरंगत्या पाषाणांचा सेतू बांधला' हे वस्तुस्थितीवाचक विधान आहे आणि म्हणून ते वैज्ञानिक पद्धतीच्या आवाक्यात येते. 'वेद नित्य आहेत', 'ईश्वर आहे', 'महंमद पैगंबर हे ईश्वराचे शेवटचे प्रेषित आहेत', 'समाजात जी उत्पादनसाधने, त्यांच्यावर आधारलेली उत्पादनपद्धती आणि तिला अनुसरून घडलेली वर्गव्यवस्था असते तिच्यामुळे समाजाच्या नैतिक कल्पना, मूल्ये, तत्त्वज्ञान, कला, धर्म, कायदे इत्यादी गोष्टी निर्णित होतात' ही सर्व वस्तुस्थितीवाचक विधाने आहेत आणि त्याच्या सत्यतेविषयीचा निर्णय वैज्ञानिक पद्धतीला अनुसरूनच घ्यावा लागेल. समाजाच्या भौतिक अधिष्ठानाने समाजाची संस्कृती निर्णित होते हे विधान सत्य आहे असे मानून सामाजिक घटनांकडे पाहणे म्हणजे वैज्ञानिक पद्धतीचा अवलंब करणे नव्हे; तर ह्या विधानाचा नेमका आशय काय हे ठरवून पुराव्याच्या कसावर ते कितपत टिकते हे प्रांजळपणे पाहणे म्हणजे वैज्ञानिक पद्धतीला अनुसरणे.

वस्तुस्थितीवाचक विधानांची सत्यता-असत्यता ठरविण्याचा एकमेव प्रमाण मार्ग म्हणजे वैज्ञानिक पद्धतीचा अवलंब होय, हे विवेकवादाचे एक प्रमुख सूत्र आहे असे म्हणणे योग्य ठरेल. ह्या अर्थाने विवेकवाद कोणत्या भूमिकेला विरोध करतो? तर, वस्तुस्थितीविषयक काही सत्ये श्रद्धेला प्राप्त होतात किंवा अधिकारी पुरुषांकडून प्रकट होतात आणि ती श्रद्धेने, किंवा अधिकारी पुरुषांचा अधिकार मान्य करून स्वीकारावी लागतात, ह्या भूमिकेला विवेकवाद विरोध करतो. विवेकवाद ही प्रबोधनाकडून, 'एन्लायटन्मेन्ट' ह्या नावाने ओळखण्यात येणाऱ्या विशिष्ट युगाकडून मानवी संस्कृतीला लाभलेली श्रद्धा होय आणि, समान न्यायाने, इतर धार्मिक श्रद्धा होत.

विवेकवादाच्या जोखडापासून मोकळीक करून घेण्याची एक प्रगल्भ पळवाट आहे. ती म्हणजे वस्तुस्थितीच्या दोन श्रेणी कल्पिणे; वस्तुस्थितींच्या राज्यात वैज्ञानिक पद्धती सार्वभौम आहे हे मान्य करूनही, वैज्ञानिक पद्धतीचा विषय असलेल्या वस्तुस्थिती ह्या कनिष्ठ दर्जाच्या वस्तुस्थिती असतात आणि त्यांच्याहून श्रेष्ठ दर्जाच्या ज्या वस्तुस्थिती असतात त्या वैज्ञानिक पद्धतीच्या आवाक्याबाहेर असतात अशी भूमिका स्वीकारणे, श्रीशंकराचार्यांची भूमिका ह्या प्रकारची आहे.



अनुक्रमणिका

अग्नी अनुष्ण आहे असे शंभर श्रुतिवाक्यांनी सांगितले तरी त्याच्यात काही तथ्य असणार नाही असे आचार्य जेव्हा ठामपणे सांगतात तेव्हा ह्या स्वरूपाच्या प्रश्नांचे उत्तर अनुभवाच्या आधारे ज्या प्रश्नांची उत्तरे मिळू शकतात आणि द्यावी लागतात त्या प्रश्नांच्या क्षेत्रात श्रुतीला यत्किंचितही अधिकार नाही असा तिचा अर्थ आहे. पण ह्याची दुसरी बाजू अशी की अनुभवाच्या क्षेत्रापलीकडे असलेले जे अस्तित्व आहे त्याच्याविषयी विधाने करण्याचा यत्किंचितही अधिकार अनुभवाला नाही. ह्या अस्तित्वाचे सम्यक ज्ञान आपल्याला श्रुतीद्वाराच होते आणि ते श्रद्धेने स्वीकारावे लागते. 'कनिष्ठ प्राणिजातीपासून मानवजातीची उत्क्रांती घडून आली की नाही या प्रश्नाचे उत्तर वैज्ञानिक पद्धतीला अनुसरूनच द्यावे लागेल. पण ते एक श्रेष्ठ सत्य आहे, ते अनुभवाच्या आवाक्यापलीकडचे सत्य आहे आणि ते बायबलमध्ये प्रकट करण्यात आले आहे म्हणूनच आपल्याला कळू शकते. ते श्रद्धेने स्वीकारावे लागते.' ही प्रगल्भ ख्रिस्ती भूमिका आहे.

कनिष्ठ अस्तित्व आणि श्रेष्ठ अस्तित्व हे द्वैत आणि त्यांचे प्रतिबिंब असलेले कनिष्ठ सत्य व श्रेष्ठ सत्य हे द्वैत विवेकवाद अमान्य करतो. कोणतीही वस्तुस्थिती ही वस्तुस्थिती म्हणून एकाच दर्जाची असते आणि तिचे प्रमाण ज्ञान प्राप्त करून घेण्याचा एकच मार्ग असतो व तो म्हणजे वैज्ञानिक पद्धतीचा अवलंब.

उच्च सत्य आणि नीच सत्य हे द्वैत केवळ धार्मिक नाही. त्याचे प्रतिबिंब तत्त्वज्ञानातही पडलेले आहे. उदाहरणार्थ, डायलेक्टिकल सत्य आणि यांत्रिक सत्य असे द्वैत मार्क्सवादी मानतात. डायलेक्टिकल सत्य हे फक्त अधिकारी पुरुषांनाच आकलन होते. म्हणजे, त्या त्या देशातील, त्या त्या काळातील पोलिटब्यूरोला आणि सर्वोच्च नेत्याला ते समजते आणि त्यांच्यापासून इतरांना नम्रतेने स्वीकारावे लागते. उदाहरणार्थ, स्टालिन जिवंत असेपर्यंत ते स्टालिनला समजले होते आणि स्टालिन मेल्यानंतर स्टालिनला ते समजले नव्हते हे ख्रुश्चाव्हला समजले आणि ख्रुश्चाव्हमुळे इतर सर्व श्रद्धावंतांना समजले. एकाच परिस्थितीविषयी रशियन पोलिटब्यूरोला गवसलेले डायलेक्टिकल सत्य, चिनी पोलिटब्यूरोला समजलेल्या डायलेक्टिकल सत्याहून वेगळे असते. पण प्रत्येक देशात, त्या देशातील पोलिटब्यूरोला समजलेले सत्य (तो पोलिटब्यूरो असेपर्यंत) अंतिम व स्खलनातीत असते व त्या देशात असे न मानणे हे अध्यात्मिकदृष्ट्या नसले तरी भौतिकदृष्ट्या अतिशय धोक्याचे असते.

जे जे विश्वात घडते त्याची यादी करायची झाली तर तिच्यात मानसिक घटनांचा अंतर्भाव करावा लागेल हे उघड आहे. एखाद्या शरीराला जर दुर्भांकुर टोचला तर ती भौतिक घटना असते आणि त्या हरणाला जी वेदना होते ती मानसिक घटना असते. आपण केवळ भौतिक घटना घेतल्या तर त्या कोणत्या नियमांना अनुसरून घडतात, हे जसे वैज्ञानिक पद्धती शोधून काढू शकते त्याप्रमाणे भौतिक घटना आणि मानसिक घटना त्यांच्या साहचर्याचे नियमही ती शोधून काढू शकते. स्विच दाबला की विजेचा दिवा लागावा म्हणून एखादा माणूस नरबळी का देतो याचे स्पष्टीकरणही ती करू शकते.

माणूस, त्याचे अनुभव, विचार आणि कृत्ये हाही विश्वाचा भाग आहे आणि वैज्ञानिक पद्धतीने विश्वाच्या इतर घटकांचे स्वरूप आणि त्यांच्यामधील परस्परसंबंध यांचे जसे स्पष्टीकरण करता येते तसेच मानवी घटनांचेही करता येते आणि ते केले पाहिजे, माणसाचे विज्ञान रचले पाहिजे, भौतिक विज्ञानाइतकेच दृढपणे आणि पद्धतशीरपणे रचले पाहिजे, हा प्रबोधनकालीन विवेकवादाचा संकल्प आणि आकांक्षा होती. माणसाची प्रकृती गुंतागुंतीची असल्यामुळे विज्ञानाच्या ह्या भागाचा आशय आणि अंतर्गत रचना, उदाहरणार्थ, वनस्पतिशास्त्राचा आशय व रचना यांच्यापेक्षा अधिक गुंतागुंतीची असेल व माणसाचे विज्ञान रचणे अधिक कठीण ठरेल हे ह्या विवेकवाद्यांना मान्य होते. पण हे विज्ञान रचणे तत्त्वत: शक्य आहे याविषयी त्यांना शंका नव्हती.

भौतिक, रासायनिक, जैविक, मानसिक प्रक्रियांचे विज्ञान जसे रचले पाहिजे तसे माणसांच्या अनुभवांचे आणि कृत्यांचे विज्ञानही रचले पाहिजे. ही विज्ञाने, किंवा एका सर्वंकष विज्ञानाचे हे वेगवेगळे भाग, अर्थात माणसांनी रचायचे आहेत आणि ते माणसासाठी रचायचे आहेत. म्हणजे माणसाचे सुख किंवा कल्याण साधण्यासाठी रचायचे आहेत. माणसाचे सुख कशात असते? विवेकाला अनुसरून जगण्यात माणसाचे सुख असते. पण विवेकाला अनुसरून जगणे म्हणजे कसे जगणे?

माणसाने विवेकाला अनुसरून जगणे योग्य असते ह्या विवेकवादी सिद्धांताचा अर्थ काहीही असो, हा सिद्धांत हे

अनुक्रमणिका

विवेकवादाचे एक वेगळे परिमाण आहे. विवेकवादाचे एक परिमाण किंवा अंग म्हणजे विश्वात खरोखर काय आहे ह्याचा निर्णय करण्याची विवेकवादाने पुकारलेली रीत. विवेकवादाचे दुसरे अंग नैतिक आहे. माणसाने कसे जगावे हेही विवेकवाद सांगतो. ह्या दोन अंगांमध्ये काय परस्परसंबंध असू शकेल? अस्तित्वाचे स्वरूप काय आहे ह्याचा शोध घेणारी वैज्ञानिक पद्धती माणसाने कसे जगावे ह्याचे नियमन करणाऱ्या तत्त्वाला जन्म देऊ शकते का? वैज्ञानिक नीती, विज्ञानप्रणीत मूल्ये असे काही घडू शकते का?

आणखी एक प्रश्न आहे. विश्वातील कोणत्याही प्रकारच्या घटना कोणत्या नियमांना अनुसरून घडतात ह्याचा शोध वैज्ञानिक पद्धती घेते. समोरच्या माणसाचे विचार, कृत्ये कोणत्या मानसशास्त्रीय नियमांना अनुसरून घडली आहेत हे स्पष्ट करून त्यांचा उलगडा वैज्ञानिक करतो. माणसाची कृत्ये, भुकेल्या उंदराचे वर्तन आणि परमाणूंना घडणाऱ्या घटना हे सारे विज्ञानाचे विषय आहेत आणि त्यांचा उलगडा वैज्ञानिक एकाच पद्धतीने करतो. पण वैज्ञानिक पद्धतीने विचार करून वैज्ञानिक जेव्हा काही निष्कर्ष पुढे मांडतो तेव्हा तो ते प्रमाण म्हणून मांडतो. प्रामाण्याच्या निकषांना उतरणारे हे निष्कर्ष आहेत आणि ह्या कारणासाठी ते स्वीकारणे योग्य आहे असा त्याचा दावा असतो. हा दावा करणारा वैज्ञानिक आणि त्याने स्वीकारलेले निकष लावून त्याचे निष्कर्ष तपासणारे त्याचे सहवैज्ञानिक हे विज्ञानाचे विषय आहेत की विज्ञानाचे निर्माते आहेत? आणि विज्ञानाचा निर्माता जर विज्ञानापलीकडे असेल तर आपण स्वतःच वैज्ञानिक पद्धतीला मर्यादा घालणारे अस्तित्व आहोत असे होईल की नाही?



प्रा० मे० पुं० रेगे यांचे वरील चार लेख व त्यापुढील श्री० वसंत पळशीकर यांची प्रस्तावना प्रा० मे० पुं० रेगे यांच्या 'विवेकवाद, विज्ञान आणि श्रद्धा' (एप्रिल २००४) या ग्रंथातून सुहृदांच्या सौजन्याने.



प्रकाशक : प्रकाश विश्वासराव
लोकवाङ्मय गृह, मुंबई - २५.



## स्थितप्रज्ञ दर्शन

शास्त्र सांगितले. कला सांगितली. तरी तेवढ्याने संपूर्ण चित्र डोळ्यांपुढे उभे राहत नाही. शास्त्र निर्गुण आहे. कला सगुण आहे. पण सगुणही साकार झाल्याशिवाय व्यक्त होत नाही. नुसते निर्गुण जसे हवेत राहते तसे निराकार सगुणाचेही होऊ शकते. गुण ज्याच्या ठायी मूर्तिमंत झाला त्या गुणींचे दर्शन हाच यावर उपाय आहे. म्हणून अर्जुन म्हणतो, "देवा, जीवनाचे मुख्य सिद्धांत सांगितलेस. ते सिद्धांत आचरणात कसे आणावयाचे ती कलाही सांगितलीस. तरी मला स्पष्ट कल्पना येत नाही. मला आता चरित्र ऐकायला हवे आहे. सांख्यनिष्ठा ज्याच्या बुद्धीत स्थिर झालेली आहे, फलत्यागरूप योग ज्याच्या जीवनात मुरला आहे, अशा पुरुषाची लक्षणे मला सांग. फलत्यागाची पूर्ण खोली दाखविणारा, कर्मसमाधीत मग्न झालेला, निश्चयाचा महामेरु - ज्याला स्थितप्रज्ञ म्हणावयाचे, तो बोलतो कसा, बसतो कसा, चालतो कसा, असे सर्व मला सांग. कशी असते ती मूर्ती? ती कशी ओळखावी! सांग देवा!"

दुसऱ्या अध्यायाच्या शेवटी अठरा श्लोकांत स्थितप्रज्ञाचे गंभीर व उदात्त चरित्र वर्णिले आहे. ह्या अठरा श्लोकांत गीतेच्या अठरा अध्यायांचे जणू सारच साठविले आहे. स्थितप्रज्ञ गीतेची आदर्शमूर्ती आहे. तो शब्दही गीतेचा स्वतंत्र आहे. पुढे पाचव्या अध्यायात जीवन-मुक्तांचे, बाराव्यात भक्तांचे, चौदाव्यात गुणातीताचे, आणि अठराव्यात ज्ञाननिष्ठांचे, असेच वर्णन आले आहे. पण त्याहून स्थितप्रज्ञाचे वर्णन अधिक विस्ताराने व खुलासेवार केले आहे. त्यात सिद्ध-लक्षणाबरोबर साधक-लक्षणही दाखविले आहे.

स्थितप्रज्ञ म्हणजे स्थिर बुद्धीचा मनुष्य. हे तर त्याचे नावच सांगत आहे. पण संयमाशिवाय बुद्धी स्थिर कशी व्हावयाची? म्हणून स्थितप्रज्ञ संयममूर्ती वर्णिला आहे. बुद्धी आत्मनिष्ठ, आणि अंतर्बाह्य इंद्रिये बुद्धीच्या हातात, हा संयमाचा अर्थ. स्थितप्रज्ञ सर्वेंद्रियांना लगाम घालून ती कर्मयोगात राबवतो. इंद्रियरूप बैलांकडून तो निष्काम स्वधर्माचरणाची शेती सुव्यवस्थित करून घेतो. त्याचा प्रत्येक श्वासोच्छ्वास तो परमार्थात खर्च करीत असतो.

हा इंद्रिय संयम सोपा नाही. इंद्रिये अजिबात न वापरणे एकपरी सोपे होऊ शकेल. मौन, निराहार इत्यादी गोष्टी तितक्या जड नाहीत. उलट इंद्रिये स्वैर सोडणे तर सर्वांना साधतेच आहे. परंतु कासव ज्याप्रमाणे धोक्याच्या जागी अवयव संपूर्णपणे आत ओढून घेतो आणि बिनधोक्याच्या जागी ते वापरतो, त्याप्रमाणे विषयभोगातून इंद्रिये आवरून घेणे आणि परमार्थकार्यात त्यांचा योग्य उपयोग करणे हा संयम बिकट आहे. त्यासाठी महान् प्रयत्न पाहिजे. ज्ञानही पाहिजे. पण इतकेही करून तो सर्वदा नीट साधेलच असे नाही. मग काय निराश व्हावे? नाही. साधकाने तेथे भक्तीची जोड द्यावी, अशी फार मोलाची सूचना ह्या स्थितप्रज्ञाच्या लक्षणात भगवंतांनी देऊन ठेवली आहे. ही सूचना अगदी मोजक्या शब्दांत दिली आहे.

विनोबा : गीता प्रवचने



अनुक्रमणिका

# विवेकवाद, विज्ञान आणि श्रद्धा : प्रस्तावना

## वसंत पळशीकर

जवळपास पन्नास वर्षांपूर्वी लिहिलेल्या 'ऐहिक निष्ठा आणि सामाजिक मूल्ये' या लेखात 'ती (ऐहिक निष्ठा) आजची युगनिष्ठा आहे,' असे प्रा. रेगे यांनी लिहिले. (पृ. १०७) आजीचे श्राद्ध करावे की नाही, असा प्रश्न आजीच्या मृत्यूनंतर उभा राहिला. "त्या वेळी मी पक्का इहवादी (सेक्युलर) होतो. असे विधी केवळ निष्फळ असतात असं नव्हे, तर अंधश्रद्धेला बळकट करणारे व म्हणून हानिकारक असतात अशी माझी खात्री होती." असे त्यांनी १९६६ साली लिहिले. पण कालनिर्णय दिनदर्शिकेसाठी १९९६ साली लेख लिहिला तोवर प्रा. रेगे यांच्या भूमिकेमध्ये महत्त्वाचे व मौलिक अंतर पडले होते. मृत्यूपूर्वी एखादे वर्षभरच, बहुधा, त्यांनी प्रा. सुनीती देव संपादित करीत असलेल्या 'प्रा. मे. पुं. रेगे यांचे तत्त्वज्ञान' या ग्रंथासाठी लेखन केले. तत्त्वज्ञ म्हणून त्यांनी केलेल्या विभिन्न लेखनाचा परामर्श घेणाऱ्या तत्त्वज्ञान विषयाच्या ज्येष्ठ अध्यापकांच्या समीक्षेला रेग्यांनी यथोचित प्रतिसाद दिला. प्रा. सुनीती देव यांच्या उपरोक्त ग्रंथातील, 'प्रा. रेगे आणि ईश्वर' या लेखाला प्रतिसाद देताना रेग्यांनी लिहिले, "मी स्वाभाविकपणे धार्मिक असलेला माणूस नाही. मी प्रार्थना करीत नाही. पण मला प्रार्थना करता येत नाही ह्याचे मला वाईट वाटते. कधीतरी मनोभावे प्रार्थना करण्याची क्षमता मला प्राप्त होईल. 'ईश्वरनिष्ठांच्या मांदियाळी'त कधीतरी प्रवेश मिळेल अशी आशा आहे." आपण ह्या ठिकाणी personal confession देत आहोत, असे त्यांनी आवर्जून नमूद केले आहे. 'परंपरागत श्राद्ध' या लेखात रेगे म्हणतात, "पुढे आईवडिलांच्या श्राद्धाचा प्रश्न आला. पण तोपर्यंत माझं मन बदललं होतं. मी नास्तिक कधीच नव्हतो. पण आता मी ठाम इहवादीही राहिलो नव्हतो. किंवा इहवादाचा वेगळा, पारलौकिकाशी सुसंगत असा अर्थ लावू लागलो होतो."

विचारांनी आधुनिक, विज्ञानिष्ठ, पुरोगामी व पक्के इहवादी अशी रेग्यांची प्रतिमा दीर्घकाळ पुरोगामी, इहवादी, परिवर्तनवादी चळवळीतल्या कार्यकर्त्यांमध्ये रुजलेली होती. तत्त्वज्ञानाचे अंग असलेल्या आधुनिकता, प्रबोधनयुग, विवेकवाद, विज्ञान, इहवाद अशा विषयांची विविध अंगे आणि सूक्ष्म बारकावे कसदारपणे पण त्याच वेळी चोख मराठी भाषेत उकलून पुढे समोर ठेवणारी 'बौद्धिके' रेगे शिबिरे, अभ्यासवर्ग ह्यांमधून घेत. ह्यामुळे त्यांची वरील प्रतिमा अधिक घट्टपणे रुजली असे म्हणता येईल. 'रॅडिकल ह्युमॅनिझम'ची अभिजात वैशिष्ट्यपूर्ण मांडणी करणाऱ्या मानवेंद्रनाथ रॉय यांच्या नामवंत अनुयायी-सहकाऱ्यांच्या वर्तुळात (या वर्तुळात तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, प्रा. गोवर्धन पारीख, प्रा. अ. भि. शहा आदी दिग्गजांचा समावेश होता.) प्रा. रेगे यांची उठबस असल्याकारणाने देखील त्यांची वरील प्रतिमा दृढमूल झाली.

'साठोत्तरी काळा'त, म्हणजे स्थूलमानाने १९७० च्या आसपास, महाराष्ट्रात डाव्या-रॅडिकल, पुरोगामी, इहवादी भूमिका घेतलेल्या युवकांच्या परिवर्तनवादी चळवळींचा नेत्रदीपक उत्कर्ष झाला. यांच्यामध्ये दलित पँथर, युवक क्रांती दल, 'एक गाव, एक पाणवठा' आंदोलन, नामांतर आंदोलन, विषमता निर्मूलन शिबीर, नक्षलवादी अशा विभिन्न चळवळींचा समावेश होता. यांपैकी काही व्यासपीठांवर अनेक संघटनांची युवक कार्यकर्ते मंडळी व त्यांच्या संघटना एकत्रही आल्या; येत राहिल्या. यांच्यापैकी दलित पँथर, युवक क्रांती दल अशा काही जहाल, संघर्षवादी युवक चळवळींच्या मध्यवर्ती नेत्या-कार्यकर्त्यांशी रेग्यांचा घनिष्ठ मैत्रीसंबंधही होता आणि त्यांचा या चळवळीमध्ये वैशिष्ट्यपूर्ण सहभागही होता. पुढच्या काळात विचार व कृती दोन्ही आघाड्यांवर या चळवळी त्यांच्या त्यांच्या वेगवेगळ्या वळणांनी गेल्या आणि त्यांनी रेग्यांची साथसंगत सोडली. या चळवळींचे नेते-कार्यकर्ते आणि मान्यताप्राप्त विचारवंत यांचा त्या त्या वेळचा राजकीय अजेंडा व कृतिकार्यक्रम यांना निःसंदिग्ध पाठिंबा आपण देऊ शकत नाही, कारण दलितमुक्ती, स्त्रीमुक्ती, न्याय, स्वातंत्र्य, समताधिष्ठित पुरोगामित्व, विज्ञाननिष्ठा, बुद्धिप्रामाण्यवाद, या व अशा मुद्द्यांची केली जाणारी वैचारिक मांडणी कच्ची, सदोष व अहितकारक-अन्यायकारक आहे ही रेग्यांची खंत; पण स्वतःच्या वैचारिक (आयडिऑलॉजिकल) मांडणीबद्दल ही सर्व मंडळी ठाम, निःशंक व आग्रही असल्याचे रेग्यांच्या

अनुक्रमणिका






अनुभवाला येत राहिले. कोणाविषयी कटुता न बाळगता पण व्यथित अंतःकरणाने ते बाजूला झाले. पण मासलेवाईक 'बुद्धिजीवी' ॲकॅडेमिक प्राध्यापकी कोषात त्यांनी स्वतःला बंदिस्त केले नाही.

त्यांनी ज्या अजेंड्यावर स्वतःचे ध्यान केंद्रित केले त्याची स्पष्टता त्यांच्या 'तत्त्वज्ञानातील माझी वाटचाल' (प्रा. मे. पुं. रेगे यांचे तत्त्वज्ञान, पृ. १-१७) या लेखावरून उत्तम होते. कांतिभाई शहा या तत्त्वज्ञ-मित्राकडून आपण दोन गोष्टी 'शिकलो' असे म्हणून, जी दुसरी गोष्ट आपण शिकलो तिच्याविषयी रेगे लिहितात की, "आपण आपले तत्त्वज्ञान घडवले पाहिजे. आपण उपक्रमशील असले पाहिजे. हे कठीण असले तरी ते करण्याचा आपण प्रयत्न केला पाहिजे. नाहीतर आपण कायमचे अधू आणि भित्रे राहू. ह्या संदर्भात एक महत्त्वाची गोष्ट अशी की, सामाजिक आणि नैतिक तत्त्वज्ञान, तसेच धर्माचे तत्त्वज्ञान हे आपले तत्त्वज्ञानातील मध्यवर्ती विषय असले पाहिजेत. कारण आपल्याला एका वेगळ्या स्वरूपाच्या भारतीय समाजाची घडण करायची आहे आणि धार्मिक परंपरेने बांधलेला असा हा समाज आहे. तेव्हा अशा समाजाला अधिष्ठान देणारे असे सामाजिक तत्त्वज्ञान आपण घडविले पाहिजे आणि त्याला पूरक असे धार्मिक तत्त्वज्ञानही रचले पाहिजे आणि ज्या भारतीय विचारवंतांनी ह्या स्वरूपाचे तत्त्वज्ञान घडविले असेल - उदाहरणार्थ, रानडे, टिळक, गांधी इत्यादी - त्यांच्या विचारांचे आपण गंभीरपणे परीक्षण केले पाहिजे. ते आपले खरे पूर्वसुरी आहोत. आणि मुख्य गोष्ट म्हणजे आपण आपल्या अभिजात परंपरेकडे वळले पाहिजे."

आता, 'तत्त्वज्ञानातील माझी वाटचाल' हे लेखन रेग्यांनी बहुधा त्यांच्या आयुष्याच्या अखेरच्या वर्षामध्ये लिहिले. म्हणजे, कांतिभाई शहा यांच्याकडून ते जी 'दुसरी ' गोष्ट शिकले ती कोणती हे सांगत असतानाच, १९७० नंतरच्या तीस वर्षांमध्ये त्यांनी आपली शक्ती-बुद्धी कोणत्या कामी लावली त्याचाही खुलासा केला!

समाजपरिवर्तनाच्या चळवळींमध्ये वैचारिक योगदान व प्रसंगी कृतिकार्यक्रमातील सहभाग या स्वरूपात भर देत राहून वरील अजेंडा त्यांना पार पाडता आला असता तर रेग्यांना खोलवर समाधान लाभले असते. पण, दुर्दैवाने, तसे घडावयाचे नव्हते. असो.

तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, प्रा. गोवर्धन पारीख, प्रा. अ. भि. शहा ह्यांच्या मैत्रीमुळे रेग्यांचा संबंध याच काळात वाई येथील प्राज्ञपाठशाळामंडळाशी जुळून आला. त्यामधून नवभारत मासिकाचे संपादकपद त्यांच्याकडे प्रा. गोवर्धन पारीख यांच्या मृत्यूनंतर आले. प्रा. अ. भि. शहा यांच्या मृत्यूनंतर न्यू क्वेस्ट या नियतकालिकाच्या संपादकत्वाची जबाबदारी १९८१ पासून त्यांच्याकडे आली.

धार्मिक परंपरेने बांधलेल्या आपल्या समाजाला अधिष्ठान देणाऱ्या सामाजिक तत्त्वज्ञानाची जडणघडण करणारी अनेक संपादकीये त्यांनी लिहिली. या काळातील विविध व्यासपीठांवरून दिलेल्या त्यांच्या व्याख्यानांच्या संहिता व स्वतंत्र लेख (इंग्रजी, मराठी दोन्ही भाषणांमधील) वाचले तर त्यांद्वाराही ते हेच कार्य पार पाडीत राहिल्याचे दिसते. तुलनेने, न्यू क्वेस्टची संपादकीय थोड्या वेगळ्या जातकुळीची असल्याचे आढळते. त्यांना अभिप्रेत असलेल्या सामाजिक तत्त्वज्ञानाच्या भूमिकेतून विभिन्न चालू घडामोडींवरचे सखोल भाष्य असे न्यू क्वेस्टच्या संपादकीयांचे स्वरूप आहे. तात्विक-वैचारिक भूमिकेचे उपयोजन (applied theory) असे त्यांचे स्वरूप असल्याने ही संपादकीये उद्बोधक आहेत.

'ऐहिक निष्ठा ही आजची युगनिष्ठा आहे' असे रेग्यांनी एका लेखात म्हटल्याचा उल्लेख वर आला आहे. बुद्धिप्रामाण्यवाद, विवेकवाद, विज्ञाननिष्ठा हे या ऐहिक निष्ठेचे, म्हणजेच 'इहवादा'चे मुख्य घटक होत. मानवेंद्रनाथ रॉयप्रणित 'नवमानवतावाद' (रॅडिकल ह्यूमनिझम) हा या ऐहिक निष्ठेच्या अनेक आविष्कारांपैकी एक वैशिष्ट्यपूर्ण आविष्कार होय.

बुद्धिप्रामाण्यवाद, विवेकवाद, विज्ञाननिष्ठा, विज्ञान या विषयांची मराठी भाषेमधून गेली शे-दीडशे वर्षे मांडणी होत आली आहे. ब्रिटिशांचे राज्य प्रस्थापित झाल्यानंतर जे नवे इंग्रजी शिक्षण येथे प्रविष्ट झाले त्याच्या प्रसाराबरोबर नवशिक्षितांमध्ये बुद्धिप्रामाण्यवाद, विवेकवाद, युटिलिटेरियनिझम, लिबरॅलिझम्, शिष्टमान्यता व प्रतिष्ठा पावले. एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धातील, वैचारिक प्रभाव गाजविणारी दोन फार मोठी नावे म्हणजे जॉन स्टुअर्ट मिल व हर्बर्ट स्पेन्सर ही होत. या परंपरेमधील महाराष्ट्रातील पहिले मोठे नाव सुधारकाग्रणी गोपाळ गणेश आगरकरांचे आहे. महात्मा जोतिबा फुले व न्यायमूर्ती रानडे यांना मिल-स्पेन्सर यांच्या परंपरेतले म्हणता येत नाही. उलट लोकमान्य टिळक

हे या परंपरेच्या जास्त जवळ होते. एका अंगाने पाहता, स्वातंत्र्यवीर सावरकर हे या परंपरेत जास्त व्यापकपणे व सार्थपणे बसतात; त्यांची हिंदुत्वाची मांडणी करणारे युक्तिवाद आधुनिक, पाश्चात्त्य वळणाच्या राष्ट्रवादाच्या बैठकीवरून केलेले आहेत व इहवादी आहेत.

१९२० नंतरच्या काळात मार्क्सवाद-साम्यवाद-समाजवाद यांचा प्रभाव प्रकर्ष पावला. बुद्धिप्रामाण्यवाद, विवेकवाद, विज्ञान-तंत्रविज्ञान यांवरील निष्ठा. इहवाद हेच मार्क्सवाद-साम्यवाद-समाजवाद या विचारप्रणालीतले (ती बहुप्रवाही आहे हे लक्षात घेतल्यावरही) मुख्य घटक असल्याचे लक्षात येते. महाराष्ट्रातली पुरोगामी, इहवादी, आमूलाग्र परिवर्तनवादी चळवळ ही, तत्त्वज्ञानात्मक अधिष्ठानाच्या दृष्टीने पाहता, एका अंगाने, आगरकरांना अनुसरणारी आणि दुसऱ्या अंगाने, मार्क्सवाद-समाजवाद शिरोधार्य मानणारी आजही आहे. उच्चवर्णीयांच्या प्रभुत्वाचे अन्याय व विषम चातुर्वर्ण्यव्यवस्थेचे खंडन करण्याच्या, त्यांच्या विरोधात संघर्ष छेडण्याच्या संदर्भात व्यावहारिक पातळीवर ही चळवळ म. फुले, छ. शाहूमहाराज व डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचा वारसा सांगते, आणि ही गोष्ट अर्थपूर्णी आहे. पण अधिष्ठानस्वरूप तत्त्वज्ञान कोणते असे म्हटले तर, बुद्धिप्रामाण्यवाद-विवेकवाद, विज्ञान-तंत्रविज्ञान निष्ठा हे मुख्य घटक असलेला मार्क्सवादी-समाजवादी इहवाद हेच तत्त्वज्ञानात्मक अधिष्ठान आहे असे म्हणावे लागते.

आपण आपले सामाजिक - नैतिक तत्त्वज्ञान घडविण्याच्या कामी कमी पडत राहिलो आहोत हे रेग्यांचे म्हणणे राहिले. महाराष्ट्र फाउंडेशन या संस्थेने १९९४ साली मराठी साहित्याच्या क्षेत्रातील कामगिरीसाठी पारितोषिक योजना सुरू केली. वैचारिक साहित्यनिर्मितीच्या क्षेत्रातील कामगिरीसाठी पहिल्याच वेळी प्रा. रेगे यांची निवड झाली. पुरस्कार स्वीकारण्याच्या प्रसंगी रेग्यांनी भाषण केले. त्यात हा विषय त्यांनी हाताळला. त्यांचे प्रतिपादन महत्त्वाचे असल्याने विस्ताराने ते येथे उद्धृत करीत आहे.

रेगे म्हणाले, "आता तत्त्वज्ञानाचा एक प्राध्यापक म्हणून मी बोलणार आहे. वैचारिक साहित्याची परंपरा आपल्याकडे निर्माण झालीच नाही असं नाही. आधुनिक काळात पाश्चात्त्य संस्कृतीची धडक आपल्यावर बसल्यानंतर जिचा गौरवाने उल्लेख केला जातो अशी वैचारिक परंपरा, विष्णुबुवा ब्रह्मचारी, लोकहितवादी, जोतिबा फुले, रानडे, आगरकर, टिळक यांनी निर्माण केली होती. हे सर्व विचारवंत त्या काळात महाराष्ट्रापुढचे जे प्रश्न होते, सामाजिक, काही प्रमाणात आर्थिक, राजकीय, त्यांच्याविषयीचं आपलं चिंतन-लेखन समाजाला जागृत करण्यासठी करीत. ती त्यांची चैन नव्हती. किंवा ते ॲकॅडेमिक स्वरूपाचं कार्य नव्हतं! ते सामाजिक कार्य होतं. पण त्याचबरोबर वैचारिक होतं. आपण पहा, टिळकांनंतर असं नाव आपण घेऊ शकत नाही. आंबेडकरांचं घेता येईल पण आंबेडकर हे त्या परंपरेतीलच आहेत. योगायोगानं ते मागून आले असं म्हणता येईल. आता ह्यांना कोणी घडवलं होतं? तर, नवीन जे एक पाश्चात्त्य तत्त्वज्ञान, ज्या तत्त्वज्ञानाने आधुनिक स्वरूपाच्या समाजाची पायाभरणी केली, अनुभववाद, वैज्ञानिक विचारपद्धती यांचा, तसेच स्वातंत्र्य, समता, बंधुभाव ह्या प्रबोधनाच्या मूल्यांचा यथायोग्य आविष्कार कोणत्या प्रकारच्या जीवनात होईल ह्याचा विचार, हे सर्व जे चिंतन होतं त्याच्या पार्श्वभूमीवर, ते बऱ्याच प्रमाणात आत्मसात करून ही वैचारिक परंपरा महाराष्ट्रात विकसित झाली, हे आपल्याला माहीत आहे. पण पुढे गांधीवाद, मार्क्सवाद यांसारखे अत्यंत प्रभावी असे वैचारिक संप्रदाय विकसित झाले असूनही मराठीमध्ये त्यांचं प्रतिबिंब पडलं आहे असं आपल्याला दिसत नाही. हे का झालं असावं? याचं कारण मला वाटतं ते असं, ह्या प्रकारच्या विचाराला पायाभूत असं जे तत्त्वज्ञान होतं त्या तत्त्वज्ञानाची हेळसांड आपण केली. आता मी ज्यांची नावं घेतली ती फार मोठी नावं आहेत. पण आपण पहा, त्यांच्यापैकी ज्याला दार्शनिक म्हणता येईल, फिलॉसॉफिकल म्हणता येईल त्या पातळीवर लेखन हे फारच थोड्यांनी केलं आहे आणि फार तुटपुंजेपणे केलं आहे. अशा दार्शनिक पातळीवरचं लिखाण एक रानड्यांत आढळेल आणि टिळकांत आढळेल. आगरकरांनी सुधारणांचा प्रचार केला, हे खरं आहे आणि त्यांच्या प्रामाणिकपणा हा निखळ होता, पारदर्शक होता, त्याचा प्रभाव आजूबाजूच्या लोकांवर आणि वाचकांवर पडला यात शंका नाही. पण ह्या नवीन तत्त्वज्ञानाचा जो सैद्धांतिक पाया होता त्याचं व्यवस्थित विवरण त्यांनी केलं नाही. ही हेळसांड आपण केली आणि त्यामुळं हा विचार सकस राहिला नाही, असं मला वाटतं.

तेव्हा आपण हे तत्त्वज्ञान आत्मसात केलं पाहिजे

आणि ते नीट मराठी अभ्यासकांपुढे मांडलं पाहिजे. मिल् आणि स्पेन्सर या आधुनिक ऋषींच्या द्वारा जे ब्रिटिश तत्त्वज्ञान महाराष्ट्रात आलं होतं, त्याची पाळंमुळं कुठे जातात, त्याची गृहीतकृत्यं काय आहेत, आक्षेप घेतले असता ती कितपत टिकून राहतात, ह्या सर्वांचा सुव्यवस्थित विचार आणि त्याची मांडणी आपल्याकडे झाली पाहिजे, हे एक. ह्याच पाश्चात्त्य वैचारिक परंपरेचा दुसरा जो महत्त्वाचा असा प्रवाह होता, कांट आणि त्याचे नंतरचे अनुयायी, ज्यांनी व्यक्तीची प्रतिष्ठा, स्वातंत्र्य, स्वायत्तता, समानता आणि न्याय या कल्पनांना एक वेगळा आशय देऊन त्यांची सुव्यवस्थित अशी मांडणी केली, जिचा पुढे विकास आपल्याला हेगेल आणि मार्क्स यांच्या तत्त्वज्ञानातून आढळतो. मी हे केवळ ॲकॅडेमिक तत्त्वज्ञान म्हणतच नाही. प्रत्यक्ष सामाजिक व्यवहाराला जाऊन भिडणारं, सामाजिक प्रश्न ओळखणारं, त्यांची मांडणी करून, त्यांची उत्तरं शोधणारं असं तत्त्वज्ञान मी म्हणतो. हा दुसरा प्रवाहही महाराष्ट्रात पूर्णपणे झाकोळला गेल्यासारखाच आहे. त्याच्यासंबंधीही काही लिखाण झालेलं नाही."

आता जर बुद्धिप्रामाण्यवाद, विवेकवाद, अनुभव-वाद, विज्ञाननिष्ठा या विषयांची मांडणी आजच्या काळात चोखपणे, चिकित्सक भूमिकेतून करावयाची असेल तर पाश्चात्त्य तत्त्वज्ञानाचा सखोल अभ्यास असण्याची, त्या परंपरेतले बारकावे आत्मसात केलेले असण्याची प्राथमिक व पायाभूत आवश्यकता आहे. ज्या महनीय व्यक्तींच्या लिखाणामधून १९ व्या शतकात महाराष्ट्रात वैचारिक-सामाजिक प्रबोधन घडून आले त्यांचे महत्त्वाचे लेखन रेग्यांनी अभ्यासलेले होते. (अलीकडे प्रसिद्ध झालेल्या 'विवेक आणि न्याय' या ग्रंथात त्यांनी महात्मा फुले, न्यायमूर्ती रानडे, लोकहितवादी, आगरकर व डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या विचारांचा परामर्श घेणारे लेखन केलेले आहे. - प्रतिमा प्रकाशन, पुणे.) या संदर्भात त्यांनी त्यांच्या भाषणात 'दार्शनिक पातळी'वरील लेखनासाठी फक्त रानडे व टिळक यांचीच नावे तेवढी घेतली आहेत ही गोष्ट लक्षात घेण्यासारखी आहे. त्यांचा हा निवाडा अनेकांना कठोर जरूरच वाटेल. पण गंभीरपणे व पूर्ण जबाबदारीने केलेला हा निवाडा आहे, हे ध्यानात घ्यायला हवे.

ज्या उणेपणावर नेमके बोट ठेवले होते ते न्यून दूर करीत, या महत्त्वपूर्ण विषयांची चोख दार्शनिक मांडणी करणारे लेखन रेग्यांनी नवभारतच्या संपादकीयांमधून, वेळोवेळी केलेल्या भाषणांमधून केले. हे मौलिक कार्य १९७० नंतरच्या काळात त्यांनी सातत्याने पार पाडले. आजच्या काळाला अनुरूप आणि आपल्या समाजाला उपकारक असे सामाजिक-नैतिक तत्त्वज्ञान घडविणारे हे लेखन (व भाषणांच्या संहिता) बव्हंशी स्फुट लेख-भाषणे या स्वरुपाच्या मुख्यत्वेकरून पुढील नियतकालिकांत प्रसिद्ध झाले : समाज प्रबोधन पत्रिका, नवभारत व सेक्युलॅरिस्ट. त्यांनी स्वतंत्र ग्रंथनिर्मिती केली नाही हे आपले दुर्दैव म्हणायला हवे.

प्रा. सुनीती देव यांनी संपादित केलेल्या प्रा. मे. पुं. रेगे यांचे तत्त्वज्ञान या ग्रंथात त्यांच्या लेखनाची विस्तृत सूची शेवटी समाविष्ट केली आहे. तिच्यावरून नजर टाकल्यास, ज्याला ॲकॅडेमिक तत्त्वज्ञानात्मक वळणाचे म्हणता येईल असे काही लेखन रेग्यांनी केल्याची नोंद आढळते. पण अशा लेखांची संख्या अल्प आहे. उच्च दर्जाचे ॲकॅडेमिक लेखन करण्याचा त्यांचा अधिकार किती होता हे तत्त्वज्ञान ज्येष्ठ प्राध्यापक प्रा. दि. य. देशपांडे यांनी व इतरही काहींनी मोकळ्या मनाने नोंदविलेले आहे. पण इंग्रजी काय किंवा मराठी काय, दोन्ही भाषांपैकी कोणत्याही भाषेमधून या प्रकारचे लेखन करण्यात रेग्यांना रस नव्हता असेच म्हणावे लागते. महाराष्ट्र फाऊंडेशनचा पुरस्कार स्वीकारताना केलेल्या भाषणात या संदर्भात् ते म्हणतात, "सबंध समाजाची एक वैचारिक निर्मिती अशा स्वरुपाचं स्थान मराठी वैचारिक साहित्याला महाराष्ट्राच्या जीवनात लाभलेलं नाही. सामाजिक जीवनाशी ज्याचा साक्षात संबंध आहे अशा सामाजिक शास्त्रांत ज्यांचं महत्त्वाचं योदगान आहे अशा माणसांचीसुद्धा, ती मराठी माणसं म्हणून ओळख महाराष्ट्रातील सुशिक्षित जनतेला नसते. याचं कारण असं की, त्या मंडळींचा जो श्रोतृवृंद आहे तो स्वाभाविकच अखिल भारतीय आहे आणि त्याचं माध्यम इंग्रजी आहे; आणि त्या दर्जाची कामगिरी त्यांच्याकडून झाली तर त्यांचा संवाद आंतरराष्ट्रीय पातळीवर सुरू होतो आणि त्यांचंही माध्यम इंग्रजीच आहे. याचा अर्थ असा - वेगवेगळ्या विषयांच्या महाराष्ट्रातील विचारवंतांनी सिद्ध केलेलं असं, आजच्या मराठी समाजाचे जे व्यावहारिक, सांस्कृतिक, औपपत्तिक असे वेगवेगळे प्रश्न आहेत त्यांच्याविषयीचं त्या विचारवंतांचं मराठीमध्ये प्रकट झालेलं चिंतन असं रूप मराठी वैचारिक साहित्याला आलेलं नाही."

अनुक्रमणिका

गैरसमज टाळण्यासाठी येथे एका गोष्टीची नोंद घ्यायला हवी. मराठी भाषेमधून येथील सुशिक्षित, जिज्ञासू वाचकांसाठी मराठी विचारवंतांनी वैचारिक साहित्य निर्माण केले नाही असे रेगे म्हणत नसणार. त्यांना दोन गोष्टी नमूद करावयाच्या होत्या. दार्शनिक पातळीवरील लेखनासंबंधी ते विशेष करून बोलत होते, हे एक. दुसरे, अशा लेखनाची एक परंपरा (canon) जशी ललित साहित्याच्या क्षेत्रात निर्माण झाली आहे तशी - येथे प्रतिष्ठित झालेली नाही, हे त्यांना म्हणावयाचे होते. या संदर्भात रेग्यांच्या प्रस्तुत प्रतिपादनावर पुढील टिप्पणी अर्थपूर्णरित्या करता येण्यासारखी आहे. येथे ब्रिटिश राजवट प्रस्थापित झाल्यानंतरच्या कालखंडात ज्या व्यक्तींनी अव्वल दर्जाचे वैचारिक लेखन केले त्या वैचारिक साहित्याची मध्यवर्ती बहुपेडी 'परंपरा' (canon) आरेखित करण्याचा प्रकल्प पार पाडण्याचे काम काही अभ्यसकांनी हाती घेण्याची गरज आहे. अशी कोणतीच 'परंपरा' तरीही आपणास प्रस्थापित वा आरेखित करता येत नाही, अशा निष्कर्षावरही हे अभ्यासक येतील ही शक्यता नाकारता येत नाही. रेग्यांच्या भाषणामधून, अशी बहुपेडी परंपरा प्रतिष्ठित झालेली नाही हा त्यांचा अभिप्राय स्पष्ट होतो, हे खरे.

जी गोष्ट स्वाभाविकपणे घडून आलेली नाही ती घडून येणे गरजेचे तर आहेच. कारण त्या अभावी संस्कृतीचे एक अंग विकसित झालेले नाही. मराठी समाजाचे उत्थान व उत्कर्ष यासाठी ही गोष्ट घडवून आणणे नितांत आवश्यक आहे. ही मराठी विचारवंतांची जबाबदारी आहे, असे रेग्यांनी म्हटले. यासाठी काय व्हायला हवे याची स्पष्टता त्यांनी पुढील प्रकारे केली. रेगे म्हणाले, "स्वतःच्या देशाचा त्याग न करता परदेशात स्थायिक होणं ह्यात जी अद्‌भुत किमया आहे तशीच किमया ह्या विचारवंतांनी आपापल्या क्षेत्रात दाखवावी. म्हणजे असं की, त्यांचा जो संवाद, जी चर्चा इंग्रजीतून अखिल भारतीय स्तरावर आणि आंतरराष्ट्रीय पातळीवर त्या त्या विषयांच्या अभ्यासकांशी चालू असते, तो संवाद, ती चर्चा मराठीत आली पाहिजे. अखिल भारतीय किंवा आंतरराष्ट्रीय पातळीवर चालणाऱ्या संवादाची, चर्चांची गरज आहे, त्याला मोल आहे हे मान्य करूनही मला असं वाटतं की, ह्या विचारवंतांनी जाणीवपूर्वक मराठीत लिहिलं पाहिजे. अशा स्वरूपाच्या लेखनाला एक स्वाभाविक वाचकवर्ग आज महाराष्ट्रात अस्तित्वात आला आहे. हा वाचकवर्ग म्हणजे सबंध ग्रामीण भागातून मराठी माध्यमातून पदवी व पदव्युत्तर शिक्षण घेणारे बहुसंख्य विद्यार्थी, हे विद्यार्थी इंग्रजीतून त्या त्या विषयाचं अध्ययन करू शकतील अशी परिस्थिती आज नाही. त्यामुळे चैतन्यशील अशा बौद्धिक जीवनाचा अनुभव त्यांना कधी आलेलाच नाही. तो जर यायला हवा असेल तर त्याकरिता जाणीवपूर्वक असे प्रयत्न केले गेले पाहिजेत. असं झालं तर हळूहळू ह्या स्वरूपाचं साहित्य इथे स्थिरावेल."

रेग्यांनी स्वतःसाठी हा अजेंडा स्वीकारला होता. आजच्या मराठी समाजाचे जे व्यावहारिक, सांस्कृतिक, औपपत्तिक असे वेगवेगळे प्रश्न वेळोवेळी त्यांच्या नजरेला पडले त्यांच्यासंबंधी त्यांनी आवर्जून मराठीतून मांडणी केली. त्यांच्या लेखनापैकी काही लेखन आज ग्रंथरूपाने उपलब्ध झाले आहे. पाश्चात्त्य नीतिशास्त्राचा इतिहास (प्रथमावृत्ती १९७४), हिंदू धार्मिक परंपरा आणि सामाजिक परिवर्तन (प्रथमावृत्ती १९९५) इहवाद आणि सर्वधर्मसमभाव (प्रथमावृत्ती १९९६) ही तीन पुस्तके त्यांच्या हयातीत प्रसिद्ध झाली. विवेक आणि न्याय : आधुनिक महाराष्ट्रातील प्रबोधनवर्ग (प्रथमावृत्ती २००२) हे पुस्तक त्यांच्या निधनानंतर प्रसिद्ध झाले.

बुद्धिप्रामाण्यवाद, विवेकवाद, विज्ञान, नीतिमूल्ये व श्रद्धा या विषयांवरील त्यांचे निवडक लेख प्रस्तुत ग्रंथात एकत्रित केले आहे. या एकूण विषयांचे महत्त्व सुजाण जिज्ञासू मराठी वाचकांसाठी वेगळे स्पष्ट करून सांगण्याची गरज नाही. विशेषतः आधुनिकतेच्या पायावर भारतीय समाजाची उभारणी करण्यात रस असलेल्या परिवर्तनवादी चळवळींमधील क्रियाशील व्यक्तींच्या दृष्टीने या विषयांची तात्त्विक मांडणी खासच महत्त्व राखते.

बुद्धिप्रामाण्यवाद, अनुभववाद, विवेकवाद, विज्ञान-निष्ठा, विज्ञानाचे तत्त्वज्ञान, नीतिशास्त्र, श्रद्धा हे सारे खास तत्त्वज्ञानाच्या प्रांतातले विषय. रेगे हाडाचे शिक्षक होते. विद्यार्थ्यांविषयी खोल आस्था त्यांना असे. विषय विद्यार्थ्यांना नीट समजावा यासाठी आवश्यक ते कष्ट घ्यायला त्यांना आवडे; विद्यार्थी जिज्ञासू, तल्लख बुद्धीचा म्हणजे टोकदार प्रश्न, शंका उपस्थित करणारा, अभ्यासू मिळाला तर त्यांना अपरंपार आनंद होई. याचा अनुभव प्राज्ञपाठशाळेच्या विद्यमाने १९९२ ते २००० या काळात वाई येथे जी अनेक अभ्यास-शिबिरे व चर्चासत्रे आयोजित केली त्यावेळी आला.

इमॅन्युएल कांट ह्या जर्मन तत्त्वज्ञाच्या मांडणीचा आधार-हवाला अनेक वेळा रेग्यांच्या निरूपणात येईल. कांटविषयीचा त्यांचा कमालीचा आदर सर्वांच्या लक्षात आलाच. एका टप्प्यावर, रेग्यांच्या या अभ्यासवर्गात सहभागी होणाऱ्या काहींनी, त्यांनी कांटच्या तत्त्वज्ञानावरच अभ्यासवर्ग घ्यावा अशी मागणी केली. तत्त्वज्ञान हा विषय घेऊन कोणतीही ॲकॅडमिक पदवी प्राप्त करून घ्यावयाची नसलेल्या मंडळींकडून ही मागणी आले ह्याने रेगे फार समाधान पावले. एकेक सत्र दोन-अडीच दिवसांचे असे, दिवसभरात सहा-सात अभ्यासवर्ग चाले.

अभ्यासवर्ग/शिबिर यांमध्ये केल्या जाणाऱ्या विषय निरूपणाला बौद्धिक असे म्हणण्याची रीत प्रचलित आहे. रेग्यांची अनेक संपादकीये ही बौद्धिकेच असत. अवघड विषयाचे बाळबोध मराठी भाषेत निरूपण कसे करावे याचे त्यांचे लहानमोठे लेख हे उत्तम नमुने आहेत.

बुद्धिप्रामाण्यवाद, विवेकवाद या शब्दांमधील, 'वादा'च्या अर्थाने, रेग्यांची निष्ठा कोणत्या वादाला वा विचारव्यूहाला होती असे म्हणता येईल? 'तत्त्वज्ञानातील माझी वाटचाल' या उपर्निर्दिष्ट लेखात रेग्यांनी लिहिले आहे, "मी स्वतःचे वर्णन कसे करीन? मी मूलतः कांटवादी आहे." या लेखात एके ठिकाणी त्यांनी म्हटले आहे, "प्रा. के. जे. शाह यांच्याशी झालेल्या चर्चांचे फलित म्हणून रेग्यांनी व्हिटगेन्स्टाइन यांचे फिलॉसॉफिकल इन्व्हेस्टिगेशन्स अभ्या-सल्यावर) मी कांटवादी होतो तो कांट-व्हिटगेन्स्टाइनवादी झालो. या म्हणण्याचा खुलासा त्यांनी केला आहे तो असा : "...आपल्या क्रिटिक ऑफ प्यूअर रीझनमध्ये कांट एकाकी मानवी ज्ञाता घेतात आणि जगाविषयीचे त्याचे ज्ञान, ह्या ज्ञानाची घडण आणि ज्ञानापलीकडीलल अस्तित्व ह्यांचा शोध घेतात, व्हिटगेन्स्टाइन विशिष्ट मानवी समाज (community) किंवा मानवजाती (mankind) हा आधारबिंदू मानून, तिच्यात प्रस्थापित असलेल्या व्यवहारांचा (practice) शोध घेतात. 'व्यवहार' हा शब्द भारतीय तत्त्वज्ञानाचा पारिभाषिक शब्द आहे. मानवी व्यवहार हे भाषेच्या द्वारे चाललेले असतात, ह्या व्यवहारांत मानवी कृती आणि भाषा यांची गुंफण झालेली असते. शब्दांचे, शब्दप्रयोगांचे अर्थ समजून घ्यायचे तर तर ज्या विशिष्ट व्यवहारात (एका किंवा अनेक परस्परसंबंधित व्यवहारांत) त्यांना स्थान असते ते कोणते, त्या व्यवहाराला ते काय योगदान करतात ह्यावर त्यांचे अर्थ अवलंबून असतात, त्याने ते निर्णित होतात अशा फिलॉसॉफिकल इन्व्हेस्टिगेशन्स मागची भूमिका आहे. असे असले तरी, ज्या जगात आपण वावरतो, ज्याच्यात भौतिक वस्तू, माणसे आणि आपण स्वतः आहोत ते जग - जे अवकाशात सामावलेले आहे आणि काळात बदल जाणारे आहे ते जग - आपण सर्व ओळखतो आणि ज्याच्या संदर्भात आपले सर्व व्यवहार चालतात, त्याच्याविषयी बोलण्याची एक मध्यवर्ती भाषा आहे आणि त्या भाषेत एक संकल्पनात्मक चौकट किंवा व्यूह अनुस्यूत आहे असे मानावे लागते. ही संकल्पनात्मक चौकट म्हणजेच कांटने जिचा क्रिटिक ऑफ प्युअर रीझनमध्ये शोध घेण्याचा प्रयत्न केला तीच चौकट होय, असे मानता येते. हा कांट आणि व्हिटगेन्टाइन यांच्यामधली दुवा होय."

येथेच, याच लेखात, कांटच्या भूमिकेची त्यांनी जी स्पष्टता केली आहे ती ध्यानात घेणे उपयोगाचे होईल व तसे करणे आवश्यकही आहे. रेगे लिहितात, "नीतिशास्त्रात स्वायत्त, असा म्हणजे ज्याला संकल्पस्वातंत्र्य आहे आणि स्वतःच्या कल्याणाची (हिताची, चांगल्या अवस्थेची कल्पना आहे असा, मानवप्राणी हा नैतिक कर्ता (moral agent) असतो, त्याला (त्याच्या कल्याणाला) स्वतःमूल्य असते आणि म्हणून तो स्वतःसाध्य (end-in-himself) असतो; असा नैतिक कर्ता. अशाच प्रकारे स्वतःसाध्य असलेल्या नैतिक कर्त्यांच्या मंडळाचा (kingdom of ends) सदस्य असतो, त्यामुळे स्वतःचे हित साधताना इतर सदस्यांच्या हिताच्या आड येणारे कोतेही कृत्य आपण करणार नाही ही मर्यादा तो स्वतःच स्वतःसाठी आणि इतरांसाठी घालून देतो, प्रत्येक सदस्य अशीच मर्यादा स्वतःसाठी व इतरांसाठी घालतो. स्वायत्त अशा माणसांनी स्वतःच्या संकल्पानुसार ह्या ज्या सार्वत्रिक मर्यादा स्वीकारलेल्या असतात ते नैतिक नियम होत ही कांटची नीतीविषयक भूमिका मला मान्य आहे. असे सार्वत्रिक नियम स्वतःसाठी आणि इतरांसाठी घालून देण्यात माणसाची विवेकशक्ती प्रकट होते. प्राणी म्हणून ज्या वासना, प्रेरणा इत्यादी मानवी प्रकृतीत सामावलेल्या असतात ते ह्या प्रकृतीचे एक अंग होय. आत्मनियमन आणि आत्मदिग्दर्शन करणारी त्याची विवेकशक्ती हे तिचे दुसरे अंग होय. ह्या दोन अंगांतील ताणाने मानवी जीवन व्यापलेले असते आणि त्यांच्या सुसंगतीतून नैतिक कृती जन्माला येते. माणसाच्या नैतिक



अनुक्रमणिका

जीवनाच्या संदर्भात विवेकशक्ती आणखी एक कार्य करते. नैतिक जीवनाचा आशय माणसे जी कृत्ये करतात त्यांची साध्ये माणसाच्या स्वाभाविक प्रकृतीतून लाभलेली असतात, तर त्यांचा आकार (form) त्याच्या विवेकशक्तीपासून लाभलेला असतो असे आपल्याला म्हणावेसे वाटेल. पण हा आकार हे विवेकशक्तीचे साध्यच असते. विवेकाने आकारित केलेले नैसर्गिक प्रेरणेचे जे साध्य असते ते नैतिक कृतीचे साध्य असते.

"विवेकशक्ती ज्याप्रमाणे सर्व साध्यांचे नियमन करते त्याप्रमाणे ती स्वतः काही साध्ये माणसाला देते. ज्ञान किंवा सौंदर्य - सौंदर्याचा आस्वाद आणि निर्मिती - ही विवेकजन्य साध्ये होत. मानवी प्रकृतीचे जे घटक आहेत त्यांचा विकास आणि आविष्कार ज्या जीवनात होतो ते चांगले मानवी जीवन. ह्या ॲरिस्टॉटिलियम कल्पनेचा पुनरुद्धार कांटने आपल्या क्रिटिक ऑफ जजमेंटमध्ये केला. पण अशा 'चांगल्या' जीवनाचा चांगुलपणा हा नैतिक चांगुलपणा नसतो. विवेकशक्तीपासून लाभणाऱ्या ज्ञान, सौंदर्य इ. मूल्यांची साधनाही नीतीच्या चौकटीत केली पाहिजे. मूरची 'स्वतोमूल्ये' कांटने सुरक्षित राखली आहेत.

"वैज्ञानिक ज्ञानाचा विषय होणारे जे अस्तित्व आहे त्याच्या पलीकडे असलेले अस्तित्व आहे, पण मानवी ज्ञानशक्तीला त्याचे ज्ञान होऊ शकत नाही. एक नैतिक प्राणी म्हणून आचरण करताना ह्या 'परतत्त्वा'चे आकलन होते, पण हे आकलन म्हणजे श्रद्धा असते, ज्ञान नसते असे कांटचे मत आहे आणि ते मला तत्त्वतः मान्य आहे."

रेग्यांची ही कांटवादी - किंवा कांट-व्हिटगेन्स्टाइन-वादी-भूमिका ध्यानी घेतली की बुद्धिप्रामाण्यवाद, अनुभव-वाद, विवेकवाद, विज्ञाननिष्ठा, श्रद्धा-अंधश्रद्धा या विषयांची जी मांडणी मराठीमध्ये सर्रास केली जाते, आणि जी रूढ व प्रतिष्ठित आहे तिच्यात व रेग्यांच्या मांडणीत मूलभूत व अनुल्लंघनीय अंतर पडणे स्वाभाविक व अटळ ठरते. ही जी रूढ व प्रतिष्ठित मांडणी आहे तीदेखील आजवर बव्हंशी ढिलेपणानेच केली जात राहिली. अलीकडच्या काळात 'ब्रिटिश अनुभववादा'ची आणि त्याचे परिणत स्वरूप असलेल्या 'लॉजिकल इम्पिरिसिझम'ची (तार्किक अनुभवाची) चोख दार्शनिक मांडणी आजचा सुधारक या मासिकातून प्रा. दि. य. देशपांडे करीत आहेत.

'तत्त्ववेत्त्याचे तत्त्वज्ञान' यासंबंधी रेग्यांनी जे म्हटले आहे ते येथे लक्षात घेणे महत्त्वाचे आहे. रेगे म्हणतात, "तत्त्वज्ञान हा ज्ञानप्रांतच असा आहे की प्रत्येक तत्त्ववेत्त्याचे तत्त्वज्ञान हे त्याचे तत्त्वज्ञान असते, त्याच्या व्यक्तिमत्त्वाशी, वैयक्तिक दृष्टिकोणाशी ते अविच्छेद्यपणे संलग्न राहते. न्यूटनचे सिद्धांत भैतिकीमध्ये निमज्जन पावतात, त्याच्या-पासून तुटून भौतिकाच्या सामान्य उपपत्तीचे ते भाग असतात. तत्त्वज्ञान असे त्या त्या विशिष्ट तत्त्ववेत्त्यापासून तुटत नाही. तत्त्वज्ञानाच्या परंपरेचा ते भाग बनते, पण त्याच्या निर्मात्याच्या व्यक्तिमत्त्वाशी ते निगडितही राहते."

"ह्यामुळे एका बाजूला काव्य आणि दुसऱ्या बाजूला विज्ञान-तर्कशास्त्र, इत्यादी ह्यांच्या दरम्यान तत्त्वज्ञानाच्या परंपरेचे स्थान असते. ते प्रामाण्याचा, सत्यतेचा दावा करते व म्हणून ते बौद्धिक असते. पण विश्वव्यापी, मानवव्यापी अशी दृष्टी आणि ह्या दृष्टीवर आधारलेली एक आदर्श जीवनसरणी त्यात प्रकट झालेली असते व म्हणून ते महाभारतासारखे महाकाव्य असते." (तत्त्वज्ञानातील माझी वाटचाल).

भौतिक सृष्टीचाच माणूस हा एका अंगाने घटक आहे. अन्य सजीवही याला अपवाद नाही. भौतिक वस्तू (वा पदार्थ) या नात्याने त्यांचे जे भौतिक व्यवहार होतात, तसेच त्यांच्या भौतिकेतर व्यवहारांचेही जे भौतिक अंग असते, ते विज्ञानाच्या कार्यकारणनियमांना अनुसरूनच घडते. पण विज्ञानाच्या चौकटीत व रीतींना अनुसरून घडणाऱ्या व्यवहारांचेच एक अंग असे आहे की जे विज्ञानाच्या पलीकडे जाते. आणि त्या व्यवहारांचे क्षेत्र फार मोठे तर आहेच, पण मानवी व्यक्ती आणि समाज यांच्या दृष्टीने अधिक महत्त्वाचे आहे. या सर्व व्यवहारांचे अधिष्ठान माणसाचे मन व बुद्धी हे आहे. ही सर्व 'मानवाची निर्मिती' आहे. ही भूमिका रेगे टाकून देत नाहीत. पण 'परतत्त्व', त्याचे आकलन ह्यांना ते त्यांच्या जीवनदृष्टीत मानाचे स्थान देतात, 'वैज्ञानिक ज्ञाना'चा दर्जा ते या आकलनाला देत नाहीत. कांटला अनुसरून ते 'श्रद्धा'हा शब्द वापरतात. पण (कांटच्या अर्थाने) श्रद्धा या स्वरूपातले आकलन व त्या आकलनाचा स्वीकार हे मानवी जीवनाचे अंतिम अधिष्ठान आहे व राहणार आहे असे म्हणतात. एका वेगळ्या पातळीवर ते त्याचे प्रामाण्य व त्याची सत्यता स्वीकारतात. इतकेच नाही तर, अंतिमतः, नीतीमूल्ये आणि नैतिक चांगुलपणा यांचा स्रोत 'वैज्ञानिक ज्ञानाचा विषय होणारे जे अस्तित्व आहे त्याच्या पलीकडे असलेलं अस्तित्व' हे आहे

असे बुद्धीच्या आधारानेच मनःपूर्वक स्वीकारतात.

बुद्धिप्रामाण्यवादी - विवेकवादी - विज्ञानवादी - इहवादी अशी जी वैचारिक तात्त्वज्ञानिक (फिलॉसॉफिकल) मांडणी आज आपल्याला परिचित आहे तिच्यापासून रेगे आपले अंतर स्पष्ट करतात. कांटने विद्यार्थ्यांसाठी (व जिज्ञासू सुशिक्षित वाचक-श्रोते यांच्यासाठी) दिलेल्या व्याख्यानांच्या टिपणांच्या आधारे सिद्ध केलेले रिलिजन विदिन दि बाऊंडस् ऑफ रीझन अलोन या मथळ्यांचे एक पुस्तक मरणोत्तर प्रसिद्ध केले गेले. या अर्थाने रेगे 'धार्मिक' वृत्ती बाळगणारे होते. या संदर्भात त्यांनी 'तत्त्वज्ञानातील माझी वाटचाल' या लेखाच्या शेवटी लिहिले : "माणूस अपूर्ण आहे, पण आपण अपूर्ण आहोत हे भान त्याला आहे. म्हणून पूर्णाची संकल्पना त्याला आहे आणि ह्या पूर्णाची त्याला ओढही आहे. ह्या पूर्णाविषयी परिकल्पना (कांटने वापरलेला शब्द idea) करण्याची स्वाभाविक प्रवृत्ती मानवी प्रकृतीत आहे... परातत्त्वाविषयी जी परिकल्पना-प्रतिमा विशिष्ट मानवी समूहाने किंवा व्यक्तीने केलेली असते तिच्याशी काही भावना आणि आचरणाची काही रुपे निगडित असतात. परंपरागत किंवा शास्त्रपूत विधी, संस्कार, व्रते, ध्यान, पूजा, इत्यादी ह्या आचरणात अंतर्भूत असतात. हा धार्मिक-अध्यात्मिक आचरणाचा, साधनेचा प्रांत होय. भक्ती, पूज्यभाव, प्रेम, वैराग्य इत्यादी भावनांनी ही साधना प्रेरित झालेली असते आणि ह्या साधनेने ह्या भावनांना बळकटी येते. मैत्री, करुणा, मुदिता, उपेक्षा, अहिंसा, अपरिग्रह या अध्यात्मिक साधनेत फुललेल्या, नीतीपर्लीकडे जाणाऱ्या पण नीतीशी सुसंगत असलेल्या भावना होत. परतत्त्वाच्या परिकल्पनेशी जर ह्या भावना आणि साधना संलग्न नसल्या, तिचा आविष्कार त्यांच्यात होत नसला, तर ती परिकल्पना केवळ तार्किक, शुष्क संकल्पना राहते. अशा अध्यात्मिक जीवनाची अनेक रुपे आहेत. ह्या सर्व भिन्न साधनांची परिणती एकाच 'अनुभवा'त होते असे एक भारतीय मत आहे.

रुचीनां वैचित्र्याद्ऋजुकुटिलनानापथजुपाम् ।
नृणाम् एको गम्यस्त्वमसि पयसां अर्णव इव ।।

असे असेलही. पण कदाचित असे असणारही नाही. जर असा अनुभव कोणाला असेल तर तो आपल्याला आला आहे असे तो सांगू शकणार नाही. पण त्याच्या जगण्याच्या रीतीतून तो प्रकट होईल. अध्यात्माचा प्रांत हा बहुविधतेचा प्रांत आहे. कदाचित हे परिकल्पित गूढतत्त्व कायमचे गूढ राहील आणि तरीही त्याचा स्पर्श ज्याला झाला आहे त्याला त्याच्या छायेतच जगावे लागेल. गूढाची ही जाणीव ही एका परीने माणसाचे एक ओझे आहे. पण त्याच्या मुक्तीचे बीजही तिच्यात आहे.

"मी स्वत: अध्यात्मिक साधक नाही. पण अध्यात्मिक साधनांच्या सर्व रुपांचा मी आदर करतो"

रेग्यांचे या ग्रंथात एकत्र केलेले लेख सामग्र्याने वाचले असता 'प्रत्येक' "तत्त्ववेत्त्याचे तत्त्वज्ञान हे त्याचे तत्त्वज्ञान असते" आणि "त्याच्या निर्मात्याच्या व्यक्तिमत्त्वाशी ते (तत्त्वज्ञान) निगडितही राहते", या त्यांच्या म्हणण्याचा प्रत्यय येतो. तसेच "तत्त्वज्ञानाच्या क्षेत्रात मांडण्यात आलेल्या सर्व भूमिका आदराने समजून घेऊन त्यांचा तार्किक विकस करुन, मग त्यांच्यावर कोणते आक्षेप घ्यावे लागतील ह्याचा गांभीर्याने विचार करावा' अशी प्रा. दि. य. देशपांडे यांच्याप्रमाणेच रेग्यांचीही वृत्ती असल्याचे स्पष्ट होते.

इहवाद (सेक्युलरिझम), बुद्धिप्रामाण्यवाद (रॅशनॅलिझम), मानवतावाद (ह्यूमनिझम), श्रद्धा आणि धर्म, विज्ञाननिष्ठा या विषयांच्या आज प्रचलित असलेल्या, शिष्टमान्य व प्रतिष्ठित मांडण्यांची चिकित्सा करुन रेग्यांनी त्यांच्यातल्या उणेपणावर जागोजागी नेमके बोट ठेवले आहे. 'मूलत: कांटवादी' वा 'कांटव्हिटगेन्स्टाइनवादी' भूमिकेमधूनच त्यांनी चोखपणे हे काम पार पाडले आहे. त्यांनी उपस्थित केलेले मुद्दे व प्रश्न, त्यांनी सुचविलेली फेरमांडणी ह्यांचा साकल्याने विचार करुन, त्यांचे म्हणणे आत्मसात करुन वैचारिक-तात्त्विक मांडणी केल्यास आधुनिकतेचे घटक असलेली जी मूल्ये व ध्येये (उदाहरणार्थ, व्यक्तित्वाची संकल्पना व तिचे मूल्य, विवेक, व्यक्तिस्वातंत्र्य, सामाजिक-आर्थिक-सांस्कृतिक समता, न्याय ही मूल्ये इत्यादी, जी एका प्रकारच्या लोकशाही समाजवादात परिणत होतात) स्वीकारुन ज्या एका वेगळ्या स्वरुपात भारतीय समाजाची आपल्याला घडण करावयाची आहे त्या समाजाला अधिष्ठान देणारे सामाजिक-नैतिक तत्त्वज्ञान आपण रचू शकू.



प्रा० मे० पुं० रेगे यांच्या विवेकवाद, विज्ञान आणि श्रद्धा या ग्रंथाला (लोकवाङ्मय गृह प्रकाशन २००४) श्री. वसंतराव पळशीकर यांनी लिहिलेली प्रस्तावना. पृ० तीन ते सतरा. उद्धरणांच्या संदर्भात दिलेले पृष्ठ क्रमांक त्या ग्रंथातील आहेत.

# श्रद्धा - विवेक

दि० य० देशपांडे

XVI- 12
मार्च २००६
वर्ष १६ - अंक १२

# आजचा सुधारक

विवेकवादी विचाराला वाहिलेले मराठी मासिक

### मासिकाचे स्वरूप व धोरण

मासिकाचे स्वरुप व धोरण गेली आठ वर्षे राहिले तेच राहावे. उदा. त्यात जाहिराती येऊ नयेत. देणग्या मिळवण्याचे प्रयत्न करु नयेत. विशेषत: ज्यामुळे आपल्याला किंचितही मिंधेपणा येईल अशा देणग्या अनाहूत आल्या तरी स्वीकारु नयेत.

मासिकाचे गेल्या आठ वर्षांत एक विशिष्ट रुप बनले आहे. त्याला एक व्यक्तिमत्त्व प्राप्त झाले असून त्याला एक दर्जा आहे. या दोन्ही गोष्टी कायम राहाव्यात. मासिकाला वर्गणीदार फार नाहीत हे खरे आहे. पण केवळ वर्गणीदार वाढावेत म्हणून त्याचा दर्जा खाली आणू नये. तसेच ते रंजक करण्याकरिताही त्यात फारसा बदल करु नये.

मासिकाचे स्वरूप विवेकवादी आहे. केवळ विवेकवादाला वाहिलेले दुसरे मासिक महाराष्ट्रात नाही असे मला वाटते. ते त्याचे वैशिष्ट्य टिकवून ठेवावे. त्याचा कटाक्ष श्रद्धेचा उच्छेद, विचार आणि जीवन यात विवेकावर भर देणे, जीवनाच्या विविध क्षेत्रांत समंजसपणा, विवेकीपणा अंगी बाणेल असे प्रयत्न यावर असावा. लोक पूर्ण विवेकवादी होतील अशी आशा करणे भाबडेपणाचे होईल. पण तरीही विवेकवाद जितका वाढेल तितका वाढविण्याचा प्रयत्न करावा.

मासिकाचे धोरण व्यक्तिस्वातंत्र्यवादी व समतावादी राहिले आहे. सर्व मानव समान आहेत, त्यात स्त्रियांचाही समावेश आहे. तसेच त्याचा विज्ञानावर भर असावा. वैज्ञानिक दृष्टी अंगी बाणेल असा प्रयत्न करावा. विज्ञानाच्या विकृतीपासून सावध रहावे.

आपले मासिक सामान्य नाही, ते एका हेतूने एका ध्येयाने प्रेरित झालेले आहे. ते तसेच राहावे, त्यामुळे ते केवळ विद्वानांकरिताच, किंवा विवेकवाद्यांकरिताच आहे अशी टीका कोणी केली तरी हरकत नाही. विद्वानांकरिताही मासिक चालविणे महत्त्वाचे आहे.

राजकीय विषय आपल्याला वर्ज्य नाहीत. पण सर्व राजकीय घडामोडींचा समाचार आपण घेतला पाहिजे असे नाही. ज्याने बुद्धी सुसंस्कृत होईल असे काहीही वर्ज्य नाही.

*[आसुतील १ व्या वर्षाच्या पहिल्या अंकातील दि. य. देशपांडे यांच्या संपादकीयामधून.]*

अनुक्रमणिका






## विवेकवादी मनुष्याला कधी हसू येते काय?

विवेकवादाविषयी प्रचलित असलेल्या अनेक विलक्षण आक्षेपांपैकी एक आक्षेप असा आहे की विवेकवादी माणसे भावनाहीन असतात. हा आक्षेप इतका विपरीत आहे की सामान्यपणे शहाणी असणारी माणसेही जेव्हा त्याचा पुरस्कार करतात तेव्हा हसावे की रडावे हे कळेनासे होते. वस्तुत: विवेकवाद ही एक अतिशय शहाणपणाची भूमिका असून तिचे स्वरूप नीट लक्षात घेतल्यास तिच्यात शंकास्पद किंवा विवाद्य असे काही शोधूनही सापडणार नाही अशी आमची समजूत होती. तिच्याविषयी अनेक खोटेनाटे, सर्वथा गैरलागू, असमंजस आक्षेप कोणी का घ्यावेत हे अनाकलनीय आहे.

या (कु) प्रसिद्ध आक्षेपांपैकी या लेखाच्या शीर्षकात व्यक्त झालेला आक्षेप एक आहे.

हा आरोप केला जातो याचे एक कारण असे असावे की आपण भावनांच्या आहारी जाऊ नये असे विवेकवादाचे आग्रहाचे सांगणे आहे. हे खरे आहे, परंतु त्याचा अर्थ भावनांना मानवी जीवनात स्थान नाही असे अभिप्रेत नसते. शृंगार, अपत्यस्नेह, क्रोध, भय इ. भावनांना त्यांचे स्थान आहे. परंतु त्या भावना अस्थानी प्रगट करणे गैर आहे हे सहज लक्षात येण्यासारखे आहे. उदा. एखादे गंभीर व्याख्यान चालू असताना हसणे किंवा शाळेत वर्ग चालू असताना आरडाओरड किंवा मारामारी करणे. शाळा सुटल्यावर मुलांनी परस्परांची थट्टामस्करी किंवा गोंगाट करणे क्षम्य असते. एवढेच नव्हे तर स्वाभाविकही असल्यामुळे काही प्रमाणात उत्तेजनीयही असते, असे म्हणता येते. म्हणजे भावनांच्या आहारी जाऊन विवेकविरोधी कृत्ये करणे चूक आहे असे म्हटल्याने भावनांचा धिक्कार केला जातो असे नाही.

परंतु जसे भावनांचे स्वत:चे क्षेत्र असते, तसे विवेकाचेही क्षेत्र असते. ते काय हे आता सांगितले पाहिजे.

विवेक म्हणजे reason. त्याचे दोन प्रांत आहेत. (१) ज्ञानाचा आणि (२) कर्मांचा. पहिल्या प्रांतात सत्य काय आहे, असत्य काय आहे, सत्यप्राप्तीचे उपाय काय आहेत, सत्यान्वेषणातील अडचणी काय आहेत, इ. प्रश्नांचा ऊहापोह केला जातो. दुसरा प्रांत भावनांच्या तारतम्याचा. त्यात कोणती कर्मे केल्याने मनुष्याला जास्तीत जास्त समाधान मिळू शकेल याचा विचार केला जातो. मानवी मनाचे घटक स्थूलमानाने पुढील आहेत. (१) विकार किंवा भावना; यांत काम, क्रोध, मत्सर, भय इत्यादींचा समावेश होतो; (२) विवेक नावाची आलोचक (reflective) आणि नियामक (controlling) शक्ती. ही शक्ती ज्ञान आणि कर्म दोन्हींचे नियमन करते. या जगात सत्य ज्ञान जवळ असल्याशिवाय क्षणभरही मनुष्याचा निभाव लागणे अशक्य आहे. आपल्या भोवती असलेल्या लक्षावधी वस्तूंचे गुण काय आहेत हे माहीत नसेल तर आपण इष्टप्राप्तीसाठी काय करावे आणि काय करू नये हे कोणालाही कळू शकत नाही. कोणत्या वस्तू पोषक आहेत आणि कोणत्या मारक आहेत हे माहीत असेल तर आपण स्वत:चे रक्षण करू शकतो. विषारी वनस्पती खाल्याने किंवा घाणेरडे पाणी प्याल्याने आजार आणि मृत्यू अटळ असतात, हे सत्यज्ञान आपल्याला मिळवून देण्याचे काम विवेक करतो. हे सत्य आहे, हे सत्य नाही, अमुक कर्म केल्याने अमुक फळ मिळते इ. ज्ञान आपल्याला डोळा, कान, नाक इ. इंद्रियांनी मिळणाऱ्या संवेदनांवर सामान्यीकरण, अनुमान इत्यादींचे संस्कार झाल्यामुळे प्राप्त होते.

पण मनुष्याच्या जीवनात इंद्रियांच्या संवेदनांखेरीज अन्यही घटक असतात. उदा. भावना. यांच्यामुळे आपल्या मनात काम, क्रोध, भय, इ.नी आपल्या मनाचा ताबा घेतला जातो. क्रोधाचे काम शत्रूचा प्रतिकार करण्याचे असते, तर भयाचे काम शत्रू आपल्याहून अधिक बलवान असल्यास त्याच्या वाटेला जाऊ नये हे सांगण्याचे असते. कोणतीही भावना कमीअधिक तीव्रतेने आपला ताबा घेते. भावनांच्या बाबतीत आपली भूमिका अकर्त्याची, सहन करण्याची असते, कर्त्याची नसते. 'मला भीती वाटली', असे आपण म्हणतो, मी भीती केली असे नाही. मला राग आला असे म्हणतो, मी राग केला असे म्हणत नाही. त्यामुळे आपल्या भावना आपल्यावर कमीअधिक ताबा मिळवू शकतात. एखाद्या वेळी क्रोध एवढा बेफाम होतो की त्याच्या भरात आपण असे काही करतो की जे क्रोध उतरल्यावर आपल्या पश्चात्तापास कारण होते. भयभीत मनुष्य विवेक न राहून स्वत:चे नुकसान करून घेतो. म्हणजे भावना आपल्याला इष्टकार्यात मदत करतात की अवसानघात करतात हे सांगता येत नाही. भावनांचे कार्य आलोचनाचे किंवा नियमनाचे नसते. म्हणून त्यांना एखाद्या आलोचक-नियामक शक्तीच्या नियंत्रणाखाली ठेवणे अवश्य असते. भावना सौम्य असू शकतील; तीव्र असू शकतील, किंवा त्या उच्छृंखलही होऊ







अनुक्रमणिका

शकतील. पण त्या कोणत्या स्वरुपात प्रकट होतील हे मनुष्याच्या तत्कालीन अवस्थेवर अवलंबून असते, आणि त्यांची मात्रा किंवा तीव्रता त्याच्या स्वभावाने ठरते. एखादा मनुष्य थोडे जरी मनाविरुद्ध झाले, तरी क्रोधाविष्ट होतो, पण दुसरा त्याकडे दुर्लक्ष करतो. भावना मनुष्यांच्या स्वभावानुसार तीव्र किंवा सौम्य स्वरूपात उद्भवतात; पण त्यांच्यात आलोचनाची, विचार करणारी शक्ती नसल्यामुळे त्या स्वतःचे स्वरुप ओळखू शकत नाहीत. विचार करण्याची शक्ती म्हणजे विवेक. अमुक प्रसंगी क्रोध बेफाम होऊ देणे चुकीचे, आत्मघातकी आहे हे तोच फक्त सांगू शकतो.

म्हणून भावना आवरण्याचे काम विवेकाला करावे लागते.

परंतु भावनांना मोकाट सोडणे आत्मघातकी असले तरी त्याचे पूर्ण दमनही अनिष्ट आहे. कारण भावनाशून्य जीवन म्हणजे शुष्क, नीरस होणार हे उघड आहे. काम, क्रोध, भय, हास्य इ. भावनांना त्यांचे त्यांचे स्थान आहे. त्या जर मनात निर्माण झाल्या नाहीत तर जीवनात जगण्यासारखे काहीच उरणार नाही. पण भावनांची निर्मिती जरी अत्यावश्यक असली तरी त्यांचे नियमन न केल्यास त्या अनावर होऊ शकतात. त्यांना आवरण्याचे काम विवेकाला करावे लागते. भावनाशून्य विवेक आणि विवेकशून्य भावना दोन्ही हानिकारक आणि अनिष्ट आहेत.

विवेकवादी मनुष्याला कधी हसू येते काय हा प्रश्न विवेकवादाचे म्हणणे काय आहेत ते नीट लक्षात न घेतल्यामुळे विचारला जातो.

(आजचा सुधारक, मार्च २००६)



## अंधश्रद्धा निर्मूलन आणि धर्म

साधना साप्ताहिकाच्या १ मे १९९४ रोजी प्रसिद्ध झालेल्या ना. ग. गोरे प्रथम स्मृतिदिन विशेषांकात डॉ. नरेंद्र दाभोलकर यांनी लिहिलेल्या लेखात एक मूलभूत प्रश्न उपस्थित केला आहे. ते म्हणतात की 'आगरकरांचा अपवाद सोडला तर सर्व समाजसुधारकांनी धर्मसुधारणेची चळवळ चालविली ही त्यांची वैचारिक मर्यादा होती की प्रगल्भता? डॉ. आंबेडकर, गाडगे महाराज यांच्यानंतरच्या जवळपासच्या गेल्या अर्धशतकात महाराष्ट्रात धर्मभावनेविषयी जन-सामान्यांच्या मनाशी होणारा संवाद थांबला, कृतिकार्यक्रम तर दूरच राहिला, हे परिवर्तनवादी शक्तींच्या दृष्टीने इष्ट की अनिष्ट?.... नानासाहेब व त्यांच्यानंतरच्या दोन पिढ्या, ज्या सर्वांच्यापासून आम्ही वैचारिक मार्गदर्शन घेतले, ते सर्वजण याबाबत निःसंदेह होते. आज चळवळीत असलेल्या अनेक तरुण कार्यकर्त्यांना हे आकलन प्रश्नचिन्हांकित करावेसे वाटते.... त्यांचे मत थोडक्यात असे की प्रतिगामी शक्तींचा पायाभूत आधार धर्मच आहे अशी मांडणी बहुतेक सर्व परिवर्तनवादी करत आले आहेत. स्वाभाविकच तर्काच्या आधारे धर्म निरर्थक ठरवून कोट्यवधी माणसांच्या मनातून त्याचे अस्तित्त्व पुसून काढण्याची वा किमान निरर्थक ठरविण्याची महत्त्वाकांक्षा बाळगली गेली. परंतु जनमानसाची धार्मिकता समजून घेण्यात अपुऱ्या आकलनाने झालेली ही चूक होती काय? या भूमिकेमुळे पुरोगाम्यांनी धर्माकडे पाठ फिरवली, आणि लोकांनी स्वाभाविकपणे त्यांच्याकडे पाठ फिरविली... कोणत्याही धर्माचा मूलभूत अस्सल आशय हा शोषण विरोधी आणि मानवतावादी असाच होता. ही खरी धार्मिकता पद्धतशीरपणे बाजूला सारून धर्मविधींचे पोकळ पालन, मूल्यविवेकाचा पूर्ण अभाव, अहंकारी हिंसक आक्रमकता - हे धर्मकल्पनेचे मुख्य लक्षण बनविण्याचा पद्धतशीर प्रयत्न चालू आहे. जनसमूहाच्या पातळीवर याचा मुकाबला कसा करावयाचा? खऱ्या धार्मिकतेचे वेगळेपण मान्य करून, संवर्धन करून, की धर्म नाकारून? प्रश्न अंधश्रद्धानिर्मूलनाचा असो, जमातवादाच्या मुकाबल्याचा असो, की धर्मनिरपेक्ष राष्ट्रउभारणीचा असो, त्यासाठी धर्मभावनेचे सखोल चिंतन व त्या आधारे अधिक अर्थपूर्ण (केवळ व्यवहारी नव्हे) कृतिकार्यक्रम महत्त्वाचा ठरत नाही काय?'

नानासाहेबांचे धर्मविरोधी मार्गदर्शन ज्यांना प्रश्नचिन्हांकित करावेसे वाटते ती तरुण कार्यकर्ती मंडळी कोण आहेत ते मला माहीत नाही; परंतु त्यांच्या मनात असा किंतु निर्माण झाला आहे हे खरे असेल तर ती चिंताजनक गोष्ट आहे हे निश्चित. अंधश्रद्धेचे निर्मूलन करावयास निघालेल्या मनुष्यास धर्माचे निर्मूलन करावे लागणे क्रमप्राप्त आहे. अंधश्रद्धानिर्मूलनाचे ध्येयच सोडून द्यायचे असेल तर गोष्ट वेगळी.

धर्माचा पाया श्रद्धा आहे हे खुद्द धार्मिकच मान्य करतात. फक्त त्यांचे म्हणणे असे असेल की ती श्रद्धा अंधश्रद्धा






अनुक्रमणिका



नव्हे, डोळस श्रद्धा असते. पण हे म्हणणे अनाकलनीय आहे. श्रद्धा म्हणजे ज्या गोष्टींच्या सत्यत्वाचा कसलाही पुरावा नाही तिच्या सत्यत्त्वावरील अढळ विश्वास. धर्मावरील श्रद्धा याच जातीची आहे. ईश्वर, पापपुण्य, स्वर्गनरक, परलोक, पुनर्जन्म, इत्यादि कोणत्याही गोष्टीचा कसलाही पुरावा उपलब्ध नाही. या सर्व गोष्टींची साधक प्रमाणे देण्याचे असंख्य प्रयत्न मी-मी म्हणणाऱ्यांकडून आजवर केले गेले आहेत. परंतु त्यांपैकी एकही अंशत: देखील निर्णायक नाही हे असंख्य वेळा दाखवून झाले आहे. ज्याचा पुरावा असेल त्यावरच आणि तो ज्या प्रमाणात असेल त्या प्रमाणातच विश्वास ठेवावा हे जर विवेकवादाचे पहिले तत्त्व असेल तर धर्माच्या वरील अंगावरील विश्वास विवेकविरोधी आहे हे मान्य करण्यावाचून गत्यंतर नाही. अंधाहून अंध श्रद्धेचाच तो प्रकार होईल.

इथे असा प्रश्न उपस्थित होण्याचा संभव आहे की श्रद्धेत असा काय दोष आहे की ज्यामुळे आपण तिचा सर्वथा त्याग करावा? त्याचे उत्तर असे आहे की एखाद्या गोष्टीचा श्रद्धेने सत्य म्हणून स्वीकार करणे ही गोष्ट अत्यंत असमंजस आहे. एखादे विधान तू का सत्य मानतोस? याला 'माझी त्यावर श्रद्धा आहे' हे उत्तर पूर्णपणे गैरलागू आहे. मनुष्याजवळ आपल्या मतांची चिकित्सा करण्याचे एक साधन आहे, आणि ते वापरण्याची शक्तीही आहे. ते साधन न वापरता अचिकित्सकपणे मते बनविणे आणि त्यांना श्रद्धेचा आधार देणे ही गोष्ट माणसाला शोभणारी नाही. ज्यांची बुद्धी अप्रगल्भ आहे असे आदिवासी मानव, बालके इत्यादींनी आपले विश्वास न तपासता स्वीकारले तर त्यांना दोष देता येत नाही, कारण त्यांच्याजवळ त्यांचा विवेक करण्याची शक्तीच नसते, किंवा असलीच तर अगदीच प्रारंभिक स्वरूपाची असते. परंतु ज्यांची बुद्धी पुरेशी प्रगल्भ झाली आहे त्यांनी अप्रगल्भ बुद्धीच्या माणसासारखे वागणे ही लाजिरवाणी गोष्ट आहे.

डॉ. दाभोलकरांच्या युक्तिवादातील प्रमुख मुद्दे पुढील आहेत :

१. जनमानसाच्या धार्मिकतेचे पुरोगाम्यांकडून अपुरे आकलन झाले, आणि त्यामुळे त्यांनी धर्माकडे पाठ फिरविली.

२. कोणत्याही धर्माचा मूलभूत अस्सल आशय शोषणविरोधी आणि मानवतावादीच होता. परंतु या खऱ्या धार्मिकतेकडे दुर्लक्ष करून धर्मविधींचे पोकळ पालन, मूल्यविवेकाचा पूर्ण अभाव, अहंकारी हिंसक आक्रमकता हे धार्मिकतेचे मुख्य लक्षण बनविले गेले.

३. धर्मभावनेचे सखोल चिंतन आणि त्याआधारे अधिक अर्थपूर्ण कार्यक्रम स्वीकारणे हे अधिक महत्त्वाचे आहे.

या मुद्यांचा आता आपण क्रमाने विचार करू.

१. जनमानसाच्या धार्मिकतेचे पुरोगाम्यांचे आकलन अपुरे झाले हे खरे असेल तर ते एवढ्याच अर्थाने की धर्मभावनेची मानवी मनावर किती खोल रुजलेली आणि किती पक्की असते हे त्यांनी पुरेसे ओळखले नाही. बुद्धिमंतांचीही श्रद्धा डळमळीत करणे जिथे दुरापास्त असेत तिथे सामान्य लोकांची दृढमूल श्रद्धा जवळपास अचल असल्यास आश्चर्य नाही. त्यामुळे धर्मभावनेचे उच्चाटन ही अशक्यप्राय गोष्ट आहे, हे त्यांच्या लक्षात आले नाही. पण याचा अर्थ एवढाच होतो की पुरोगाम्यांना आपल्या उद्दिष्टांच्या दुष्करतेची पुरेशी स्पष्ट कल्पना नव्हती. आपले काम किती प्रचंड आहे, आणि ते पिढ्यानुपिढ्या पुरणारे आहे याची जाणीव नसल्यामुळे, आपल्या प्रयत्नांना फारसे यश येत नाही हे पाहून ते नाउमेद झाले असावेत. हे काम दहापाच तर राहोच, पण शेदोनशे वर्षांतही पुरे होणार नाही ही खूणगाठ बांधून त्यांना कंबर कसावी लागेल.

२. डॉ. दाभोलकर म्हणतात की खरी धार्मिकता किंवा धर्माचा अस्सल आशय याकडे पुरोगाम्यांचे दुर्लक्ष होते, आणि धर्मविधींचे पोकळ पालन म्हणजे धर्म असे ते समजतात. हे अनर्थकारक आहे असे त्यांचे म्हणणे आहे. तेव्हा धर्माचा अस्सल आशय काय आहे याचा थोडा शोध घेऊ.

सर्व धर्मांचा अस्सल आशय एकच आहे असे डॉ. दाभोलकर म्हणतात. आता सर्व धर्मात समान काही तरी आहे हे नि:संशय, एरव्ही आपण त्या सर्वांना धर्म म्हणालो नसतो. पण हे म्हणणे खरे असले तरी ते पूर्णपणे खरे नाही. सर्व धर्मात समान अशा काही गोष्टी असल्या तरी प्रत्येक धर्म अन्य सर्व धर्मांहून वेगळाही असतो, आणि धर्मसंस्थापक आणि धर्मानुयायी यांच्या दृष्टीने अन्य सर्व धर्मांहून वेगळा असलेला धर्मच महत्त्वाचा असतो. सर्वधर्मसमभाव मानणारे महात्मा गांधीसुद्धा आपल्याला हिंदू धर्माची मातब्बरी अन्य सर्व धर्मांहून अधिक वाटत असल्याचे म्हणतात. ('.... the Hindu religion which I certainly prize above all other religions', All Men are Brothers, २.२). जगात धर्म अनेक आहेत. केवळ धर्म - म्हणजे जो हिंदू नाही, मुस्लिम नाही, बौद्ध नाही, ख्रिस्ती नाही, फक्त धर्म आहे असा - नाही. ज्याप्रमाणे जगात अनेक पशू आहेत, पण 'पशू' नावाची

एक वस्तू नाही. जगात गाय आहे, म्हैस आहे, घोडा आहे, इ.; पण जो यांपैकी काहीही नाही आणि फक्त पशू आहे असे काही नाही. आणि तसेच गाय म्हणजे म्हैस नव्हे, आणि घोडा म्हणजे गाढव नव्हे. आपण हे लक्षात ठेवले पाहिजे की जगात धर्म (अनेकवचनी - religions) आहेत, पण धर्म (एकवचनी - religion) - शुद्ध धर्म नाही. त्यामुळे कोणताही धार्मिक घेतला की तो हिंदू तरी असतो, किंवा मुसलमान तरी असतो, किंवा अन्य शेकडो धर्मांपैकी कोणत्या तरी एका धर्माचा अनुयायी असतो, केवळ धार्मिक, शुद्ध, निर्विशेष धार्मिक कोणीही नसतो. कोणत्याही धर्माचे सार त्याच्या वैशिष्ट्यांत, अन्य सर्व धर्मांहून वेगळे असण्यात आहे. आणि त्यामुळे सर्व धर्मांत जे साम्य सखोल चिंतन जाणवते त्याचे कोणत्याही धर्माच्या दृष्टीने काही महत्त्व नाही. जो पैगंबर मानत नाही, कुराणावर ज्याची श्रद्धा नाही, शरियाप्रणीत विधिनिषेध पाळीत नाही तो मुसलमान नाही. आणि त्याचप्रमाणे जो वेद, उपनिषदे, गीता, रामायण, महाभारत मानीत नाही तो हिंदू नाही. म्हणून सर्व धर्मांचे सखोल चिंतन करून त्यांचे समान सार हुडकून काढल्यावर तो उद्योग निरुपयोगी आहे हे आपल्या ध्यानात येते.

डॉ.दाभोलकर म्हणतात की सर्वच धर्मांचा अस्सल आशय शोषणविरोधी आणि मानवतावादी असतो. हे ते कोणत्या आधाराने म्हणतात हे कळायला मार्ग नाही. वास्तविक धर्म आणि शोषणविरोध यांचा कसलाही संबंध नाही. उदा. हिंदुधर्माच्या कोणत्या ग्रंथात त्यांना शोषणविरोध दिसला? वेदांत? उपनिषदांत? की मनुस्मृतीत? आणि मानवतावाद ही कल्पना तर त्या शब्दाप्रमाणे अगदीच नवी आहे, आणि तिचा धर्माशी कसलाही संबंध नाही. येशूने सर्व रंजल्यागांजल्यांना स्वर्गाचे राज्य देऊ केले, पण त्याकरिता ख्रिस्ती झाले पाहिजे अशी अट होती. अन्य लोकांना निरंतर नरकातून सुटका नाही.

डॉ. दाभोलकरांचे म्हणणे वाच्यार्थाने घेणे कदाचित बरोबर नसेल. तसे न करता जरा सैल अर्थ केला तर त्यात सत्यांश आहे असे म्हणता येईल. तो सत्यांश म्हणजे धर्मात नीतीचा अंतर्भाव असतो, आणि ही नीती बऱ्याच प्रमाणात सर्व धर्मांत समान असते. उदा. खरे बोलावे, हिंसा करू नये, शेजाऱ्यावर प्रेम करावे, इत्यादि गोष्टी सर्व धर्मांना मान्य असतात. पण शुद्ध नैतिक गोष्टी आणि धार्मिक गोष्टी यांची धर्मात इतकी सरमिसळ झालेली असते, की नैतिक काय आणि धार्मिक काय याचा निर्णय करणे कठीण होते. बहुधा प्रारंभी नीती आणि धर्म एकत्रच होते. नैतिक कल्पनाचा उगम कदाचित धार्मिक जीवनातच झाला असेल. पण असे असले तरी धार्मिक प्रेरणा वेगळी आणि नैतिक प्रेरणा वेगळी. त्या प्रेरणा जरी आरंभी एकत्र असल्या तरी जेव्हा शुद्ध नैतिक प्रेरणेची कल्पना स्पष्ट झाली तेव्हा ती स्वतंत्र प्रेरणा असून तिला धार्मिक प्रेरणेची गरज नाही हे दिसून आले. वैचारिक स्पष्टता आणि व्यावहारिक सफलता या दोन्ही दृष्टींनी नैतिक प्रेरणेचे स्वातंत्र्य लक्षात ठेवणे श्रेयस्कर आहे. या दृष्टीने पाहता सर्व धर्मांचे नैतिक शिकवण स्थूलमानाने एकच असते. एवढ्यावरून सर्व धर्मांचा अस्सल आशय एकच असतो असे म्हणणे दिशाभूल करणारे आहे. खरी धार्मिकता म्हणजे धर्मविधींचे पालन, मूल्यविवेकाचा अभाव, आणि हिंसक आक्रमकता, निदान परधर्माच्या आक्रमणाविरुद्ध सदैव जागरुकता- ह्यातच सामावलेली आहे.

सर्वधर्मसमभाव किंवा सर्व धर्म सारखेच चांगले आहेत असे म्हणणाऱ्या लोकांची धार्मिकता खूपच पातळ झालेली असते. एरवी आपला धर्म अन्य धर्मांपेक्षा श्रेष्ठ नाही असे ते म्हणते ना. सर्वधर्मसमभाववादी मनुष्य एका अर्थाने निधार्मिकच झालेला असतो; कारण त्याच्या मते सर्व धर्म समान असल्यामुळे कोणत्याच धर्माचा (म्हणजे धर्मविधींचा) अधिकार त्याला मान्य नसतो.

३. धार्मिकतेचे सखोल चिंतन करून पुरोगाम्यांनी अधिक अर्थपूर्ण कार्यक्रम स्वीकारला पाहिजे, असे डॉ. दाभोलकर म्हणतात. धार्मिकतेचे सखोल चिंतन करून त्यात काय सापडते ते मला माहीत नाही, पण मला मात्र धार्मिकता म्हणजे श्रद्धेने घातलेला धुमाकूळ याहून वेगळे तत्त्व सापडत नाही. डॉ. दाभोलकर अंधश्रद्धानिर्मूलनाचे कार्य करतात, आणि ते कार्य केले पाहिजे यासंबंधी ते निःशंक असावेत असा माझा तर्क आहे. आता जनसामान्यांच्या अंधश्रद्धेवर हल्ला करताना ते जी साधने वापरणार ती तर्क आणि विवेक हीच असणार. मरिआईला बोकड बळी देणे, खंडोबाला मुरळी सोडणे या प्रथा अंधश्रद्धेवर आधारलेल्या आहेत, आणि म्हणून या गोष्टी आपण टाकून दिल्या पाहिजेत असे ते त्या प्रथा पाळणाऱ्यांना सांगणार. पण ज्या प्रकारचे युक्तिवाद ते अंधश्रद्धांविरुद्ध करतात, ते नेमके तेच युक्तिवाद प्रगल्भ धर्मश्रद्धेविरुद्धही लागू होतात. मरिआईला बोकड दिला नाही तर ती रागावते आणि आपल्यावर काही अरिष्ट येते हे खोटे

अनुक्रमणिका

आहे, कारण त्याचा कसलाही पुरावा नाही, उलट त्याच्याविरुद्ध भरपूर पुरावा आहे हेच ते भक्तांना सांगत असणार. मग हेच युक्तिवाद धार्मिकांच्या अस्सल श्रद्धांविरुद्धही लागू होतात हे त्यांना का सांगायचे नाही? ईश्वराच्या अस्तित्त्वाचा कसलाही पुरावा नाही हे आपण त्यांना सांगणार का नाही? पुनर्जन्म, स्वर्ग-नरक इत्यादि गोष्टी पूर्णपणे काल्पनिक असून त्यांना कसलेही प्रमाण नाही हे त्यांना का सांगायचे नाही. जनसामान्यांच्या धार्मिक भावनांची कदर करायची म्हणजे त्यांना सर्व प्रकारच्या निराधार, काल्पनिक गोष्टी सत्य मानू द्यायच्या? त्यांना धर्मगुरुंच्या जोखडाखाली राहू द्यायचे? सामान्य मनुष्य अज्ञ किंवा अडाणी असेल, आणि त्याच्या ठिकाणी तात्त्वज्ञानिक युक्तिवाद समजण्याची ताकद नसेल. पण धर्म मानणारे सर्वच अडाणी आणि अशिक्षित नसतात. आपल्या सुशिक्षित समाजातील ९०% (किंवा त्याहूनही अधिक) लोक धार्मिक आहेत. त्यांनाही धर्माचे वैयर्थ्य सांगायचे नाही काय? आणि अशिक्षित माणसाच्या मनावरही धर्माचा पगडा बिंबवण्यासाठी युक्तिवाद केले जातातच. उदा. 'सर्व मनुष्य एकाच परमेश्वराची लेकरे आहेत', किंवा 'आत्मा आणि परमात्मा एकच आहेत', 'जे पिंडी ते ब्रह्मांडी' ही वाक्ये आपण त्यांना ऐकवीत नाही काय? ती जर त्यांना कळतात, तर त्यांच्यावरील टीकाही त्यांना कळेल. धर्मपरीक्षेतील सर्वच युक्तिवाद गहन असतात असे नाही.

ज्या तरुण कार्यकर्त्यांना नानासाहेबांचे मार्गदर्शन प्रश्नचिन्हांकित करावेसे वाटते त्यांनी शांतपणे आत्मपरीक्षण करावे. माझी अशी समजूत आहे की त्यांचा विवेकवादच कमी पडतो आहे. लहानपणी आपल्या सर्वांवरच धार्मिक संस्कार झालेले असतात. त्यांतून आपल्याला आपली सुटका करुन घ्यावी लागते. पण ही सुटका कदाचित अपुरी झाली असेल, आणि मूळची आस्तिक वृत्ती पुन्हा डोके वर काढत असेल. तसे होता कामा नये. मुख्य मुद्दा कार्यकर्त्यांची बुद्धिनिष्ठा किंवा विवेकनिष्ठा कितपत पक्की आहे हा आहे. ती डळमळीत होऊ देणे अनर्थकारक होईल. लोक त्यांच्याकडे प्रथम पाठ फिरवितील हे अपेक्षितच आहे. विवेकनिष्ठा ही गोष्ट कठीण आहे, लोकांचे तिचे आकलन आंशिकच राहणार. पण ते आपल्यांकडे पाठ फिरवितात म्हणून कार्यकर्त्यांनी धर्माला शरण जावे हा त्यावर उपाय खासच नाही.

(आजचा सुधारक, जुलै १९९४)



## प्रा० मे० पुं० रेगे

मी रेग्यांना प्रथम पाहिले १९६५ मध्ये, कोल्हापूरला. Indian Philosophical Association १९६५ चे वार्षिक अधिवेशन कोल्हापूर येथे शिवाजी विद्यापीठाच्या निमंत्रणावरुन भरले होते. त्याचे रेगे अध्यक्ष होते. त्यापूर्वी त्यांची माहिती मला त्यांच्या मासिकातून येणाऱ्या लेखांनी झाली होती. मर्ढेकरांच्या सौंदर्यशास्त्रावर त्यापूर्वी आणि त्यानंतर पुष्कळ लिहिले गेले. पण ज्याला अस्सल तत्त्वज्ञात्मक लिखाण म्हणता येईल असे त्यापैकी फारच थोडे लिखाण आहे. याचे कारण मर्ढेकरांचे सौदर्यशास्त्र हे तात्त्वज्ञानिक मत होते, (निदान त्याचा दावा तसा होता,) आणि दुर्दैवाने त्यावेळी तत्त्वज्ञानाची व्यासंगी मंडळी महाराष्ट्रात नव्हती. माझे म्हणणे कोणाला कदाचित अतिशयोक्त वाटेल, पण मला गंभीरपणे असे म्हणायचे आहे की, त्यावेळच्या पुणे आणि मुंबई येथील तत्त्वज्ञानाच्या धुरंधर प्राध्यापकांचा तत्त्वज्ञानाचा व्यासंग फारच जुजबी होता. त्यामुळे रेग्यांचे मर्ढेकरावरील लेख जेव्हा 'छंद', 'नवभारत' या नियतकालिकांतून येऊ लागले तेव्हा तो किती अपूर्व गोष्ट होती हे फारच थोड्या लोकांना कळले असेल. मी ते लेख वाचले तेव्हा ते अस्सल तत्त्वज्ञानात्मक लिखाण असल्याची प्रचीती मला आली आणि 'हा कोण संप्रति नवा पुरुषावतार?' असे कुतूहल माझ्या मनात निर्माण झाले. त्यानंतर १९६५ मध्ये त्यांची ओळख झाली आणि त्यांची कुशाग्र बुद्धिमत्ता तसेच तत्त्वज्ञानाचा गाढा व्यासंग यांच्या जोडीला त्यांचे प्रसन्न दर्शनीय व्यक्तिमत्त्व आणि सहज नर्म विनोद करण्याची हातोटी यांच्यामुळे मी त्यांचा 'फॅन' झालो.

रेगे वास्तविक माझ्याहून सहा वर्षांनी लहान पण वाचन, आकलन आणि स्वतंत्र चिंतन यातील त्यांची इयत्ता असामान्यांचीच आहे. त्यांची असामान्यता प्रथम भेटीतच आपल्या लक्षात येते, तशी ती माझ्या आली. परंतु तिचे खरे स्वरूप कळायला मला पुष्कळ वर्षे लागली. कोल्हापूरच्या अधिवेशनानंतर आमच्या भेटी दरवर्षीच होऊ लागल्या, आणि त्या प्रत्येक भेटीत त्यांच्या व्यासंगाचा आणि मर्मदृष्टीचा नवा पैलू दृष्टीपत्तीस येत गेला. तत्त्वज्ञ कुणीही असो, कांट असो, रसेल असो की व्हिटगेन्शटाईन असो, त्याचे रेग्यांचे आकलन किती खोल आहे हे सतत नव्याने लक्षात येईल. तत्त्वज्ञानाच्या सर्व शाखांत त्यांना अनिर्बंध गती होती (आणि अर्थात आजही आहे). आणि त्यातल्या त्यात नवीन तर्कशास्त्रात तर त्यांचा हात

धरू शकेल असा आपल्या देशात कुणी असेल असे वाटत नाही. महाराष्ट्रातील विद्यापीठात नवीन तर्कशास्त्र अभ्यासक्रमात प्रविष्ट झाल्याला आज निदान २० वर्षे झाली आहेत पण त्याच्या अगदी प्राथमिक कामाचीही जाण असणारे प्राध्यापक अजूनही विरळेच आहेत, हे लक्षात घेतले म्हणजे रेग्यांची तयारी किती विलक्षण आहे याची कल्पना येईल.

रेग्यांनी ग्रंथरचना फारशी केली नाही. माझ्या माहितीप्रमाणे त्यांची चारच पुस्तके प्रसिद्ध झाली आहेत. १)'तत्त्वज्ञानाच्या समस्या' (हे पी. रसेलच्या 'Problem of Philosophy' चे भाषांतर), २) 'पाश्चात्य नीतीशास्त्राचा इतिहास' हे Mackintyre च्या 'A History of ethies' चे भाषांतर, ३) प्रा. रा. भा. पाटणकरांच्या 'कांटचे सौंदर्यशास्त्र' या ग्रंथाला त्यांनी दिलेले 'कांटचा विचारव्यूह' हे कांटच्या पहिल्या दोन Critiques चे संक्षिप्त विवेचन, ४) आकारिक तर्कशास्त्र. पण या चारही ग्रंथात त्यांचा सखोल अभ्यास आणि कठीण विषयाच्या प्रतिपादनाची हातोटीही दिसून येते. रसेलचे पुस्तक १९१२ इतके जुने तेव्हापासून मध्यंतरी ६० वर्षे तत्त्वज्ञानाची वाटचाल चालूच होती. रसेलची स्वत:चीच अनेक पुस्तके प्रसिद्ध झाली होती. आणि अन्य तत्त्वज्ञांनी मोठ्या संख्येने त्यातील विषयावर लिहिले होते. रेग्यांनी आपल्या अनुवादाला जोडलेल्या 'प्रस्ताविक भाष्य' या मूळ पुस्तकाइतक्याच दीर्घ प्रस्तावनेत या ६० वर्षातील लिखाणाचा समर्थ आढावा घेतला असून त्यामुळे हे पुस्तक एक अतिशय मूल्यवान असा ग्रंथ झाला आहे. तीच गोष्ट 'कांटचा विचारव्यूह' या प्रस्तावनेची. कांटचा विचार मुळात अतिशय कठीण आणि त्याची शैली दुर्बोध. त्यामुळे तत्त्वज्ञानाचे बहुतेक प्राध्यापकही कांटचा अभ्यास इतिहास पुस्तकातून करतात. पण रेग्यांनी त्या शंभर पानात कांटच्या विवेचनाचे सार उपलब्ध करून दिले आहे. त्यांचे चौथे पुस्तक 'आकारिक तर्कशास्त्र' यात ज्याला नवीन तर्कशास्त्राचा प्राथमिक भाग (Elementry logic) म्हणतात. (पण जे वस्तुत: खूपच प्रगत आणि कठीण आहे) त्याची पूर्ण मांडणी केलेली आहे. हे या विषयावरचे मराठीतील पहिले आणि आजपर्यंत शेवटचे अधिकारी पुस्तक आहे.

रेग्यांनी ग्रंथरचना फारशी केली नाही असे मी म्हणालो, पण ते त्यांनी केलेल्या सुट्या निबंधांच्या तुलनेत. यातीलही काही लिखाण अनुवादात्मक आहे. उदा. मिल्च्या Utilitarianism मधील शेवटच्या प्रकरणाचे भाषांतर. अन्य काही लिखाण तत्त्वज्ञानांच्या विविध शाखांमधील काही नवीन विचारांचा परिचय करून देण्याकरिता केलेले आहे. उदा. Lucasiewies च्या 'Aristotle's syllogistic' या प्रसिद्ध ग्रंथाचा परिचय किंवा मिल्च्या आत्मचरित्राचा या वर्षाचा 'आजचा चार्वाक' मध्ये करून दिलेला परिचय.

रेग्यांच्या प्रतिभेची झेप सर्वतोगामी आहे. तत्त्वज्ञानाचे कोणतेही क्षेत्र तिला अगम्य नाही. याशिवाय राज्यशास्त्र, समाजशास्त्र, अर्थशास्त्र, मानसशास्त्र यातही त्यांची प्रतिभा संचार करते. भौतिकशास्त्राचीही त्यांना चांगली जाण आहे.

रेग्यांनी केलेले आणखी एक महत्त्वाचे कार्य म्हणजे त्यांनी वेळोवेळी विद्येच्या क्षेत्रातील ढोंग वेशीवर टांगले. आतापर्यंत त्यांना हे काम ५-६ वेळा केले आहे. नरहर कुरंदकरांच्या 'रूपवेद' ची त्यांनी केलेली चिरफाड निर्दय वाटते, पण ती लाजवाब आहे. तसेच डॉ. ग.ना. जोशी किंवा प्रा. वीणा गजेंद्रगडकर यांच्या पुस्तकाची केलेली परीक्षणे निरुत्तर करणारी आहेत. हे काम करीत असताना त्यांच्यावर मत्सराचा आरोप केला गेला आहे, परंतु त्यांनी हे केवळ कर्तव्य भावनेने केले हे नि:संशय.

अलीकडे त्यांच्या प्रतिभेने आणखी एका क्षेत्रात प्रवेश केला आहे. आधी त्यांना संस्कृत फारसे येत नव्हते पण आता त्यांना चांगले संस्कृत येत असून भारतीय तत्त्वज्ञानातील विविध दर्शनांचा अभ्यास ते मूळग्रंथातून करीत आहेत.

याखेरीज एक नवा उपक्रम त्यांनी गेल्या ७-८ वर्षात सुरू केला आहे. पूर्व-पश्चिम संवाद. भारतीयांचा तत्त्वज्ञानातील पराक्रम मोठा आहे. पण त्या विद्येची जाणकार मंडळी आज अतिशय थोडी आहेत आणि जी आहेत ती वृद्ध आहेत. त्यांच्यानंतर त्यांची विद्या त्यांच्याबरोबर नाहीशी होण्याची भीती आहे. शिवाय आज आपल्या तत्त्वज्ञानाची परंपरा खंडित झाली आहे. जर तिचा संबंध पाश्चात्त्य तत्त्वज्ञानांशी आला तर ती जिवंत होऊन जोमाने वाढण्याची शक्यता आहे. सध्या अशी स्थिती आहे की विद्यापीठातून तयार होणारे तत्त्वज्ञानाचे प्राध्यापक सामान्यपणे संस्कृतात अनभिज्ञ असतात आणि आपल्या शास्त्रीय पंडितांना संस्कृत येते, पण पाश्चात्त्यांचे ग्रंथ वाचता येत नाहीत. जर पंडितांना पाश्चात्त्य नवे तर्कशास्त्र शिकविले आणि येथील प्राध्यापकांना नव्यन्याय शिकविला तर एकाच व्यक्तीत पौर्वात्य आणि पाश्चात्त्य तत्त्वज्ञानाचा संगम होऊन त्याला नवीन धुमारे फुटू शकतील. हा उपक्रम रेगे गेली ७-८ वर्षे राबवित आहेत. त्यांनी आतापर्यंत

अनुक्रमणिका

८-१० छोटी-मोठी शिबिरे घेतली असून ती योजना अजून चालू आहे.

हा एवढा थोर तत्त्वज्ञ त्याच्या थोरपणाच्या तुलनेत अपरिचित आहे. याचे कारण त्यांची कमालीची प्रसिद्धीपराङ्मुखता. प्रसिद्धीच्या झोतात उभे राहणे त्यांना जमत नाही. परंतु त्यांच्या थोरवीची निदान स्थूल कल्पना यावी या हेतूने त्यांचा परिचय करून दिला आहे.

प्राध्यापक रेग्यांना भरपूर आयुरारोग्य लाभो आणि त्यांच्या हातून असेच भरीव काम होवो अशीच त्यांच्या चाहत्यांची इच्छा असणार. ती व्यक्त करुन हा परिचय लेख मी आटोपता घेतो.

(लोकसत्ता, २३ जानेवारी १९९४)



## ईश्वराविषयी भ्रमनिरास

रिचर्ड डॉकिन्स (सुप्रसिद्ध जैविक विकास अभ्यासक)

संकलन - सुमन दाभोलकर

श्रद्धा हा जणू एक विषाणू आहे आणि तो मागील पिढीपासून पुढच्या पिढ्यांपर्यंत पोचविला जातो. लहान मुलांना अगदी बालपणापासून धर्माचे बाळकडू पाजले जाते. ह्यामुळे अशा श्रद्धा वंशपरंपरा इतक्या दृढ होतात की त्यातून शेवटी पराकोटीच्या खुनी प्रवृत्ती वाढतात आणि दुसऱ्यांची मते ऐकून घेण्याची तयारी राहत नाही.

डॉकिन्सची ही मते ही सप्टेंबरच्या ११ तारखेच्या संदर्भात आहेत. त्याच्या मते हे हल्ले मुख्यत्वेकरुन धार्मिक श्रद्धेमुळे झालेले होते. त्यांना असे वाटत होते की आपण जे करतो आहोत ते आपल्या धर्मासाठी करतो आहोत, त्यामुळे आपल्याला मृत्यूनंतर या कृत्याचा योग्य ते स्थान परलोकात आपल्याला मिळणार आहे.

त्याच्या मते लोक धर्माला विरोध करण्याविषयी इतके आग्रही नसतात, त्यामुळे उलट सनातन्यांचे फावते. कारण, मग ही सनातनी मंडळी श्रद्धा हा एक सद्‌गुण आहे अशी शिकवण देऊ लागतात. तसेच श्रद्धेविषयी आदराची भावना वाढीस लागण्यास मदत करु लागतात. तसे पहायला गेले तर, बहुतेक धर्मपरायण लोक आपल्या वागण्यात, बोलण्यात चांगले (decent) व प्रेमळ असतात. परंतु तेच लोकांवर, विशेषत: लहान मुलांवर असे संस्कार करतात, की त्यामुळे धर्माबाबत प्रश्न विचारणे होत नाही व आंधळेपणाने धर्म स्वीकारला जातो.

लहानपणी मुलांचा ज्या गोष्टींवर विश्वास बसतो, त्या म्हणजे बागुलबुवा आणि अज्ञात मित्र, जो संकटकाळी आपल्याला मदत करायला धावून येतो. दुर्दैवाने, हे भ्रम मोठेपणीही राहून जातात. त्याच्या म्हणण्यानुसार, भ्रम हे व्यक्तीत घर करून राहतात. जरी त्या भ्रमांविषयी कुठलाही पुरावा नसतो तरीदेखील. असे विश्वास किंवा भ्रम विरुद्ध बाजूचा द्वेष करण्यास प्रवृत्त करतात, त्यामुळे वैचारिक आदान-प्रदान होत नाही.

हे सर्व विचारांती समजत असतानाही, निरनिराळे धर्म इतके जगभर का पसरले आहेत? खरं पाहता धर्म ही अतार्किक आणि अर्थहीन (wasteful) सवय आहे. डॉर्विनच्या natural seletion मुळे धर्मविषयक भावना नष्ट करता आल्या नसत्या का?

हे शक्य झाले नसते, कारण धार्मिक भावना या वैचारिक क्षमतांची उपउत्पादने आहेत. ही वैचारिक क्षमता दुसऱ्या काही कामांसाठी (purpose) निर्माण झाली होती. ते काम म्हणजे आपल्या मुलांवर संस्कार करणे. परंतु हे संस्कार मुलांना विचार करण्यास प्रवृत्त करीत नाहीत, तर आंधळेपणाने आपले आई-वडील काय सांगतात ते त्याच्यावर विश्वास ठेवायला शिकवतात. आणि ही परंपरा पिढ्यांमागून पिढ्यांपर्यंत पाळली जाते.

खरे तर माणसांच्या जीवनात धर्माची चार कार्ये आहेत असे मानले जाते. ती म्हणजे - कार्यकारणभाव समजावून सांगणे, काही गोष्टी (कामे) करावयास भाग पाडणे, सहानुभूती दाखविणे व स्फूर्ती निर्माण करणे. परंतु डॉकिन्सच्या मते ही कामे धर्म करीत नाहीत.

आणि नीतीमत्तेचे मूळ हे मानवाच्या गुणसूत्रांमध्ये (genetic instincts) आहे. ही गुणसूत्रे हळूहळू विकसित झाली. सहानुभूती व स्फूर्ती ह्या प्रवृत्ती धर्माचे खरेखुरे फायदे आहेत. परंतु या प्रवृत्ती निर्माण करण्यासाठी किंवा वाढविण्यासाठी धर्मावरच श्रद्धा ठेवावी असे नाही. तर निसर्गाचे परिशीलन/चिंतन (contemplation) त्यासाठी पुरेसे आहे.

आपण या पृथ्वीतलावर का निर्माण झालो? हा प्रश्न डॉकिन्सला मूर्खपणाचा वाटतो. या जन्मात जे आहे ते पुरेसे आहे. पुढच्या जन्माचा वायदा कशासाठी? आपण नशीबवान आहोत म्हणून या पृथ्वीतलावर जन्म घेतलेला आहे. आणि हा जन्म आपण पुरेपुर चांगुलपणाने भोगला पाहिजे. अशी त्याची स्थूलमानाने मांडणी आहे.











# श्रद्धा, विवेक आणि समाज

## देवदत्त दाभोलकर

१.

माणसाचे मन सदैव खऱ्या आंतरिक समाधानाचा शोध घेत असते. शारीरिक गरजा योग्य प्रकारे भागल्या नाहीत तर मन साहजिकपणे अस्वस्थ असतेच परंतु शारीरिक गरजा नीटपणे भागल्या, भौतिक सुखे हवी तशी मिळाली तरीही मन अस्वस्थ, अशांत राहतेच. भौतिक सुखांचा हव्यास हा सदैव अमर्यादच असतो व म्हणूनच केवळ ही अस्वस्थता असते असेही म्हणता येणार नाही. इतर कोणत्याही प्राणिमात्राच्या मनात कधीही न सलणारा आणि मानवाच्या मनात सतत सलत राहणारा प्रश्न हे साधले, ते साधले परंतु हे सारे कशासाठी? कशासाठी? असा असतो. 'तत: किं तत: किं तत: किम्' हा अनुत्तरित प्रश्न प्रत्येक संस्कारसंपन्न माणसाच्या अंतःकरणात आत खोलवर अखंड प्रतिध्वनित होत असतो. या प्रश्नापासून मानवाची सुटका नाही. तो त्याला मिळालेला शाप आहे. ते त्याला मिळालेले वरदानही आहे.

या प्रश्नाचे उत्तर शोधण्याच्या प्रयत्नातच मानव अनंत विश्वाचा शोध घेण्याच्या मागे लागतो. या विश्वाच्या मागे दडलेले रहस्य मला समजले पाहिजे अशी उत्कट जिज्ञासा आणि या जन्ममरणाच्या जंजाळात मी का सापडलो, मी यातून कसा सुटणार या विषयीची आर्तता, या दोन्ही प्रेरणा या प्रयत्नाच्या मागे असतात. तत्त्वज्ञानाची उभारणी या प्रयत्नातूनच होते. स्थूलपणे म्हणावयाचे तर जिज्ञासा ही पाश्चात्त्य तत्त्वज्ञानांच्या मागील प्रेरणा आहे, जगातील अनेक प्रतिभाशाली बुद्धिवंतांनी धार्मिक प्रेषितांनी, साधुसंतांनी, योगयोगेश्वरांनी, कविकलाकारांनी या प्रश्नाचे उत्तर शोधण्याचा आपापल्या परीने प्रयत्न केला.

त्यातील कोणाला यश आले का? विश्वाच्या पाठीमागचे रहस्य मानवाला अद्याप अज्ञातच राहिले आहे व अनंतकाल ते तसेच राहील असे आज तरी दिसते. हे रहस्य आपल्याला उकलले आहे असा आभास अनेकांना होतो व त्या आभासालाच सत्य मानून ते जो उपदेश करतात त्यालाही अनेक अनुयायी मिळतात. अशा आभासमय विविध श्रद्धांच्या संघर्षातून मानवाचा रक्तरंजित इतिहास घडला आहे.

विश्वरहस्याचा शोध घेण्याची प्रेरणा होणे यासारखी मंगल, स्फूर्तिदायक प्रेरणा नाही व हे रहस्य न उलगडताच ते उलगडले आहे असे मानणे यासारखी अवनत शरणागती नाही ही गोष्ट जर मानव ओळखेल तर त्याची मानव म्हणून प्रतिष्ठा कायम राहील आणि आंधळ्या श्रद्धेच्या आहारी जाऊन पशुलाही लाजवणाऱ्या ज्या ज्या गोष्टी त्याच्या हातून घडतात त्या तशा अवनतीपासून तो वाचू शकेल. 'अथातो ब्रह्मजिज्ञासा' ही सदैव त्याची प्रेरणा असली पाहिजे. परंतु विपरित धर्मश्रद्धांच्या आहारी त्याने कधीही जाता कामा नये. मग त्या धर्मश्रद्धा त्याला ऐहिक वा पारलौकिक अभ्युदयाचे कोणतेही आश्वासन देवोत.

देव न मानणारी देवमाणसे ही आजच्या युगाची गरज आहे. देव मानणाऱ्या देवमाणसांनाही मी तितक्याच विनम्रपणे वंदन करतो. अखेरच्या क्षणी सारे मायामोह दूर करुन'हे राम' हे ईशस्मरणाचे उद्‌गार ज्याच्या मुखातून येतात त्याने जीवनाची अखेर साधली हे संशयातीत आहे. मग ज्या रामाने त्याची जीवनभर साथ केली तो प्रत्यक्ष असो वा नसो, त्या श्रद्धेचा आधार ज्यांच्या मनातून तुटला आहे त्यांची साधना कितीतरी अधिक खडतर आहे. ईश्वराच्या अस्तित्वावर श्रद्धा नसणाऱ्या अनेक साधुरचित महापुरुषांनी अगदी प्राचीन काळापासून ते आजवर अशा साधनेचे आदर्शही आपल्यापुढे ठेवले आहेत. अगदी खोलवर जाऊन पाहिले तर गांधीजींचे रामनाम आणि हा आदर्श यात फरक नाही. शंकराचार्यांची परापूजा आणि हा आदर्श हीही एकमेकांपासून वेगळी नाहीत. परंतु हे आकलन न होता केलेले रामनामाचे रटन किंवा परापूजेची पोपटपंची मात्र स्वतःला व समाजाला हितकारी न होण्याचीच शक्यता अधिक असते. सावधचित्त असावे लागते ते यासाठी.

आकाशवाणी, पुणे

चिंतन : ०७-०७-१९७४

❖❖











अनुक्रमणिका

२.

## इहवादी शासन

केसरी प्रकाशनाच्या वतीने डॉ. पु. ग. सहस्रबुद्धे लिखित 'इहवादी शासन' या ग्रंथाचे प्रकाशन प्राचार्य दाभोलकर यांच्या हस्ते काल केसरी-मराठी ग्रंथशाळेत अनौपचारिकरित्या झाले.

जिज्ञासेचाच भाव

इहवादी-निधर्मीशासनाविषयी बोलताना श्री. दाभोलकर म्हणाले, "अज्ञानावर प्रकाश टाकावा ही वृत्ती मानवाच्या ठिकाणी असणे हे मानवतेचे लक्षण असू शकते. पण परलोक, पुनर्जन्म, स्वर्ग या गोष्टी याला काही पुरावा नाही. माझा देवावर विश्वास नाही किंवा परलोक, स्वर्ग याबद्दल उत्सुकताही नाही. भावनेच्या दुबळेपणाचा भाव हा मानवी जिज्ञासेचाही भाग असू शकतो. मनुष्याच्या मनातील जिज्ञासा ज्या आहेत त्याची उत्तरे ही त्याच्या पुरतीच असावीत, ती दुसऱ्यावर लादण्याचा प्रयत्न असू नये."

कमीपणा कसला?

या संदर्भात श्री. दाभोलकर यांनी शाळांतून धार्मिक शिक्षण द्यावे की न द्यावे असा प्रश्न उपस्थित केला. ते म्हणाले, "आपल्याला जे जग दिसते त्याच्या पलीकडे आणखी काही आहे यासंबंधीची जिज्ञासा असण्यात कमीपणा नाही हे विद्यार्थ्यांना सांगावे. विविध धर्मांत ज्या चांगल्या गोष्टी आहेत त्यांचे ज्ञान करून देणे हे शिक्षण पद्धतीचे कर्तव्यच आहे. धर्मात भेदाभेद केले जाऊ नयेत इतकेच नव्हे तर निधर्मीपणाच्या बाबतीत जे बहुसंख्य आहेत ते धार्मिकपणाची भूमिका अल्पसंख्यांकांच्या बाबतीत काय घेतात यावर त्या राष्ट्राची निधर्मीपणाची कसोटी लागते. भारतात समान नागरिकत्वाचा कायदा अस्तित्वात आला पाहिजे. देव-देवतांची चित्रे शासकीय कचेऱ्यांतून लावली जाऊ नयेत. गोहत्येला बंदी असू नये आणि मशिदीवरून वाद्ये वाजवत जाण्यासही प्रतिबंदी असू नये.

रशिया हा धार्मिक वृत्तीकडे वळला नाही, परंतु साम्यवाद हाही एक धर्म ठरला आहे, असे सांगताना ते म्हणाले, मार्क्सने साम्यवादाबद्दलचे अंतिम सत्य सांगितले ही श्रद्धा या धार्मिकतेच्या बुडाशी आहे. या धार्मिकतेच्या चौकटीत जो बसणार नाही तो इतर कोठल्याही प्रेरणांना प्रतिकूल ठरविला जात आहे."

धर्मनिरपेक्षतेकडे

'इहवादी शासन' या संदर्भातच श्री. दाभोलकर यांनी बांगला देशमधील राष्ट्रवादाचा उल्लेख केला. ते म्हणाले, "तेथील ३० वर्षे वयाच्या आतील तरुणांची प्रतिक्रिया आज तीव्र बनलेली असून तेथील जनतेच्या भावनेचा आवेग धर्मनिरपेक्षतेकडे आहे. पाकिस्तान निर्मितीमागचे धार्मिक अधिष्ठान आता येथे संपुष्टात येत असून हिंदू आणि मुसलमान यांच्यातील ताण बाह्य परिस्थितीमुळे बदलला आहे." नंतर 'इहवादी शासना'च्या संदर्भात उपस्थितांमध्ये प्रश्नोत्तर रूपाने चर्चा झाली. या चर्चेत म.म.द.वा. पोतदार, प्रा. रा.म. बापट, पं. श्री भा. वर्णेकर, श्री. ना.ग. गोरे, श्री. प्रभाकर पाध्ये, श्री. रा. चिं. ढेरे, व केसरीचे विश्वस्त श्री. हरिभाऊ कुलकर्णी यांनी प्रामुख्याने भाग घेतला.

बुद्धिवाद

त्यानंतर बोलताना डॉ. पु. ग. सहस्रबुद्धे यांनी इहवाद हा निश्चयाचा बुद्धिवाद आहे, असे सांगितले. ते म्हणाले, "बुद्धिवादाच्या पलीकडे सत्तत्त्व आहे का? निश्चयाच्या पलीकडे आहे का? असे प्रश्न निर्माण होतात. इहवादाचा शासनाशी संबंध येतो तेव्हा व्यवहाराशी संबंध येतो. व्यवहारात उतरताना सत्तत्त्वाचा मान किती राखावा, हा एक प्रश्न आहे. व्यक्तिगत स्वरूपात प्रार्थना करावयास हरकत असू नये पण तसा कायदा करावा असा प्रश्न आला तर ते कणभरही मान्य करू नये."

परंपरा आवश्यक

धर्म व संस्कृती यात भेद केला पाहिजे. अशी भूमिका स्पष्ट करून ते म्हणाले, "या देशातल्या संस्कृतीचा मला अभिमान आहे ही व्यावहारिक बाजू आहे. परंपरेचा अभिमान सर्व मुसलमानांनी आपापल्या राष्ट्रांतून धरलेला आहे. व्यक्ती जीवनात परंपरेचे जे स्थान आहे तेच राष्ट्रीय जीवनात आहे. परंपरा याचा अर्थ गुणसंपदा असा असून यातही व्यावहारिक मार्ग आहे, परंपरेशिवाय माणूस कर्तव्य करू शकत नाही, असा इतिहासाचा निर्वाळा आहे. देशात परंपरा नसली तर स्फूर्ती येत नाही. त्याचा सातत्याने अभिमान टिकणे महत्त्वाचे आहे.

('केसरी' २८ जानेवारी १९७२, पृ० २)








## ३.
## परम धर्म

किं कर्म किमकर्मेति

'तेच शक्य तर तुम्हाला व मला स्वत:लासुद्धा स्पष्ट करण्याचा माझा विचार आहे. बघू या जमते का?'

-इरावती कर्वे ('धर्म', पृ.२१) हाच प्रवास, हाच प्रयास आज युगानयुगे मानवमात्र करीत आलेला आहे. हा प्रवास कधीही न संपणारा असा आहे. जागृत प्रयास हेच या प्रयासाचे प्रमुख श्रेय आजवर राहत आलेले आहे व यानंतरही निरन्तर राहणार आहे.

प्रा. दि. के. बेडेकर व डॉ. इरावती कर्वे यांची या विषयावरील विवेचने एकाच सुमारास प्रकाशित व्हावीत हा एक योगायोग आहे. 'इरावतीबाईंनी हा प्रदीर्घ लेख कित्येक वर्षापूर्वी लिहिला व तो तसाच आपल्याजवळ ठेवला' अशी प्रस्तावनेत नोंद आहे. कदाचित या लेखावरून पुन्हा एकवार हात फिरवावा अशी त्यांची इच्छा असावी. तसे झाले असते तर कदाचित लेखाच्या उत्तरार्धावरून त्यांनी सफाईचा काही हात फिरवला असता असे वाटल्याखेरीज राहत नाही. परंतु आपल्या मुख्य सूत्रात मात्र त्यांनी विशेष बदल केला नसता इतका विश्वास त्यांच्या एकूण लेखाच्या प्रवाहावरून वाटतो. प्रा. बेडेकर यांची व्याख्याने एक विशिष्ट श्रोतृवर्ग डोळ्यापुढे ठेवून झालेली आहेत. काही एका विशिष्ट निष्कर्षाकडे जाण्याचा त्यांचा प्रयत्न आहे. परंतु हा आग्रह त्यांच्या एकूण जीवन-चिंतनातूनच निर्माण झालेला आहे. 'अणुयुगातील मानवधर्म' हे या प्रकाशनाचे शीर्षक मात्र थोडे अतिव्याप्त वाटते. अणुयुगातील विशेष समस्यांचा विचार त्यांच्या विवेचनातून निसटला आहे. विशिष्ट श्रोतृवर्गापुढे अपेक्षित विवेचनाच्या मर्यादा हेच याचे कारण असावे.

एका व्यापक व नव्या सामाजिक नैतिकतेसाठी लढा म्हणजे समाजवादाची वाटचाल, असे प्रा. बेडेकर यांच्या विवेचनाचे सूत्र आहे असे प्रा. गं. बा. सरदार यांनी आपल्या प्रस्तावनेत सांगितले आहे. विषयाचे सूत्र सांगताना प्रा. बेडेकर यांनी याचा काही अधिक खुलासा केला आहे. ते म्हणतात:

"धर्म, राष्ट्र आणि समाजवाद या गोष्टी माणसांनीच निर्माण केलेल्या आहेत. त्या काही निसर्गातल्या शक्ती नाहीत. माणसांच्या मनातून, हृदयातूनच त्यांचा जन्म व परिपोष झाला आहे. विचार आणि श्रद्धा, जगण्याची धडपड व आकांक्षा यांनीच या गोष्टींना भलाबुरा आधार मिळत गेलेला आहे... आमच्या पिढीला जणू काही हा एक शापच होता की धर्म, राष्ट्र आणि समाजवाद या तिन्हींचा एकवट आणि समतोल विचार करणे आमच्यापैकी फारच थोड्यांना जमले व तेही फारच जुजबी तऱ्हेने जमले.... धर्म, राष्ट्र व समाजवाद या तीन गोष्टींचा एकवट, परस्परांशी संबद्ध आणि साकल्याने विचार आपल्यापुढे मांडण्याचा मी प्रयत्न करणार आहे."

इरावतीबाई लिहितात :

'एखाद्या समाजाच्या आचाराचे नियम म्हणजे धर्म अशी व्याख्या केली. धर्म बहुतांश आचारप्रधान असतो.... (परंतु) आचरणामागे मन असते... ज्यांनी उच्चतम धर्माचे विवेचन केले आहे त्यांना धर्म मनोमय वाटतो... संप्रदायांच्या जागतिक इतिहासाकडे नजर टाकली तर असे दिसून येईल की, कर्मकांड व तत्त्वचिंतन ह्यांचा झगडा अखंड चालू असतो. काही वेळा तत्त्वचिंतनाला महत्त्व दिले जाते. पण सांप्रदायिकत्व हे बव्हंशी चिंतनाला मारक व कृतीला पोषक असते... निरनिराळ्या मानवसमाजांचा इतिहास पाहिला तर आपल्याला प्रचंड उलाढालींचे काही काळ आढळून येतात. वागणुकीच्या सर्व जुन्या नियमांविषयी लोक साशंक होतात व ते झुगारून देऊ पाहतात; नवे नियम अस्तित्त्वात आलेले नसतात किंवा सर्वमान्य झालेले नसतात. अशा तऱ्हेच्या अवस्थेला प्रमाणशून्यता (anomie) म्हणतात. नॉर्म म्हणजे प्रमाण. सर्व तऱ्हेच्या व्यवहारांचे नियम हे त्या त्या वागणुकीचे प्रमाण. ही प्रमाणे नाहीशी झाली म्हणजे प्रमाणशून्यता उद्‌भवते. ही प्रमाणशून्यता सर्वसाधारण मनुष्यसमाजात काही व्यक्तींच्या बाबतीत, काही वागणुकीच्या बाबतीत आढळते; पण तिचा विशेष फैलाव निरनिराळ्या संस्कृतींचे समाज एकत्र आले व संस्कृतिसंक्रमण होऊ लागले म्हणजे विशेष आढळतो. ह्याच काळात धर्म कोणचा व अधर्म कोणचा ह्याचाही समग्र ऊहापोह करणे शक्य होते.

प्रा. बेडेकर व इरावतीबाई या दोघांचेही धर्माच्या मूळ स्वरूपाविषयीचे व त्यात निर्माण होणाऱ्या विकृतीविषयींचे विवेचन या संदर्भात सर्वसामान्यपणे मांडल्या जाणाऱ्या विधायक पुरोगामी विचारसरणीचाच अनुवाद करणारे आहे.

प्रश्न खरा येथवरच्या मांडणीचा नाही. आजच्या काळाच्या विवेचनाचा, व त्यातील समस्यांची उकल होण्याच्या

दृष्टीने सांगावयाच्या आचारधर्माचा आहे. या दृष्टीने ही दोन्ही विवेचने अपुरी आहेत. हे अटळ आहे व सदैव असेच अटळ राहणार आहे असेही हवे तर आपल्याला म्हणता येईल. इरावतीबाईंनी आपल्या लेखाच्या शेवटी यातून थोडीशी सुटका करुन घेतली आहे. 'ह्या धर्माचे आचारकांड मधूनमधून दिग्दर्शित झाले आहे. त्यापेक्षा जास्त तपशिलात शिरणे म्हणजे धर्मतत्त्वाचे व्यापकत्त्व घालवणे होय' असे त्यांनी म्हटले आहे. 'तसे करणे इष्ट नाही व शक्य नाही' अशी पुस्ती त्यांनी खरे म्हणजे पुढे कंसात जोडावयास हवी होती. धर्म, राष्ट्र, समाजवाद याविषयींची प्रा. बेडेकर यांची मांडणीही लोकशाही समाजवादी विचारसरणीचा माणूस ती मांडणी ज्या पद्धतीने करील (तो पूर्वाश्रमीचा साम्यवादी असल्यास मार्क्सला वंदन करुन) त्या पद्धतीचीच आहे.

अणुयुगातील आजच्या समस्या दोन दशकांपूर्वीच्या समस्यांहून मूलत: बदलल्या आहेत. हा केवळ सामान्य संक्रमणकाल आहे असे नसून आजवर जगाच्या इतिहासात कधी आला नव्हता एवढ्या झपाट्याने आलेला हा झंझावाती संक्रमणकाल आहे. सर्व मानवजातीचे दैन्य आणि दारिद्र्य नाहीसे करण्याची भौतिक शक्यता आज विज्ञानाने निर्माण केली आहे. त्याच विज्ञानाने, नजीकच्या भविष्यकाळात 'राष्ट्र' कल्पनेपासून पुढे सरकून 'विश्व' या कल्पनेपर्यंत आपण पुढे सरकलो तरच संभाव्य जागतिक विध्वंस टळू शकेल ही परिस्थितीही निर्माण केली आहे. राष्ट्रातील गरीब-श्रीमंत या भेदाइतकाच गरीब राष्ट्रे व श्रीमंत राष्ट्रे हा भेदही स्फोटक असू शकतो याची जाण उत्तरोत्तर येत चाललेली आहे. आणि केवळ भौतिक समृद्धीने मानवाचे 'प्रेय' व 'श्रेय' साधू शकणार नाही ही जागही आज समृद्ध राष्ट्रांनादेखील येऊ लागलेली आहे. या सर्व घटनांत जबाबदारीच्या भूमिकेवरुन, जबाबदारीच्या जाणीवेने काही घडवू शकेल अशी आज भारताची परिस्थिती नसल्यामुळे आज भारतातील विचारवंत या समस्यांचा निकराने विचार करताना आढळत नाहीत. या विषयाचा विचार करताना मूळ समस्यांना ते ज्या वेळी स्पर्श करतात त्या वेळी तो एक अधुरा व धूसर स्पर्श वाटतो.

धर्म सनातन आहे कारण धर्मापुढे उभी असलेली समस्याही सनातन आहे. मनोमय उन्नयन व समाजहितकारी आचाराचे परिपालन यांचा कालानुसारी प्रवाही समन्वय कसा घालता येईल अशी ती समस्या आहे. मन उन्नत होते व परंतु हा प्रभाव तात्कालिकच राहतो. काही एका विशिष्ट संघापुरतीच या उन्नत वर्तनाची कक्षा राहते, अन्य संघांवर आघात करताना संघांतर्गत उच्च नैतिक कल्पना मनावर बंधन टाकू शकत नाहीत, आचारधर्म सांप्रदायिक होतो व कालबाह्य रूढीचे प्राबल्य गाजते अशा प्रकारची या समस्येची रूपरूपांतरे होतात. विचार करताना केवळ आपल्या संघाचा विचार न करता सर्व मानवजातीचाच विचार करावा लागेल. स्वातंत्र्य, समता व बंधुभाव या तत्त्वांवर आधारित व सत्य व न्याय या मूल्यांची कदर करणारी अशी समाजव्यवस्था अस्तित्त्वात आणावी लागेल, हे इरावतीबाईंनी स्पष्ट केले आहे. परंतु या सगळ्याला पायाभूत होऊ शकते ती केवळ मनुजमात्रा-विषयीची आत्मीयतेची भावना. वेगळ्या मार्गाने परंतु प्रा. बेडेकर याच उत्तराच्या जवळ आले आहेत.

'पुन्हा मूळ प्रश्न उरतोच.' असे म्हणून बेडेकर पुढे म्हणतात : 'माणसांनी श्रम कसे करावे?' याचे उत्तर सोपे आहे. 'माणसांनी एकमेकांच्या सहकार्याने श्रम करावे, (जाड ठसा मुळातील) हे ते उत्तर आहे. हे उत्तर सोपे असून सहज सुचत नाही.' परंतु हे सोपे उत्तर न सुचण्याचे कारण मात्र प्रा. बेडेकर देतात ते, अंशत: खरे असले तरी, पुरेसे नाही. (कारण हजारे वर्षांच्या मानवसंस्कृतीत ह्या उत्तरात गृहीत असलेल्या नैतिक जाणीवेचा लोप झाला आहे.) प्रा. बेडेकर श्रम-सहकार्याच्या अधिक तपशिलात शिरतील तर ते खलील जिब्रानच्या 'श्रमा' वरील प्रवचनाच्या जवळपास जाऊन पोहोचतील असे मला वाटते. मला स्वत:ला त्या प्रवचनाचा आशय मान्य आहे. परंतु केवळ समाजव्यवस्थेच्या परिवर्तनाच्या कितीतरी पलीकडे जाणारा आशय त्यात अभिप्रेत आहे. मानवाच्या सर्व मनोव्यापारचा गुंता उकलल्याखेरीज या आशयापर्यंत जाऊन पोहोचता येत नाही. केवळ आत्मीयतेने केलेले श्रमच श्रम म्हणून भारभूत होत नाहीत. परंतु हा गुंता सहजपणे उकलण्याची क्रिया किंवा सर्व मानवमात्राकडे आत्मीयतेने पाहण्याची सिद्धी मानवी मनाला सहजपणे साध्य होण्यासारखी नाही.

आत्मवत् सर्वभूतेषु य: पश्यति स पश्यति।

परंतु हे दर्शन केवळ सामाजिक दर्शनाच्या फार पलीकडचे आहे. हे मानवाच्या मनातील मांगल्यभावनेला केलेले आवाहन आहे.

अखेर हे धर्माचेच आवाहन आहे.

प्रश्न 'किं कर्म किमकर्मेऽति' या व्यामोहाचा आहे. त्या प्रश्नाच्या उत्तराचा तपशील या दोन्ही विवेचनांत नाही, ही त्या

विवेचनांची उणीव नाही. अशा सर्वच विवेचनांची ती एक अपरिहार्य मर्यादा आहे.

(समाज प्रबोधन पत्रिका, नोव्हेंबर-डिसेंबर १९७१)



## ४.
## मेपुरे, दियदे आणि श्रद्धा-विवेक

दि.य.दे. व मे.पु.रे या दोघांविषयी माझ्या मनात नितांत स्नेह, आदराची भावना आहे. ती अनेकदा प्रकटपणे मी व्यक्त केलीआहे. महणून अधिक विस्तार करत नाही.

'हा सारा प्रांतच धूसर आहे' असे रेगे यांनी म्हटले असल्यामुळे त्यांची भूमिका सश्रद्ध सत्यान्वेषी आहे. अन्वेषण करणारा माणूस आपल्याला अद्याप पूर्णपणे सत्य समजलेले नाही अशीच भूमिका घेत अतो. याउलट दि.य.दे. यांची अशीच भूमिका हट्टाग्रही वाटते. सर्व ज्ञान-विज्ञान शाखा या संदर्भात संभ्रमात असताना दियदे मात्र निश्‍चित आग्रही वाटतात. कदाचित माझे आकलन अपुरेही असू शकेल. श्रद्धेचा उच्छेद हे त्यांचे जीवनध्येय आहे. आजचा सुधारकच्या पहिल्या अंकापासून त्यांनी हे स्पष्टपणे मांडलेले आहे.

'गीतेसारखा सामान्य ग्रंथ शेकडो वर्षे या देशात लोक डोक्यावर घेऊन नाचतात. यामुळे या देशातील लोकांच्या बुद्धिमत्तेची कीव करावीशी वाटते. अशा आशयाचे एक विधान 'आजचा सुधारक' मध्ये एकदा त्यांनी केले होते. त्यावरून त्यांचा आणि माझा आ.सु. मध्ये चुटपुटता वादही झाला होता. अगदी अलीकडच्या आ.सु.च्या त्यांच्या-विषयीच्या अंकात 'काय विवेकवादी हसूही शकतो?' हा त्यांचा लेख वाचला आणि मला गीतेतील स्थितप्रज्ञाच्या लक्षणांची आठवण झाली. काळाची पुटे काढून टाकली तर दोहोत विलक्षण साम्य आहे असे मला वाटते. मांडणीचा विस्तार येथे करत नाही.

अंतिम सत्याचे आकलन या उभयतांकडे नाही व आज तरी अन्य कोणाकडेही नाही. हे गूढ अखेर मानवाला अनाकलनीय राहणार का याविषयीही संशोधकांचे एकमत आज नाही.

उभौ न विजानीत:
विजानाति च नापर: ।
अशी आजची वस्तुस्थिती आहे.

मॅक्झिम गॉर्कीच्या Mother या कादंबरीत एक वाक्य आहे. 'If you uproot God from your heart there is a void left which nothing else can fill.' तुम्ही आपल्या हृदयातून देवाची हकालपट्टी केलीत की एक पोकळी निर्माण होते की जी अन्य कशामुळेही भरली जाऊ शकत नाही.) हृदय शुष्क होऊ न देता देवाचे त्यातून निष्कासन करणे एखाद्या रसेलला जमत नसेलच असे मी म्हणणार नाही. परंतु जनसामान्यांना ते पेलणे कठीण आहे. म्हणून लोक देवाकडे वळतात. विनोबांनी म्हटले आहे : 'संतांनी हा मार्ग स्वीकारला. ज्याची हिम्मत असेल त्याने अन्य मार्ग स्वीकारावा.' प्रत्येक माणसात जशी भाषेची आवश्यकता व क्षमता असते त्याप्रमाणे प्रत्येक व्यक्तीत श्रद्धेची आवश्यकता व क्षमता असते. मग माणूस कोणतीही भाषा बोलो, वा कोणत्याही धर्मपंथाचा स्वीकार करो. या विषयाचा अभ्यास जनुकशास्त्र सध्या करीत आहे.

जनमानसाची ही अंगभूत रचना असल्यामुळे जनतेत या स्वरूपाच्या समाजपरिवर्तनाच्या कार्याला विरोध होतो. हितसंबंधी गट तो प्रखर करून त्यावर आपली स्वार्थाची पोळी भाजून घेत असतात हे भारताचे दुर्दैव आहे. परंतु आपण श्रद्धेचा समूळ उच्छेद करून या समस्येचे उत्तर काढू शकू हा केवळ एक उदात्त आशावाद होऊ शकेल.

अंधश्रद्धा निर्मूलनासारख्या आंदोलनात यासाठी व्यावहारिक समतोल सांभाळणे हे यामुळेच मोठे कसोटी पाहणारे असते.



'तर्क तो देव जाणावा'
याचे नाव
'अंधश्रद्धा'

\- विनोबा

अनुक्रमणिका

# तिमिरातून तेजाकडे
## नानासाहेब गोरे

समाजातील सदाचारासाठी ईश्वरावरील श्रद्धेची गरज आहे असा युक्तिवाद फक्त धर्ममार्तंडांनी आणि प्रेषितांना केलेला नाही; माझ्या काही जेष्ठ आणि परममित्रांनीही ते मत आग्रहाने मांडलेले आहे. ईश्वरा-विषयी श्रद्धा आणि व्यवहारात अनाचार, पिळवणूक, लांडीलबाडी इथपासून तो दरवडे आणि लढाया इथपर्यंतचे अनाचार एकत्र नांदत असल्याची गेल्या हजारो वर्षांची साक्ष डोळ्यांसमोर दिसत असताना या मंडळींनी ईश्वर नसला तरी सामाजिक नीतिनियम किंवा सदाचारणी प्रेरणा नष्ट होईल असे आग्रहपूर्वक का म्हणत राहावे, ते मला कळलेले नाही; अजूनही कळत नाही. नुकतेच मी बाबराचे चरित्र वाचीत होतो. त्याची ईश्वरावरील श्रद्धा किती प्रगाढ होती, ते त्याच्या रोजनिशीवरून वारंवार दिसून येते. तो जसा योद्धा होता, तसाच रसिक हृदयाचा होता. पशुपक्षी, वृक्षवल्ली, निर्झर-प्रपात, पुष्करिणी, उद्याने ही सर्व सृष्टिनिर्मित व मानवनिर्मित सौंदर्यस्थाने आपल्या दैनंदिनीत टिपून ठेवण्याइतका तो रसिक होता. तो डोकी गुलाबाची गेंदेदार फुले खुडावी तशी सहजपणे उडवीत असे, आणि शत्रूच्या पराभवानंतर शिक्कामोर्तब करण्या-साठी शत्रूच्या मस्तकांचे बुरुज रचीत असे, असेही त्याची दैनंदिनी सांगते. धर्मावर अविचलित श्रद्धा असणाऱ्यांनी किती सहजपणे अघोरी कृत्ये केली आहेत, याचे दाखले रामायण, महाभारत आदी ग्रंथांमध्ये मिळू शकतील. याचा अर्थ उघडच असा नव्हे काय की, ईश्वरावरील श्रद्धेचा आणि सदाचाराचा काही अविभाज्य संबंध नाही? सदाचाराचे उगमस्थान ईश्वरनिष्ठेमध्ये शोधायचे नसून, ते त्या त्या युगातील समाजधारणेसाठी जे कोणते आचार आवश्यक आहेत, त्यांच्याविषयी तात्कालीन विचारवंतांनी बुद्धिपुरस्सर घेतलेल्या निर्णयात शोधले पाहिजे. 'खंडोबाचे चांगभले' अथवा 'जय मल्हार' म्हणून दरवडे घालणारे दरोडेखोर, सकाळी काकडआरतीला जाऊन किंवा स्नान-संध्या करून दिवसभर गिऱ्हाईकांचा गळा कापणारे व्यापारी, आणि पांडुरंगाची सपत्निक पूजा करून भ्रष्टाचार करणारे मंत्री, ही सर्व नित्याचीच दृश्ये नाहीत का? ईश्वर न मानता मानवाने लाखो वर्षे काढली. ईश्वर मानणारा मानवी समाज गेली काही सहस्रकेच अस्तित्त्वात आहे. आता परत ईश्वर न मानता बंधुभावाने, समानतेने आणि सदाचाराने वागणारा मानवी समाज अस्तित्त्वात येऊ शकणार नाही असे हताश उद्गार काढण्याचे मला तरी काही कारण दिसत नाही. मात्र त्यासाठी ईश्वर न मानताही आपण विश्वप्रेमी बनू शकतो असे आपल्या आचरणाने दाखवून देणाऱ्या व्यक्तींची गरज आहे. ती गरज पुरविण्याचा प्रयत्न आपण स्वत:पासून केला पाहिजे, हे मी मान्य करतो.

यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत।
अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहम।।

असे अहंकारी आश्वासन ईश्वराकडून ऐकून घ्यायला मानवाला काहीच कारण नाही. त्यापेक्षा आत्मविश्वासाने 'सहनाववतु। सह नौ भुनक्तु। सह वीर्य करवावहै। तेजस्विना-वधीमतस्तु। मा विद्विषावहै।' अशी प्रथम पुरुषी बहुवचनी प्रतिज्ञा जर मानवाने केली तर शांतीचे फळ भोगण्यासाठी त्याला कोणत्याही अवताराची वाट बघत बसण्याचे कारणच काय?

तत्त्वज्ञानाच्या वाटेपेक्षा विज्ञानाची वाट मला पसंत पडते. वास्तविक विज्ञानाची आणि तत्त्वज्ञानाची वाट एकच असावयास हवी. पण तसे घडत नाही, निदान भारतात तरी नाही. कारण भारतीय चिंतकांनी मोक्ष, निर्वाण, नेति नेति इत्यादी कल्पनांच्या धोंडी मार्गावर टाकून तत्त्वज्ञानाच्या पुढचा मार्ग बंद करून टाकलेला आहे. बुद्धही त्या बाबतीत मला दोषी वाटतो. 'सर्वं दुःखम्। सर्वं क्षणिकम्। सर्वं नष्टम्।' अशी भूमिका घेतल्यावर मानवी पुरुषार्थाला आवाहन किंवा आव्हान शिल्लक उरत नाही. वास्तविक काल जर अनंत आहे, तर विश्वही अनंतच असणार; आणि त्याचबरोबर ज्ञान आणि विज्ञानही कोठे संपले किंवा थांबले असे होण्याचे कारण नाही. विश्वाचा सचेतन आविष्कार, कृमिकीटक, वनस्पती, पशुपक्षी, मानव अशा विविध रूपांनी युगानयुगे बदलत आलेला आहे. एके काळचे सरडासूर आणि गजासूर (डायनोसॉर्स आणि मामथ) जसे शतकानुशतके पृथ्वीतलावर मनसोक्त वावरुन नाहीसे झाले, तसे मानवही नाहीसे होणे शक्य आहे. या सर्व बदलांची नोद विज्ञान घेते किंवा त्याने

अनुक्रमणिका








घेतले पाहिजे. मानवाचे रूप, रंग, भाषा, वेष, उत्पादन-साधने, ज्ञान-साधने, सामाजिक संबंध, कला ही सर्व समाजांगे सतत बदलत असताना त्याचे तत्त्वज्ञान मात्र जसेच्या तसे शाबूत राहील, 'यद् ज्ञात्वा सर्वं विज्ञातं भवति' हे वचन अबाधित राहील, हे कसे शक्य आहे? विज्ञानाची कधीच अशी भूमिका नसते की आपण एका क्षणाला जी भूमिका घेतली ती दुसऱ्या क्षणाला बदलणार नाही. ज्या प्रेषितांनी असा दावा केला की आपला शब्द अखेरचा, त्याची बढाई विज्ञानाने खोटी पाडलेली आहे आणि ईश्वराधीन मानल्या गेलेल्या अनेक गोष्टी त्याने मानवाच्या हाती आणून दिलेल्या आहेत. भूमितीमधील रेषा अथवा बिंदू या प्रत्यक्षात व्याख्येप्रमाणे काढून दाखवता येत नसल्या तरी त्या स्वयंसिद्ध मानल्या जातात; तसे ईश्वराचे बाबतीत करण्याचे कारण आहे असेही मला वाटत नाही. उलट ईश्वरावाचूनचे जग आणि प्रेषितावाचूनचे जग आजच्या सश्रद्ध जगापेक्षा कितीतरी पटीने सुंदर बनवणे माणसाला खासच शक्य आहे. समाजाबाहेर मनुष्य राहू शकत नाही म्हणून बंधुभाव हवा म्हणजेच अहिंसा हवी; आणि सृष्टीला किती तरी भाग अज्ञात राहिलेला आहे तो ज्ञात होण्यासाठी विज्ञान हवे. अहिंसा आणि विज्ञान या दोन साधनांच्या आधारावर मानव समाज ईश्वर अमान्य करूनही उत्तम प्रकारे चालू शकेल. जनतेमध्ये त्याच स्वावलंबी विचारांचा प्रसार केला पाहिजे. निरीश्वर विश्वाचा विचार सामान्य-जनांना तो कळणार नाही, म्हणून 'क्लेशोऽधिकतरस्ते-शामव्यक्तासक्तचेतसाम्' अशी बतावणी करून सामान्य-जनांना देवदैवतांच्या बाहुल्यांत, भातुकलीत रमवून ठेवणे म्हणजेच अंधश्रद्धेला, गुढतेला व दैववादाला उत्तेजन देण्यासारखे आहे. नामयज्ञ आणि नामजप सांगणारा आमच्यातला भक्तिमार्ग तर माझ्या मते संसारात हरवलेल्यांची एक लाघवी विराणीच आहे. निसर्गकृत (ईश्वरनिर्मित?) अवस्थेपासून म्हणजेच पंचमहाभूतांच्या सर्वस्वी आधीन स्थितीपासून आजच्या अनेक दृष्टींनी स्वायत्त अशा अवस्थेपर्यंतची जी बिकट वाट मनुष्य चालत आलेला आहे, ती ईश्वराच्या कृपाप्रसादामुळे नव्हे तर उत्तरोत्तर अधिकाधिक सामर्थ्यवान आणि अधिक कसदार बनत गेलेल्या समाजाची सर्वतोपरी व्यवस्था त्याला लावता येऊ लागली. बुद्धीच्या साहाय्यानेच आजच्या घडीला तर तो केवळ सर्व मानवजातीमध्ये नव्हे तर निसर्गासहित मानवसमाजाची सुसंवादी मांडणी करण्याचे स्वप्न पाहत आहे. त्यासाठी तो निरनिराळे आराखडे (मॉडेल), योजना, संस्था व संघटना बांधित आहे. त्यापैकी ज्या निरुपयोगी ठरतील त्या दूर सारून नव्या योजना तो आखीत आहे. आपणच निर्माण केलेली विज्ञानवृक्षाची जी फळे विषारी ठरणार असे त्याला दिसू लागले आहे, ती नष्ट करण्याची सूचना जी त्याला देते आहे तीही त्याची बुद्धीच.

"जानामि धर्मं न च मे प्रवृत्तिः
जानाम्यधर्मं न च मे निवृत्तिः।
केनापि देवेन हृदि स्थितेन
यथा प्रवृत्तोऽस्मि तथा करामि।।"

हे दुर्योधनाचे उद्गार नाव धारण करणाऱ्या एका व्यक्तिपुरते खरे नसून ते समाजमानसालाही लागू पडणारे आहेत. 'जानामि' असे म्हणणारा दुर्योधन बुद्धीचे कार्य सुचवीत आहे. 'प्रवृत्ति' आणि 'देव' शब्द हे समानार्थी समजले पाहिजेत. अधर्म्य काय आहे हे बुद्धीला समजत असूनही ते न टाळण्याची, आपण धर्म्य काय आहे माहीत असूनही ते न करण्याची दुर्योधनी प्रवृत्ती आजच्या समाजातही आपणाला दिसून येते. माणसाच्या ठिकाणी किंवा समाजाच्या ठिकाणी ज्या पशुसदृश सहजभावना आहेत, त्यांचे नियंत्रण जो मनुष्य किंवा जो समाज जितक्या प्रमाणात करू शकेल तितक्या प्रमाणात तो माणूस किंवा तो समाज सुसंस्कृत आणि सदाचारी समजला जातो. आजच्या समाजातील कोणत्या प्रवृत्ती समाजविघातक आहेत हे जाणण्याइतपत बुद्धी आजच्या समाजापाशी खासच आहे. 'केनापि देवेन हृदि स्थितेन, यथा प्रवृत्तोऽस्मि तथा करोमि' ही दुर्योधनाने सांगितलेली पळवाट आजच्या समाजाने स्वीकारण्याचे काहीही कारण नाही. विज्ञानाच्या साहाय्याने आज जी शस्त्रास्त्रसाधने आणि रसायने माणसाहाती दिली आहे, त्याच विज्ञानाने ती निष्फळ कशी ठरवावीत याचेही ज्ञान माणसाला दिले आहे. चिन्हे तर अशी दिसत आहेत की मानवबुद्धी विघातक प्रवृत्तींवर मात करू शकेल आणि सर्वसंहारातून जगाला वाचवू शकेल. 'अणुस्फोट झाल्यानंतर आता युद्ध थांबण्याची शक्यता निर्माण झाली' असे जे उद्गार विनोबांनी काढले होते त्याचा हाच अर्थ होता. जगाचा संहार करणारा अणुबॉंब वापरायचा की विनोबांच्या 'जय जगत्' या घोषणेला प्रत्यक्ष व्यवहाराचा आशय प्राप्त करून द्यायचा, हे आता मानवानेच ठरवायचे आहे. 'यो बुद्धेः परतस्तु सः' अशी कल्पना करून तो काल्पनिक 'सः' मानव समाजाला विनाशाच्या वाटेवरून परतवून लावील अशी आशा करून चालणार नाही. कारण तसा कोणी 'सः' अस्तित्त्वातच नाही. मानवी बुद्धीचा सर्व विश्वाला कवेत घेणारा अतिविशाल

आविष्कार म्हणजेच तो 'स:' असे आपण सर्वांनी मानले पाहिजे. ब्रह्माची, विष्णूची आणि महेशाची भूमिका इथून पुढे मनुष्याने आपल्या बुद्धिबळाने पार पाडायची आहे असे मला वाटते.

'तमसो मा ज्योतिर्गमय' ही प्रार्थना माणसाने आँजही करावी, पण ती स्वत:च्या बुद्धीला उद्देशून करावी. आकाशात उद्धारकर्ता बसलेला आहे अशी समजूत करून घेऊन त्याला आवाहन करण्यासाठी ही प्रार्थना नाही. देवावाचून मानवी समाजाची नव्हे तर सृष्टीचीही धारणा करणे आता शक्य कोटीतील संकल्प झाला आहे, असे माझे निश्चित मत बनले आहे. विश्वाचे मूलद्रव्य निर्दोष, निखळ होते, पण ते कशाची तरी भेसळ झाल्याने गढूळ आणि दोषयुक्त ठरले, हा सिद्धान्त मला मान्य होत नाही. माझ्या मते मूळ द्रव्यच सत्त्व, रज, तम यांनी युक्त होते. ते संमिश्र द्रव्य उत्क्रांत होत होत बुद्धी असलेला मानव निर्माण झाला आणि मानवाने बुद्धीच्या साहाय्याने मूळ द्रव्यातील जे व्यक्तीला आणि समष्टीला अहितकारक असणारे धातू हळूहळू दूर करीत करीत स्वत:चा विकास साधलेला आहे. म्हणूनच समर्थ रामदासांनी 'मानत मानत घालावे मूळाकडे' हा जो उपदेश केला आहे, त्यामध्ये मूळ स्रोत शुद्ध होता जी अंतर्भूत कल्पना आहे, तिचा त्याग करावा लागतो. मानवाला मुळाकडे अथवा आदिमाकडे जावयाचे नसून त्याला दोषमुक्त अशा अंतिमाकडे वाटचाल करावयाची आहे. गढूळ अशा आदिम मूलद्रव्याचे निर्मळ अशा अंतिम द्रव्यात रुपांतर करणे, ही मानवी बुद्धीची जबाबदारी आहे, असे मी मानतो. ज्ञानेशांचे पसायदान उपलब्ध धनाचा म्हणजेच साधनांचा जर सम्यक् उपयोग केला तर केवळ शुभचिंतन राहण्याचे कारण नाही. अशी साधनसंपत्ती विसाव्या शतकाच्या उत्तरार्धापर्यंत कोणत्याच काळी मानवाच्या हाताशी नव्हती. 'सर्वेऽपि सुखिन:' करण्याचे आव्हान मानवाच्या बुद्धीने स्वीकारले पाहिजे. ते आव्हान ईश्वर पेलू शकत नाही, ही सिद्ध गोष्ट आहे.

माझ्या चिंतनयात्रेत मी या घटकेला ज्या ठिकाणी येऊन पोहोचलो आहे, ते ठिकाणी दाखवण्याचा प्रयत्न मी येथवर मांडू शकलो नाही. कारण तसे केले असते तर लेखाचा विस्तार फार झाला असता. माझ्या विचारांची दिशा सूचित करण्यासाठी येथे जे लिहिले आहे तेवढे पुरेल, असे मला वाटते. आतापर्यंत मी कोणालाही गुरु केलेले नाही. गांधी किंवा मार्क्सलाही नाही, हे यावरून स्पष्ट होईल. कारण या सतत बदलत्या विश्वाचे आणि मानवसमाजाचे अक्षरचित्र कोणापाशी कितीही दिव्यचक्षू असले तरी तो रेखांकित करू शकेल असे मला वाटत नाही. कॅमेरा जशी क्षणचित्रे टिपतो तशीच आतापर्यंतच्या ऋषीमुनींनी, विचार-वंतांनी, प्रेषितांनी आणि विद्वानांनी क्षणचित्रे टिपली आहेत. ती समाजचित्रे त्या काळाच्या, तत्क्षणीच्या परिस्थितीचे चित्रे आहेत. म्हणून वेदकालीन चिंतन, कुरुक्षेत्रावरील चिंतन, बोधिवृक्षा-खालील चिंतन, गॅलिलीच्या आसमंतातील आणि हिरा डोंगरावरील चिंतन आजच्या चिंतनाला बंधनकारक ठरता कामा नये. याचा अर्थ ते सर्वस्वी व्हावयास हवा. माझ्या मते 'ईश्वर, अल्ला, तेरे नाम' असे म्हणून सर्वधर्मसमभाव निर्माण होणार नाही. कारण जगाचे वेगवेगळे दर्शन त्या त्या धर्माच्या प्रेषितांना झाले, म्हणुन तर हे धर्म त्यांनी प्रस्थापित केले. प्रत्येक धर्म पापाचरणापासून दूर राहा असे सांगतो हे खरे, परंतु पाप कशास म्हणावे याबद्दलच भिन्न धर्मांची भिन्न मते पडतात आणि त्यात पुन्हा स्वमताबद्दल पराकोटीचा आग्रह आणि अन्य मतांची निंदा, तसेच प्रत्येक धर्मतत्त्वांशी अविच्छिन्नपणे बांधली गेलेली कर्मकांडे, ही धर्माची वैशिष्ट्ये मानली जातात. आताच्या युगातल्या समाजाच्या गरजा किंवा धारणा कोणताही विद्यमान धर्म पुरा करू शकत नाही. याअर्थी सर्व धर्म आणि दर्शन बाजूला सारून, व्यक्तिमात्राला धर्मबंधनातून मुक्त करून, आपापल्या मतीप्रमाणे कोणत्याही धर्मविचाराचा अथवा दर्शनाचा स्वीकार अथवा त्याग करण्याची मोकळीक जर व्यक्तिमात्राला राहिली, तर ती सर्वांत उत्तम गोष्ट होईल.

माझ्या उर्वरित आयुष्यात माझी ही मते पालटण्याचा संभव कमी आहे, जवळजवळ नाहीच. परंतु जर मला काही नवीन प्रकाश माझ्या बुद्धीने दाखवला, तर तो अव्हेरण्याचीही माझी इच्छा नाही.

माझ्या जीवनात मी भावनांपेक्षा विचारांना आणि विचाराहून कृतीला अधिक महत्त्व देत आलो आहे. म्हणून रामदासाहून शिवाजी थोर, रानड्यांपेक्षा फुले थोर, बर्ट्रांड रसेलपेक्षा श्वाईट्झर थोर, जे. कृष्णमूर्तींपेक्षा मदर तेरेसा थोर आणि अस्पृश्यता निवारणासाठी स्पृश्यांची मने वळवू पाहणाऱ्या गांधीजींपेक्षा अस्पृशांनाच बंडासाठी उभे करणारे आंबेडकर मला थोर वाटतात. सर्व समाजाच्या भल्यासाठी विचार, उच्चार आणि आचार यांची जेथे मिठी पडलेली दिसेल तेथे मी नतमस्तक होतो. 'तिमिरातून तेजाकडे' जाण्याचा तो एकच मार्ग आहे, अशी माझी धारणा बनली आहे.

(राष्ट्र सेवा दल पत्रिका जुलै २००६)








अनुक्रमणिका

## शहीद भगतसिंह

## धर्म और हमारा स्वतंत्रता संग्राम

(मई, १९२८ के किरती नियतकालिक में यह लेख छपा। अमृतसर में अप्रैल में राजनीतिक कान्फ्रेंस और नौजवान सभा की कान्फ्रेंस हुई थी, जिसमें धर्म की समस्या पर शहीद भगतसिंह और उनके साथियों में जमकर विचार-विमर्श हुआ। यह लेख उसी मसले पर प्रकाश डालता है।

स्वतन्त्र भारत के संकल्प की रूपरेखा तब कुछ निखरनी शुरु हो गई थी। इस लेख में जन-एकता स्थापित करने सम्बन्धी कुछ ठोस सुझाव दिए गए हैं।)

अमृतसर में ११-१२-१३ अप्रैल को राजनीतिक कान्फ्रेंस हुई साथ ही युवकों की भी कान्फ्रेंस हुई। दो-तीन सवालों पर इसमें बड़ा झगडा और बहस हुई। उनमें से एक सवाल धर्म का भी था। वैसे तो धर्म का प्रश्न कोई न उठाता, किन्तु साम्प्रदायिक संगठनों के विरुद्ध प्रस्ताव पेश हुआ और धर्म की आड़ लेकर उन संगठनों का पक्ष लेनेवालों ने स्वयं को बचाना चाहा। वैसे तो यह प्रश्न और कुछ देर दबा रहता, लेकिन इस तरह सामने आ जाने से स्पष्ट बातचीत हो गई और धर्म की समस्या हो हल करने का प्रश्न भी उठा। प्रान्तीय कान्फ्रेंस की विषय समिति में भी मौलाना जफर अली साहब के पांच-सात बार -खुदा-खुदा करने पर अध्यक्ष पण्डित जवाहरलाल ने कहा कि इस मंच पर आकर खुदा-खुदा न कहें। आप धर्म के मिशनरी हैं तो में धर्महीनता का प्रचारक हूं। बाद में लाहौर में भी इसी विषय पर नौजवान सभा ने एक मीटिंग की। कई भाषण हुए और धर्म के नाम का लाभ उठाने वाले और यह सवाल उठ जाने पर झगड़ा हो जाने से डर जाने वाले कई सज्जनों ने कई तरह की नेक सलाहें दी।

सबसे जरुरी बात जो बार-बार कही गई और जिस पर श्रीमान् अमरसिंह जी झबाल ने विशेष जोर दिया, वह यह था कि धर्म के सवाल को छेड़ा ही न जाए। बड़ी नेक सलाह है। यदि किसी का धर्म बाहर लोगों की सुख शान्ति में डालता हो तो किसी को भी उसके विरुद्ध आवाज उठाने की क्या जरुरत हो सकती है? लेकिन सवाल तो यह है कि अब तक का अनुभव क्या बताता है? पिछले आन्दोलन में भी धर्म का यही सवाल उठा और सभी को पूरी आजादी दे दी गई। यहां तक कि कौंग्रेस के मंच से भी आयतें और मन्त्र पढ़े जाने लगे। उन दिनों धर्ममें पीछे रहने वाला कोई भी आदमी अच्छा नहीं समझा जाता था। फलस्वरुप संकीर्णता बढने लगी।

जो दुष्परिणाम हुआ, वह किससे छिपा है? अब राष्ट्रवादी या स्वतन्त्रता-प्रेमी लोग धर्म की असलियत समझ गए है और वही उसे अपने रास्ते का रोड़ा समझते है।

बात यह है कि क्या धर्म घर में रखते हुए भी, लोगों के दिलों में भेदभाव नहीं बढता? क्या उसका देश के पूर्ण स्वतन्त्रता हासिल करने तक पहुंचने में कोई असर नहीं पडता? वे यह भी कहते हैं कि बच्चे से यह कहना कि ईश्वर ही सर्वशक्तिमान हैं, मनुष्य कुछ भी नहीं, मिट्टी का पुतला है-बच्चे को हमेशा के लिए कमजोर बनाना है। उसके दिल की ताकद और उसके आत्मविश्वास की भावना को ही नष्ट कर देना है। लेकिन इस बात पर बहस न भी करें और सीधे अपने सामने रखे दो प्रश्नों पर ही विचार करें तो भी हमें नजर आता है धर्म हमारे रास्ते में एक रोड़ा है। मसलन हम चाहते हैं कि सभी लोग एक से हों। उनमे पूंजीपतियों के ऊंच-नीच की छूत-अछूत का कोई विभाजन न रहे। लेकिन सनातन धर्म इस भेदभाव के पक्ष में है। बीसवीं सदी में भी पण्डित, मौलवी जी जैसे भंगी के लड़के के हार पहनाने पर कपड़ों सहित स्नान करते हैं और अछूतों को जनेऊ तक देने से इन्कारी है। यदी इस धर्म के विरुद्ध कुछ न कहने की कसम ले लें तो चुप कर घर बैठ जाना चाहिए, नहीं तो धर्म का विरोध करना होगा। लोग यह भी कहते है कि इन बुराइयों का सुधार किया जाए। बहुत खुब। छूत-अछूत को स्वामी दयानन्द ने जो मिटाया तो वे भी चार वर्णों से आगे नहीं जा पाए। भेदभाव तो फिर भी रहा ही। गुरुद्वारे जाकर तो सिख 'राज करेगा खालसा' गाए और बाहर आकर पंचायती राज की बातें करें, तो इसका मतलब क्या है?

धर्म तो यह कहता है इस्लाम पर विश्वास न करने वाले काफिर को तलवार के घाट उतार देना चाहिए और इधर एकता की दुहाई दी जाए तो परिणाम क्या होगा? हम जानते हैं कि अभी कई और बडे ऊंचे भाव के आयतें और मन्त्र पढकर खींचतान करने की कोशिश की जा सकती है, लेकिन सवाल यह है कि इस सारे झगड़े से छुटकारा ही क्यों न पाया जाए? धर्म का पहाड़ तो हमें सामने खड़ा नजर आता है। मान लें कि भारत में स्वतन्त्रता संग्राम छिड़ जाए, सेनाएं आमने-सामने बन्दूकें ताने खडी हों, गोली चलने ही वाली हो यदि उस समय कोई मुहम्मद गौरी की तरह-जैसी कि कहावत बताई जाती है- आज भी हमारे सामने गायं, सुअर, ग्रन्थ साहिब, वेद-कुरान आदि

अनुक्रमणिका

चीजें खड़ी कर दी जाएं, तो हम क्या करेंगे? यदि पक्के धार्मिक होंगे तो अपना बोरिया-बिस्तर लपेटकर घर बैठ जाएंगे। धर्म के होते हुए हिन्दु-सिख गाय पर और मुसलमान सूअर पर गोली नहीं चला सकते। धर्म के बडे पक्के इन्सान तो उस समय सोमनाथ के कई हजार पण्डों की तरह ठाकुरों के आगे लोटते रहेंगे और दूसरे लोग धर्महीन या अधर्मी-काम कर जाएंगे। तो हम किस निष्कर्ष पर पहुंचे? धर्म के विरुद्ध सोचना ही पडता है। लेकिन यदि धर्म के पक्ष वालों के तर्क भी सोचे जाएं तो वे यह कहते हैं कि दुनिया में अंधेरे हो जाएगा, पाप बढ जाएगा। बहुत अच्छा, इसी बात को ले लें।

रुसी महात्मा टालस्टाय ने अपनी पुस्तक Essay and Letters में धर्म पर बहस करते हुए इसके तीन हिस्से किए हैं -

१. Essentials of Religion and Letters यानी धर्म की जरुरी बातें अर्थात् सच बोलना, चोरी न करना, गरीबों की सहायता करना, प्यार से रहना, वगैरा।

२. Philosophy of Religion यानी, जन्म-मृत्यु, पुनर्जन्म, संसार रचना आदि का दर्शन इसमें आदमी अपनी मर्जी के अनुसार सोचने और समझने का यत्न करता है।

३. Rituals of Religion, यानी रस्मो-रिवाज वगैरा। मतलब यह कि पहले हिस्से में सभी धर्म एक हैं। सभी कहते हैं कि सच बोलो, प्यार से रहो। इन बातों को कुछ सज्जनों ने Individual Religion कहा है। इसमें तो झगडे का प्रश्न ही नही उठता। वरन् यह कि ऐसे नेक विचार हर आदमी में होने चाहिए। दूसरा फिलासफी का प्रश्न है। असल मे कहना पड़ता है - Philosophy is the outcome of Human weakness, यानी फिलासफी आदमी की कमजोरी का फल है। जहां भी आदमी देख सकते हैं वहां कोई झगड़ा नहीं। जहां कुछ नजर न आया, वहीं दिमाग लड़ाना शुरू कर दिया और खास-खास निष्कर्ष निकाल लिए। वैसे तो फिलासफी बडी जरूरी चीज है, क्योंकि इसके बगैर उन्नति नहीं हो सकती, लेकिन इसके साथ-साथ शान्ति होनी भी बडी जरुरी है। हमारे बुजुर्ग कह गए है कि मरने के बाद पुनर्जन्म भी होता है, ईसाई और मुसलमान इस बात को नहीं मानते। बहूत अच्छा, अपना-अपना विचार है। आइए, प्यार के साथ बैठकर बहस करें। एक-दूसरे के विचार जाने। लेकिन 'मसला-ए-तनासुक' पर बहस होती है तो आर्यसमाजियों व मुसलमानों में लाठियां चल जाती हैं। बात यह कि दोनों पक्ष दिमाग को, बुद्धी को, सोचने समझने की शक्ति को ताला लगाकर घर रख आते हैं। वे समझते हैं कि वेद भगवान में ईश्वर ने इसी तरह लिखा है और वही सच्चा है। वे कहते हैं कि कुरान शरीफ में खुदा ने ऐसे लिखा है और यही सच है। अपने सोचने की शक्ति को छुट्टी दी हुई होती है। सो जो फिलासफी हर व्यक्ति की निजी राय से अधिक महत्त्व न रखती हो तो एक खास फिलासफी मानने के कारण भिन्न गुट न बनें, तो इसमें क्या शिकायत हो सकती है।

अब आती है तीसरी बात-रस्मो-रिवाज। सरस्वती-पूजा वाले दिन, सरस्वती की मूर्ति का जुलूस निकलना जरुरी है और उसमे आगे-आगे बैण्ड बाजा बजाना भी जरुरी है। लेकिन हैरीमन रोड के रास्ते में एक मस्जिद भी आती है। इस्लाम धर्म कहता है कि मस्जिद के आगे बाजा न बजे। अब क्या होना चाहिए? नागरिक आजादी का हक कहता है कि बाजार में बाजा बजाते हुए भी जाया सकता है। लेकिन धर्म कहता है कि नहीं। इनके धर्म में गाय का बलिदान जरुरी है और दूसरे में गाय की पूजा लिखी हुई है। अब क्या हो? पीपल की शाखा कटते ही धर्म में अंतर आ जाता है तो क्या किया जाए? तो यही फिलासफी व रस्मो-रिवाज के छोटे छोटे भेद बाद में जाकर National Religion बन जाते हैं और अलग-अलग संगठन बनने का कारण बनते हैं। परिणाम हमारे सामने है।

सो यदि धर्म पीछे लिखी तीसरी और दूसरी बात के साथ अन्धविश्वास को मिलने का नाम है, तो धर्म की कोई जरुरत नहीं। इसे आज ही उडा देना चाहिए। यदि पहली और दूसरी बातें स्वतंत्र विचार मिलाकर धर्म बनता हो, तो धर्म मुबारक है।

लेकिन अलग-अलग संगठन और खाने-पीने का भेदभाव मिटाना जरुरी है, छूत-अछूत शब्दों को जड से निकालना होगा। जब तक हम अपनी तंगदिली छोडकर एक न होंगे, तब तक हममें वास्तविक एकता नहीं हो सकती। इसलिए ऊपर लिखी बातों के अनुसार चलकर ही हम आजादी की ओर बढ सकते हैं। हमारी आजादी का अर्थ केवल अंग्रेजी चंगुल से छुटकारा पाने का नाम नहीं, वह पूर्ण स्वतन्त्रता का नाम है-जब लोग परस्पर घुल-मिलकर रहेंगे और दिमागी गुलामी से भी आजाद हो जाएंगे।

(राष्ट्र सेवा दल पत्रिका जुलै २००६)

❖❖❖







अनुक्रमणिका

# श्रद्धा, अंधश्रद्धा आणि समाज
# नरेंद्र दाभोलकर (सत्कारवृत्त)

अंधश्रद्धेच्या रोगाची लागण ग्रामीण भाग आणि अशिक्षितांपुरती मर्यादित नाही. अमेरिकेतील अनेक मराठी कुटुंबांनाही त्याची लागण झाली आहे. त्याला आवर घालण्यासाठी डॉ. नरेंद्र दाभोलकर यांच्या चळवळीची अमेरिकेतही गरज निर्माण झाल्याचे प्रतिपादन महाराष्ट्र फौंडेशनचे प्रमुख सुनील देशमुख यांनी व्यक्त केली.

प्रतिकूल परिस्थितीमध्ये अंधश्रद्धा निर्मूलनाचे काम नेटाने करणाऱ्या डॉ. नरेंद्र दाभोलकर यांचा 'दशकातील सर्वोत्तम समाजसेवक' म्हणून महाराष्ट्र फौंडेशनतर्फे गौरव केल्यानंतर देशमुख बोलत होते. अध्यक्षस्थानी लोकसत्ताचे संपादक कुमार केतकर होते. प्रसिद्ध अभिनेत्री सोनाली कुलकर्णी या कार्यक्रमाला उपस्थित होती. अभिरूप न्यायालयाच्या स्वरूपात आयोजित करण्यात आलेल्या या कार्यक्रमामध्ये चळवळीतील आजवरच्या कामाचा गौरव म्हणून डॉ. दाभोलकर यांना दहा लाख रुपयांचा निधी देण्यात आला. यावेळी बोलताना देशमुख म्हणाले की, वरवर पाहता अंधश्रद्धा हा साधा आणि अतिशय निरुपद्रवी विषय वाटतो. पण आपण जरा खोलात जाऊन वास्तवावर नजर टाकली तर लक्षात येते की, बुवाबाजी आणि अंधश्रद्धेतून आलेल्या जादुटोणा, भानामती यासारख्या प्रकारांमुळे दरवर्षी हजारो जणांचे आयुष्य विस्कटून जाते. दुर्दैवाने अशा भरडल्या गेलेल्या लोकांचा हिशेब ठेवण्याची कसलीही सोय आपल्याकडे नाही. अर्थात, अंधश्रद्धा या फक्त महाराष्ट्रापुरत्या किंवा ग्रामीण भागापुरत्या मर्यादित नाहीत. अमेरिकेतही शिकलीसवरलेली मराठी कुटुंबे अंधश्रद्धेच्या आहारी जाऊन फरपटल्याची उदाहरणे आहेत. या कुटुंबांची वाताहत मनाला सुन्न करून टाकते.

दाभोलकरांच्या कार्याचा गौरव करताना देशमुख म्हणाले की, पदरी कुचेष्टा, अवहेलना आली तरी ती सहन करून खेडोपाडी फिरून प्रबोधनाची ही चळवळ दाभोलकरांनी नेटाने सुरू ठेवली आहे. महाराष्ट्राला आपण प्रगत राज्य म्हणतो. पण तिथेच अंधश्रद्धेचे बळी एवढ्या मोठ्या संख्येने असावेत हे मोठे दुर्दैव आहे. सत्काराला उत्तर देताना दाभोलकर म्हणाले की, आमच्या कामाला गती देऊ शकणारा अंधश्रद्धाविरोधी कायदा आता मंजुरीच्या अंतिम टप्प्यात आला आहे. विधानसभेने त्यावर शिक्कामोर्तब केले आहे. विधान परिषदेतही हिवाळी अधिवेशनात ते मंजूर होईल तेव्हा महाराष्ट्राच्या गौरवशाली पुरोगामी परंपरेवर शिक्कामोर्तब होईल.

अंधश्रद्धा निर्मूलनाची चळवळ फक्त हिंदू धर्मातील गैरप्रकारांविरोधात काम करत असल्याचे आरोप अनेकदा केले जातात. हे आरोप तथ्यहीन असल्याचे सांगताना ते म्हणाले की, कुठल्याही एका धर्माच्या विरोधात असण्याचे आम्हाला कारणच नाही. सगळ्याच धर्मातील अंधश्रद्धांच्या विरोधात आम्ही लढतो आहोत आणि आता तर हे स्पष्टच झाले आहे की, धर्म कुठलाही असो, अंधश्रद्धांच्या बळी मुख्यत्वे स्त्रियाच असतात. अंधश्रद्धा निर्मूलन चळवळीने मध्यंतरी आयोजित केलेल्या सहा लाख परित्यक्तांच्या अधिवेशनात हीच बाब प्रकर्षाने सामोरी आली होती. अंधश्रद्धा कोणत्याही प्रकारची असो, अंतिमत: त्यात भरडल्या जातात त्या बायकाच! त्यांच्या वाट्याला कधी छळवणूक येते तर कधी परित्यक्ता होणे... त्या अर्थाने, अंधश्रद्धा निर्मूलनाला स्त्री मुक्ती चळवळीचाच भाग मानले पाहिजे.

या प्रसंगी बोलताना सोनाली कुलकर्णीने चित्रपट सृष्टीतील बडी धेंडे केवढी अंधश्रद्धाळू असतात याचे दाखले दिले. सामाजिक भान सुटत चाललेल्या या लोकांसमवेत काम करणे संवेदनाक्षम मनाच्या कलावंतांना अतिशय कठीण जाते, असे तिने सांगितले. अंधश्रद्धा हे मानसिक अशक्तपणाचे लक्षण असल्याचे प्रतिपादन तिने केले. अध्यक्षपदावरून बोलताना केतकर म्हणाले की, धर्म, अंधश्रद्धा आणि विज्ञान यांची चिकित्सा व्हायला हवी, मात्र ती करताना वैज्ञानिक दृष्टिकोन आणि मानवतावाद यांची टोके एकत्र आली तर त्यातून अनेक समस्यांचे निराकरण होऊ शकते. पण तसे झाले नाही आणि मानवतावादाकडे पाठ फिरवूनच विज्ञान पुढे जात राहिले तर त्यातूनच संहार होऊ शकतो.

लोकसत्ता : ७ नोव्हेंबर २००६, पृ० १ व ५



अनुक्रमणिका

# विज्ञान आणि प्रतिभा

## लुइस वोल्पर्ट

### परिचायक : श्री० मा० भावे

### चौथा लेख

१.

असे समजले जाते की विज्ञानातील नवनिर्मिती आणि नवीन कलाकृतीची निर्मिती यांच्यात साधर्म्य आहे; किंबहुना दोन्ही क्षेत्रातील नवनिर्मितीत, निर्मितीच्या अंगाने फारसा फरक असा नाहीच. ज्या प्रकारची प्रतिभा विज्ञानातील शोध लावण्यासाठी लागते तीच प्रतिभा कलाकृतीच्या निर्मितीतही कामी येते. त्यामुळे, प्रतिभेच्या बाजूने पाहता, विज्ञानाचा प्रांत कोठे संपतो व कलेचा प्रांत कोठे लागतो हे सांगणे दुष्कर आहे. अनेक वैज्ञानिकांनाही हा विचार पटलेला आहे, असे दिसते. मॅक्स प्लँक हा थोर जर्मन वैज्ञानिक होता. तो आग्रहपूर्वक सांगत असे की, 'श्रेष्ठ वैज्ञानिकाच्या ठिकाणी अतिशय चैतन्यशील अंतःस्फूर्ती असायला हवी. (व्हिव्हिड इंट्यूटिव्ह इमॅजिनेशन) नैगमानिक तर्कशास्त्रातून (डिफिकल्ट लॉजिक) नवीन कल्पना स्फुरत नाहीत. कलावंतालाच शोभेल अशी जी उन्मेषशालिनी प्रतिभा असते तिच्यातून विज्ञानातसुद्धा नवीन कल्पना जन्माला येतात. जेकब ब्रोनव्हस्की नावाच्या विचारवंताने 'द कॉमनसेन्स ऑफ सायन्स' नावाचे पुस्तक लिहिले आहे. त्यात तो म्हणतो, 'वैज्ञानिक शोध काय किंवा कलाकृतीची निर्मिती काय, दोन्ही गोष्टीत समन्वेषणाचा (एक्स्प्लोरेशन) मोठा वाटा असतो. अनेक गोष्टींची निरीक्षणे करता करता त्या गोष्टीत लपून राहिलेला व डोळ्यात भरल्यानंतर विस्मित करून टाकणारा सारखेपणा निरीक्षकाला अवगत होतो. वैज्ञानिक आपल्या प्रमेयात आणि कलावंत आपल्या कलाकृतीतून हा त्याला भावलेला सारखेपणा समर्थपणे मांडतो. नवनिर्मितीचा अर्थ हा असा आहे. एक अभिजात (ओरिजनल) विचार इथे सांगतला जातो. विज्ञानातील प्रमेय असो की कलाकृती असो, दोन्हीच्या मुळाशी असा अभिजात विचार असावा लागतो.'

हा दावा कितीही आकर्षक वाटला तरी तो भाबडा व दिशाभूल करणारा आहे. वैज्ञानिक नवनिर्मिती काळात व त्यासाठी त्यांच्या ठिकाणी चैतन्यशील अंतःस्फूर्ती असायला हवी. हे म्हणणे बरोबर आहे. परंतु कलाक्षेत्रातील नवनिर्मिती व विज्ञानातील नवनिर्मिती यात प्राथमिक पातळीवर काही साम्य आढळले तरी त्या दोन्ही निर्मितीत काही मूलभूत फरक आहेत; आणि हे फरक आपण तपासू लागलो की या दोन क्षेत्रात चालणाऱ्या मनुष्याच्या व्यापारातील फरक आपल्या ध्यानात येऊलागतात.

कलेतील नवनिर्मितीवर कलावंताच्या व्यक्तिमत्त्वाचा ठसा ठसठशीतपणे उमटलेला आढळतो. उलट विज्ञानातील प्रमेयावर सुसंगतपणा, निसर्गाचा समजावून घेण्याची कला आणि ज्या क्षेत्रातील ते प्रमेय आहे त्या क्षेत्राचा आजवर झालेला अभ्यास यांची बंधने असतात. फ्रेंच लेखक ॲलं रोब्ला-ग्रियें आपल्या कादंबऱ्यांविषयी सांगतो की, 'कादंबरीत अंतर्गत विसंगती असू शकते. ती पुन:पुन: तीच हकीकत सांगते. ती स्वतःचे तुकडे करते आणि स्वतःच आधी सांगितलेली हकीकत खोडूनही काढते.' याउलट विज्ञानातील प्रमेय किंवा शोध त्याच्या निर्मात्याच्या पुरता राहत नाही. ते प्रमेय सार्वजनिक ज्ञानाचा भाग होते. क्रमिक पुस्तकाच्या वाटेने ते विद्यार्थ्यांपर्यंत पोचते. अखेरीला तो शोध त्या वैज्ञानिकाचा राहत नाही तर मनुष्य जातीच्या ज्ञानसंगतीचा तो एक भाग बनून राहतो. कलाकृतीचा अभिजातपणा हे तिचे महत्त्वाचे वैशिष्ट्य असते. त्या अभिजातपणाच्या योगाने कलाकृती परंपरेला आव्हान देते व स्वतःचा स्वीकार करण्याला परंपरेला भाग पाडते. ती कलाकृती परंपरेत विलीन न होता परंपरेचा एक तेजस्वी व स्वनामधन्य भाग होऊन राहते.

वैज्ञानिक ज्याला जन्म देतो तो सिद्धांत व कलाकार निर्माण करतो ती कलाकृती यांच्या प्रकृतीत महदंतर आहे. कलाकृतीला विविध अर्थ असतात आणि निरनिराळ्या रसिकांना ती वेगवेगळ्या प्रकारांनी व कारणांनी भावते. याउलट वैज्ञानिक सिद्धांताला एकच एक निश्चित अर्थ असतो. दुसरे असे की, कलाकृतीतून बरेच वेळा नैतिक तत्त्वांचे प्रतिपादन केलेले असते. विज्ञान मात्र, तत्त्वत: तरी मूल्यविचारापासून लांब असते. तिसरे असे की, कलाकृती ही कलाकाराची वैयक्तिक निर्मिती तर असतेच पण बहुधा ती

अनुक्रमणिका

एका मनुष्याच्या आंतरिक अनुभवांचे चित्रण करते. आणि ते अनुभव व्यक्तिनिष्ठ असतात. उलट वैज्ञानिक एका क्षेत्रातील सर्व घटकांना लागू पडेल अशा निर्मितीचा शोध घेत असतो. वैज्ञानिकाच्या व्यक्तिगत भावना किंवा शैली यांचा वैज्ञानिकाने आपल्या शोधाविषयी लिहिलेल्या निबंधाचा काही संबध असत नाही. शेवटचे म्हणजे, वैज्ञानिकाच्या निर्मितीचे मूल्यमापन करण्याचे वस्तुनिष्ठ व सर्वमान्य असे निकष आहेत. कलाकृतीची विवध अर्थबोधने (इंटरप्रिटेशन्स) शक्य असल्याने कलाकृतीच्या मूल्यमापनाचे सर्वमान्य निकष सांगता येत नाहीत. हे सर्व फरक लक्षात घेता विज्ञानातील सर्जकता (क्रिएटिव्हिटी) आणि कलाक्षेत्रातील सर्जकता यात साम्य आहे, किंबहुना त्या एकच आहेत, हे म्हणणे स्वीकारता येत नाही.

आंदी प्वांकारे हा फ्रेंच गणिती व विज्ञानाविषयी चिंतन करणारा विद्वान मनुष्य होता. तो म्हणतो, "एखादा शास्त्रज्ञ निसर्गाचा अभ्यास करतो, तो काही त्यापासून उपभोगी अशी गोष्ट मिळावी म्हणून नाही. निसर्ग त्याला सुंदर वाटतो व त्याचा अभ्यास करण्यापासून आनंद मिळतो यासाठी तो निसर्गाचा अभ्यास करतो. इथे अभिप्रेत आहे ते इंद्रियसंवेद्य सौंदर्य नव्हे. इंद्रियांना जागवणारे सौंदर्य कमी दर्जाचे आहे असे मी म्हणत नाही. पण त्या सौंदर्याचा विज्ञानाशी संबंध नाही. मला इथे ज्या सौंदर्याविषयी बोलायचे आहे ते सौंदर्य निरनिराळ्या घटकांच्या चपखल गुंफणीतून निर्माण होते. शुद्ध बुद्धीच्या साहाय्याने हे सौंदर्य आपण जाणू शकतो.

विज्ञानाला जे सौंदर्य अभिप्रेत असते त्याची व्याख्या करणे अवघड आहे. पण सरळपणा, सफाईदारपणा, प्रयोग करण्याची रीत अगर घटनांचा खुलासा करणारी नवी उपपत्ती सापडल्यामुळे जे सुखद आश्चर्य वाटते ते, अशी काही या सौंदर्याची गमके आहेत. वैज्ञानिक सर्जन हे केवळ न्यूटन किंवा डार्विन यांनी मांडलेल्या महासिद्धांतातच आढळते असे नाही. या सर्जकतेची अनेक रूपे आहेत व ती व्यक्त ज्यातून होते अशा शैलीही पुष्कळ आहेत. प्रयोगाचे नवे उपकरण बनवणे हीदेखील वैज्ञानिक सर्जनाची एक खूण आहे व अशा उपकरणाने मोठी प्रगती साधते. याचे एक उदाहरण 'क्लाऊड चेंबर' हे उपकरण होय. सूक्ष्म कणांच्या टकरींचे निरीक्षण करण्यासाठी हे उपकरण बनवले आहे. कधी कधी नवीन प्रयोगाचा तपशीलवार आराखडा बनवणे व त्याप्रमाणे प्रयोग घडवून आणणे या मार्गाने देखील चकित करणारी वैज्ञानिक प्रगती घडून येते. प्रगतीच्या प्रत्येक पायरीवर प्रतिभेचा काही ना काही आविष्कार संकल्पनेच्या रूपाने झालेला दिसतो.

२

सर्जनाची प्रक्रिया कशी चालते याचे पूर्ण आकलन अजून झालेले नाही. मनोविश्लेषणशास्त्राने (सायको ॲनालिसीस) सर्जकतेविषयी काही कल्पना मांडल्या आहेत. परंतु त्यातून सर्जकतेचा खुलासा मिळण्यापेक्षा प्रतिभाशाली व्यक्तींवर कोणत्या प्रेरणांचा अंमल चालतो याचाच बोध होतो. रासनि हा एक उत्तम फ्रेंच कवी होता. त्याच्याविषयी पॉल व्हेलरी हा पंडित म्हणतो, 'रसनिच्या आयुष्याचे कितीही तपशील तुम्ही गोळा केलेत तरी त्याच्या काव्यस्फूर्तीची किल्ली तुमच्या हाती लागणार नाही.'

सर्जनाविषयीच्या आपल्या माहितीत काहीही त्रुटी असल्या तरी विज्ञानक्षेत्रातील सर्जनाविषयी आजवर मांडल्या गेलेल्या कल्पना आणि विज्ञानातील शोधांची काही उदाहरणे यांचा एकत्र अभ्यास केल्यास विज्ञानातील नवीन सिद्धांत कसे जन्माला येतात यावर प्रकाश पडू शकतो.

एक दावा असा आहे की, अंधारात गोळी झाडावी त्याप्रमाणे वैज्ञानिक यदृच्छया सुचतील तशा उपपत्ती मांडत जातात. अंधारात झाडलेली गोळीदेखील यदृच्छया लक्षावर पोचते. त्याप्रमाणे एखाद्या उपपत्तीने घटनांचे समाधानकारक स्पष्टीकरण मिळते व ती उपपत्ती टिकून राहते. बाकीच्या उपपत्ती निकालात निघतात. हीच गोष्ट अधिक संस्कारित स्वरूपात अशी सांगितली जाते. वैज्ञानिकाच्या मनातील सर्जनक्रिया दोन पातळ्यांवर चालते. चिंतनाचा विषय झालेल्या घटनेचे - मग ती घटना म्हणजे पूर्वी मांडलेली व प्रतिष्ठा पावलेली एखादी उपपत्तीही असेल - जे आकलन वैज्ञानिकाला होते ते तुकड्यातुकड्यांच्या स्वरूपात त्याच्या मनात घोळत राहते. या तुकड्यांच्या संचाचे वेगवेगळे क्रमचय (पर्म्युटेशन्स) यदृच्छया बनतात. या क्रमचयांपैकी काही क्रमचय निवडून त्यातून नवीन उपपत्तीची घडण होते. वैज्ञानिक सर्जनाविषयीचा हा विचार फार जुना आहे. देकार्त (१५९६-१६५०) हा नावाजलेला वैज्ञानिक व तत्त्वज्ञ होता. त्याचे म्हणणे असे होते की, उपपत्ती म्हणा की अभ्युपगम (हायपॉथिसिस) म्हणा, कसा तयार होतो हे महत्त्वाचे नाही;

कारण अशा असंख्य उपपत्ती एका वेळी उपलब्ध असतात. मुद्दा त्यापैकी कोणती उपपत्ती समाधानकारक ठरते हा आहे.

तथापि वैज्ञानिक सर्जनाची ही यदृच्छेवर विसंबणारी उपपत्ती समाधानकारक नाही. कल्पना यदृच्छया मनात येतात का, त्या खरोखरच अचानक उद्भवतात का, आकलनाच्या तुकड्यांचे क्रमचय जुळविताना सर्जकतेचा अनुभव येतो का, यासारख्या प्रश्नांची उत्तरे या उपपत्तीपासून मिळत नाहीत. उत्तम वैज्ञानिकाचे वैशिष्ट्य असे असते की, तो आधीच मान्यता पावलेला उपपत्तीला अधिक समर्पक पर्याय सुचवितो. विज्ञानाच्या ज्या शाखेत वैज्ञानिक काम करीत असतो त्या शाखेतील उपलब्ध ज्ञानाचा सखोल विचार केल्याखेरीज योग्य अशा प्रश्नाचा उद्भव त्याच्या मनात होत नाही, व योग्य प्रश्न विचारले गेले तरच नवीन विचारांना वाव मिळतो. या उंचीपर्यंत पोचलेले वैज्ञानिक फारच थोडे असतात. कारण तिथे पोचेपर्यंत ज्या कसोट्या पार कराव्या लागतात त्यातच अनेक जण गळून जातात.

आपल्या क्षेत्रातील उपपत्ती व प्रश्न यांची नीट ओळख करून घेण्यात वैज्ञानिकाची आकलनशक्ती दिसून येते. कोणता प्रश्न आपल्याला सोडवता येईल व त्या प्रश्नाची नवी मांडणी कशी करावी, इथे वैज्ञानिकाचे बुद्धिकौशल्य पणाला लागते. प्रश्न सोडविण्यासाठी लागणारी नवी संकल्पना स्फुरणे ही प्रतिभेची देणगी होय. वैज्ञानिकाला सुचणारे विचारव्यूह हे यदृच्छेने स्फुरलेले किंवा उद्देशहीन असतात हे जसे खरे नाही तसेच ते विचारव्यूह प्रथमदर्शनी अडाणी वाटणाऱ्या कल्पनांना झटकून टाकतील इतके बंदिस्तही असत नाहीत. वैज्ञानिकाचे वैशिष्ट्य हेच की, तो समोरच्या समस्येचे कल्पनापूर्ण उत्तर शोधून काढतो. वैज्ञानिकाच्या विचार-पद्धतीची तुलना बुद्धिबळपटूच्या डावपेचांशी करता येईल. पुढच्या अनेक खेळ्यांचा कयास बांधून बुद्धिबळपटू आताच्या प्रतिखेळीविषयी निर्णय घेतो. पण आपण असे म्हणू शकत नाही की, पुढे होणाऱ्या खेळ्या कोणत्या हे बुद्धिबळ खेळणाऱ्याला यदृच्छया सुचते. त्या खेळ्या कोणत्या हे काही ना काही दंडकामुळे वा योजनेमुळेच सुचत असते.

सर्जनाच्या (क्रिएटिव्हिटी) विषयीच्या विचारातून यदृच्छा (चान्स) हा घटक काढून टाकला म्हणजे नवीन कल्पना कशा सुचतात याचे एकच महत्त्वाचे उगमस्थान उरते. समोर उभ्या असलेल्या समस्येच्या उत्तराविषयी वैज्ञानिक काही धाडसी कयास बांधतो व त्याचा पडताळा (बहुधा) प्रयोगाच्या सहाय्याने घेऊ पाहतो. रेणवीय जीवशास्त्राचे (मोलेक्युलर बायॉलॉजी) अभ्यासक सिडने ब्रेकर डी.एन.ए.च्या रचनेचा शोध लावणारे विख्यात शास्त्रज्ञ फ्रान्सिस क्रिक यांच्याबरोबर काम करीत असत. त्या वेळचा अनुभव ब्रोकर सांगतात. तो असा "आमचा असा ठराव होता की, मनात येईल ते बोलायचे. साहजिकच आमची बहुतेक संभाषणे वाह्यातच असत. पण बरेचदा असेही होई की, एकाने मांडलेली कच्ची रचना दुसरी उचलून धरी व तिला आधिक स्वीकार्य रूप देई. मला असे वाटते की, आम्ही जे काही उपयुक्त काम केले त्यातले पुष्कळसे काम त्या वाह्यात बडबडीतून सुचलेले होते. काही वेळा असेही होई की, आम्हाला सुचलेल्या उपपत्ती दोघांनाही पसंत पडत. परंतु अशाही उपपत्तींना आम्ही प्रसिद्धी दिली नाही, कारण त्या मूर्खपणाच्या होत्या."

रिचर्ड फेनमन हे भौतिकीय नामवंत शास्त्रज्ञ व नोबेल पारितोषिक विजेते पंडित आहेत. ते म्हणतात की, नवीन सिद्धांत किंवा प्रमेय कयास बांधण्यातून व बांधलेल्या कयासाची पडताळणी काढ्यातून जन्माला येतात. प्रथम आपण नवीन नियमाचा किंवा उपपत्तीचा अंदाज बांधतो व त्या उपपत्तीपासून प्रत्यक्षात काय निष्पन्न होईल ते ठरवतो. प्रयोगातून ही अपेक्षित निष्पत्ती आढळली नाही तर आपला अंदाज चुकीचा ठरला, असे ठरवतो.

आपली उपपत्ती किंवा उपपत्तीविषयीचा अंदाज चुकीचा ठरला, तर शास्त्रज्ञाचा हिरमोड होईल हे खरे; पण त्याची लाज वाटावी असे काहीच नाही. फेनमनने वर्णिलेली प्रक्रिया आपल्याला न्यूटनच्या संशोधन पद्धतीतही दिसून येते. न्यूटनच्या संशोधन पद्धतीत पहिला टप्पा असा असतो. जो प्रश्न शास्त्रज्ञांपुढे असतो तो काही शर्तींच्या चौकटीत मांडलेला असतो. या शर्ती गणिताच्या भाषेत मांडल्या की, त्यांच्यापासून काही निष्कर्ष निघतात. दुसऱ्या टप्प्यात हे निष्कर्ष व्यावहारिक भाषेत मांडून त्यांचा निसर्गात काय पडताळा यायला पाहिजे हे ठरवले जाते. मग प्रत्यक्षात हा पडताळा दिसतो का, हे तपासायचे. उदा. न्यूटनने ग्रहजातींचा उलगडा गुरुत्वाकर्षणाच्या अभ्युपगमाने शोधून काढला. त्यासाठी त्याने काय केले? गुरुत्वाकर्षण असते, हे सिद्ध करण्याच्या लटपटीत तो पडला नाही. गुरुत्वाकर्षण व्यस्त वर्गाच्या नियमाप्रमाणे चालत असेल (इन्व्हर्स स्क्वेअर लॉ) तर ग्रहांच्या कक्षा कशा



अनुक्रमणिका

राहतील याचे निष्कर्ष त्याने गणिताने काढले, व त्याप्रमाणे कक्षा प्रत्यक्षात असतात का हे तपासले. कक्षा त्याप्रमाणे लंबगोल असतात हे दिसून आल्यावरच गुरुत्वाकर्षणाच्या अभ्युपगमाचा स्वीकार झाला.

विज्ञानातील शोधांविषयी अशी समजूत प्रचलित आहे की, शास्त्रज्ञ चिकाटीने माहिती गोळा करतो, निरीक्षणे घेत राहतो व त्यातून त्याला नवीन शोध लागतात. ही समजूत बरोबर नाही हे आतापर्यंतच्या विवेचनावरून स्पष्ट झालेच आहे. धाडसी व स्वैर विचार विज्ञानाच्या प्रगतीला उपयोगी ठरतो ही गोष्ट थोर तत्त्वज्ञ कार्ल पॉपर याने आग्रहपूर्वक मांडली. कल्पना कशाही असोत त्या पडताळ्याच्या कसोटीला उतरल्या तर ती कल्पना एक अभ्युपगम म्हणून स्वीकार्य होते व त्याच स्थितीत ती राहते. विज्ञानातील 'सिद्धांत' हे अभ्युपगमाच्या पातळीवरच कायम राहतात.

३

जाणीवपूर्क बांधलेले कयास किंवा अभ्युपगम यांच्यामुळे विज्ञानाची प्रगती होते हे खरेच आहे. पण काही शास्त्रज्ञ असेही आत्मविश्वासाने सांगतात की, अचानक झालेल्या स्फूर्तीमुळे प्रश्नाचे उत्तर मनःचक्षूंसमोर उभे राहिले. मागे आपण ज्या प्वांकारे नावाच्या विचारवंताचा उल्लेख केला आहे त्याने या बाबतीतला आपला अनुभव अशा रीतीने सांगितला आहे. "माझ्या चालू संशोधनातून मी मन काढून घेतले व त्या संशोधनाशी ज्याचा मुळीच संबंध नव्हता अशा अंकगणितातील काही प्रश्नांवर माझे मत केंद्रित केले. त्या प्रश्नाचे उत्तरही मला सापडेना; तेव्हा विटून जाऊन मी समुद्र-किनाऱ्यावरील एका ठिकाणी राहायला गेलो व दुसऱ्याच काही प्रश्नात मन गुंतविले. एक दिवस सकाळी समुद्रावर फिरायला गेलो असता अचानक व झटक्यात माझ्या मनात कल्पना आली की ज्या अंकगणितीय रूपांतरणाचा (ट्रान्सफॉर्मेशन) मी विचार करीत होतो ती रूपांतरणे व (ज्या प्रश्नांचा मी त्याआधी विचार करीत होतो तेथे लागणारी) अयुक्लिडीय भूमितीत वापरण्यात येणारी रूपांतरणे ही एकच आहेत." अशा रीतीने गणिताच्या प्रगतीतील एक महत्त्वाचा मुक्काम अचानक झालेल्या 'साक्षात्कारा'मुळे गाठला गेला. ख्रिस्तोफर झमिन हा एक ब्रिटिश गणिती होता. त्याचा अनुभवही याच प्रकारचा आहे. नोबेल पारितोषिक विजेता जीवशास्त्रज्ञ फ्रांस्या याकोब याला देखील एक महत्त्वाचा शोध क्षणात घडून आलेल्या 'दिव्य' स्फूर्तीतून लाभला असे त्याने नमूद केले आहे.

अशा तऱ्हेने जाणिवेपलीकडच्या अबोध मनात चाललेल्या घुसळणीतून महत्त्वाच्या कल्पना उसळून येतात असा अनुभव शास्त्रज्ञाला कधी कधी येतो आणि या प्रकारचे 'क्षणात होणारे दिव्य भास' काव्यमय वाटत आसले तरी अनेक विचारवंतांना याबाबत काही शंका येतात. जाणिवशून्य अशा मनात वैज्ञानिक विचार अचानक चमकून गेला, असे सांगणारी जी उदाहरणे आहे त्यापैकी प्रत्येकात असे आढळले, की असा नवा विचार सुचण्यापूर्वी शास्त्रज्ञाने आपल्यापुढील प्रश्नाचा दीर्घकाळ व जाणीवपूर्वक विचार केला होता. हे चिंतन निष्फळ झाल्यानंतर त्या शास्त्रज्ञाने काही काळ स्वस्थ किंवा दुसऱ्या एखाद्या प्रश्नाचा विचार करण्यात घालविला होता. त्यानंतर शास्त्रज्ञ पुन: मूळ प्रश्नाकडे वळला तेव्हा त्याला असे वाटले असण्याची शक्यता आहे की, आपण आपल्या विचारांना नवी दिशा दिली आहे. परंतु वैज्ञानिकाचे अशा आशयाचे निवेदन, त्याच्या दृष्टीने प्रामाणिकपणाचे असले तरी, काळजीपूर्वक तपासून घेतले पाहिजे. कारण 'अचानक चमकून गेलेली नव्या विचारांची मशाल' हे संशोधनाचे खरे रूप असण्याची शक्यता थोडी आहे. या 'विचारांच्या मशाली' पूर्वी घडलेल्या चिंतनपर्वाची देणगी असण्याची शक्यता भरपूर आहे. क्रिक व वॅाटसन यांनी डी.एन.ए. ची रचना शोधून काढली तेव्हा त्यांनाही वाटले होते की हे उत्तर आपल्याला फार थोडक्यात व अंतःस्फूर्तीमुळे सापडले. पण हे उत्तर सापडण्यापूर्वी त्यांनी दीर्घकाळ व अपार कष्ट घेतले होते. शिवाय हे लक्षात ठेवणेही जरूर आहे की, अचानक सुचलेल्या उत्तरांची उदाहरणे विज्ञानाच्या इतिहासात फार तुरळक आहेत.

प्वांकारे व त्याच्याच विचारांचे इतर शास्त्रज्ञ यांनी अबोध मन (अनकॉन्शन्स) व अंतःप्रेरणा (इन्ट्यूशन) या संज्ञा वापरल्या आहेत. त्यातून त्यांना इतकेच म्हणायचे असावे की, सर्जन-प्रक्रिया एका कृष्णपेटिकेत (ब्लॅक बॉक्स) चालते व त्या प्रक्रियेची जाणीव आपल्याला होत नाही. इथे याची नोंद घेणे गरजेचे आहे, की शास्त्रज्ञ वापरीत असलेली 'अंतःप्रेरणा' ही संज्ञा व सामान्य व्यवहारात वापरला जाणारा 'अंतःप्रेरणा' हा शब्द या दोन्हीत फार फरक आहे. आइनस्टाइन म्हणत असे की, आपल्याला सुचलेल्या कल्पनांपैकी कोणती कल्पना उपयोगी व कसोटीला टिकणारी आहे याचे आकलन






अनुक्रमणिका

वैज्ञानिकाला असते व वैज्ञानिकाची 'अंतःप्रेरणा' या आकलनाचा आधार घेऊन चालते. सामान्य समजूत ज्याला 'अंतःप्रेरणा' हे नाव देते ती गोष्ट अगदी वेगळी आहे. दोन्ही प्रकारच्या 'अंतःप्रेरणां'ना अनुभवाचा आधार असतो. परंतु वैज्ञानिक प्रेरणा ज्या अनुभवावर विसंबून असते तो अनुभव विविध प्रकारच्या वैज्ञानिक व्यापारातून गोळा झालेला. त्या अनुभवाचे एक अंग म्हणजे ज्या शाखेत वैज्ञानिक काम करीत असतो त्या शाखेची तांत्रिक माहिती व दुसरे अंग असे की, इतर वैज्ञानिकांनी त्यांच्यापुढे आलेले प्रश्न कसे सोडविले याचे ज्ञान, तिसरा भाग हा की, वैज्ञानिक उपपत्तीपासून काय निष्पत्ती हवी आहे, याचा पक्का अंदाज, कोणते प्रश्न आपण सोडवू शकतो व कोणते प्रश्न सुटणारे नाहीत हे ओळखणे हा उपयोगी पडणाऱ्या अनुभवाचा शेवटचा भाग. आइनस्टाइनने अभ्यासासाठी गणित हा विषय बाजूला करून भौतिकी या विषयाची निवड केली याचे कारण, तो असे सांगत असे, की गणितातील प्रश्नांपैकी महत्त्वाचा प्रश्न कोणती हे ओळखण्याची दृष्टी आपल्याकडे नाही, असे त्याला वाटत होते.

४

अर्थशास्त्रात ज्याने नोबेल पारितोषिक मिळविले आहे असा विचारवंत हर्बर्ट सायमन व त्याचे सहकारी यांना वैज्ञानिकाची शोध लावण्याची पद्धती आणि कलावंताची कलाकृती निर्माण करण्याची प्रक्रिया यात कोणतेच साम्य आढळत नाही. त्यांचा असा दावा आहे की, वैज्ञानिक सर्जनाची मांडणी एखाद्या 'संगणकीय आज्ञावली'च्या (कॉंप्युटर प्रोग्राम) स्वरूपात करता येते. या दाव्यापासून दोन निष्कर्ष निघतात. पहिला असा की, 'प्रतिभाशाली' वैज्ञानिक व 'सामान्य वैज्ञानिक' यांच्या कार्यात व कार्यप्रणालीत कोणताच मूलभूत फरक नाही. याचाच, दुसरा उपनिष्कर्ष अशा की, वैज्ञानिकांच्या सर्जनशक्तीची प्रतवारी करता येणार नाही. वैज्ञानिक शोधाच्या प्रक्रियेचे प्रारूप करता येते आणि त्या प्रक्रियेचे आज्ञावलीच्या (प्रोग्रॅम) स्वरूपात वर्णनही करता येते, असा त्यांचा दावा आहे.

हर्बर्ट सायमन व त्याचे सहकारी यांचा मुख्य अभ्युपगम (हायपोथेसिस) असा आहे की, वैज्ञानिक शोध लागण्यासाठी शोधकाच्या मनात काही विशेष यंत्रणा (मेकॅनिझम) असते, असे नाही. रोजच्या व्यवहारातील प्रश्न सोडविण्यासाठी आपण जी बौद्धिक कसरत करतो त्या कसरतीपैकीच एका कसरतीचा उपयोग वैज्ञानिक शोध लावताना होतो. या कसरतीचे निराळेपण कशात असते? रोजच्या व्यवहारात समोर ठाकलेला प्रश्न सुटला असे केव्हा म्हणायचे ते स्पष्ट झालेले असते. 'तहान लागली' की 'पाणी कसे मिळवायचे' हा प्रश्न येतो. विहिरीतून पाणी काढले की, तो प्रश्न सुटतो. विज्ञानात मात्र प्रश्न सुटला हे केव्हा ठरते, ते स्पष्ट असतेच असे नाही. दुसरे असे की विज्ञानातील प्रश्न हा व्यवहारातील प्रश्नासारखा ठोसर (कॉंक्रीट) नसतो. त्याचे नेमक्या शब्दात वर्णन करणे जरुरीचे असते. अखेरची गोष्ट ही की, व्यवहारातील प्रश्न सोडविण्याचे रिवाज परंपरेने व सवयीने बऱ्याच प्रमाणात ठरून गेलेले असतात. असे प्रश्न सोडविण्यासाठी यदृच्छया काही युक्ती सुचली व ती वापरून बघितली, असे होत नाही. वैज्ञानिक प्रश्न सोडवितानादेखील यदृच्छेला पूर्ण वाव असतो असे नाही. वैज्ञानिक त्याच्या पुढील प्रश्न सोडविताना 'अन्वेषण-उपयोगिते'चा वापर करीत असतो. चांगल्या वैज्ञानिकाच्या बाबतीत त्याला काही अंतःप्रेरणेतून उत्तर सुचते असे म्हणण्यापेक्षा अन्वेषण उपयोगितेची त्याची जाण अधिक प्रगल्भ असते असे म्हटले पाहिजे.

सायमनप्रभृती पंडितांनी एक संगणकीय कार्यावली (कॉंप्युटर प्रोग्राम) तयार केली आहे. त्यांचा दावा असा की, विज्ञानाच्या वेगवेगळ्या शाखातील लागलेल्या शोधांची प्रक्रिया या कार्यावलीत बसविता येते. याचा अर्थ असा नाही की, या कार्यावलीचा उपयोग करून नवीन शोध लागू शकतील. न्यूटनला जे काही विज्ञान ठाऊक होते, ते संगणकाच्या स्मृतिकोशात भरले व सायमनने तयार केलेल्या कार्यवलीनुसार संगणाकाने काम केले तर संगणकही गुरुत्वाकर्षणाची कल्पना निर्माण करू शकतो, असे सायमनने दाखवून दिले आहे. पुंजयामिकी (क्वांटम मेकॅनिझम) या शास्त्रात 'प्लँकचा स्थिरांक' हा महत्त्वाचा शोध मानला जातो. त्याबद्दलही सायमनने वरीलप्रमाणेच एक 'कार्यावली' तयार केली आहे. संगणकाच्या ठिकाणी 'प्रतिभा' असते असा दावा कोणीच करत नाही. वैज्ञानिक शोधाची प्रक्रिया संगणकाकरवी घडवून आणता येत असेल तर त्याचा मायना असा होतो की, शास्त्रीय शोधात प्रतिभेची काहीच भूमिका असू शकत नाही.

याउलट असेही म्हणता येईल की, गुरुत्वाकर्षणाच्या








शोधाची कार्यावली ज्यांनी तयार केली त्यांना आपल्याला या कार्यावलीपासून काय निष्पन्न व्हावयास हवे आहे ते माहीत होते. उलट न्यूटनला आपण जी काही खटपट चालविली आहे तिच्यापासून काही निष्पन्न होणार आहे किंवा नाही आणि काही निष्पन्न झाल्यास ते काय असेल ते माहीत नव्हते; व कार्यावली आणि शोधप्रक्रिया यांच्यातील हा मूलभूत फरक आहे. सायमनच्या कार्यावलीने नवीन शोध लागलेला नाही, तर आधीच लागलेल्या शोधाची तर्कशुद्ध मांडणी त्याने कार्यवलीद्वारे करून दाखविली आहे. तथापि, सायमनच्या दाव्यावर याहून मूलगामी अशी टीका खालीलप्रमाणे करता येईल.

वैज्ञानिक संशोधनाचा 'समस्या-उकल' (प्रोब्लेम सॉल्व्हिंग) हा एक महत्त्वाचा भाग आहे हे खरे. पण तेवढ्यानेच वैज्ञानिक संशोधनाचे संपूर्ण वर्णन होते असे नव्हे. आधार-सामग्री (डेटा) गोळा करणे; कोणत्या परिस्थितीतून प्रश्न उत्पन्न झाला त्या परिस्थितीचे समर्पक वर्णन करणे; स्पष्टीकरण देणे; उपस्थित झालेल्या व समस्येची उकल करण्यातून हाती आलेल्या सिद्धांताची पडताळणी करण्यासाठी प्रयोगाची योजना करणे, अशा प्रयोगासाठी लागणारी उपकरणे तयार करणे इत्यादी अनेक अंगे वैज्ञानिक संशोधनाला असतात व त्यातली काही अंगे तरी संगणकाच्या कार्यवलीत बसविता येणार नाहीत. हाती असलेल्या आधारसामग्रीपासून निगमनाचे (इंडक्शन) सिद्धांत कसा बांधावा यासाठी कार्यावलीचा उपयोग होऊ शकतो.

प्रश्नाची समुचित मांडणी करणे ही गोष्ट प्रश्नाच्या सोडवणुकीसाठी महत्त्वाची आहे, ते सायमन व त्याचे सहकारी यांना मान्य आहे. त्यांचा दावा असा की, ही समुचित मांडणी हा उकलीतील एक टप्पा आहे. या दाव्यावर अनेक विचारवंतांनी आक्षेप घेतला आहे. आइनस्टाइनच्या सापेक्षता सिद्धांताच्या शोधात आइन-स्टाइनने उपस्थित केलेल्या एका प्रश्नाची भूमिका महत्त्वाची होती. तो प्रश्न असा : समजा प्रकाश-लहरीवरील एक बिंदू आपण निवडला आणि प्रकाश-लहरीच्या मागे पळत जाऊन तो बिंदू गाठला तर या घडलेल्या क्रियेचे परिणाम काय असतील? संगणकीय कार्यावली अशा तऱ्हेचे प्रश्न उपस्थित करू शकेल का?

राजकारणाचे वर्णन जे शक्य आहे ते करण्याचे कौशल्य (दि आर्ट ऑफ पॉसिबल) असे करतात. त्याच धर्तीवर विज्ञानाचे वर्णन पीटर मेडावर नावाच्या, नोबेल पारितोषिक विजेत्या शास्त्रज्ञाने 'जे सुटण्याजोगे आहे ते उकलण्याचे कौशल्य' (दि आर्ट ऑफ द सोल्युबल) असे केले आहे. कोणता प्रश्न सुटू शकतो याची निवड शास्त्रज्ञाला करता आली पाहिजे. या लेखमालेतील पहिल्या लेखात आपण डी.एन.ए. च्या रचनेचा शोध फ्रान्सिस क्रिक या संशोधकाने लावला याची हकीकत पाहिली आहे. फ्रान्सिस क्रिकचा योग्य तो प्रश्न निवडण्याच्या मुद्द्यावर फार भर आहे. रेणवीय जैवविज्ञान (मोलेक्युलर बायालॉजी) या विषयाच्या सुरुवातीच्या काळात क्रमवारीचा अभ्युपगम (सिक्वेन्स हायपॉथेसिस) मांडला गेला. या अभ्युपगमाचा मतलब असा की, प्रथिनातील ॲमिनो आम्लाची जी क्रमवारी असते तिच्यावरुन त्या प्रथिनाचे सर्व गुणधर्म ठरतात. शास्त्रज्ञांना हे माहीत होते की, प्रथिनातील ॲमिना आम्लाची क्रमवारी ते प्रथिन एका सरळ रेषेत ठेवून बसविलेली असली तरी प्रत्यक्षात प्रथिनाची एक प्रकारची गुंडाळी झालेली असते व ही गुंडाळी एका प्रतलात नसून त्रिमिती अवकाशात झालेली असते. प्रथिनाच्या साखळीच्या या आकाराचा व प्रथिनाच्या कार्याचा जवळचा संबंध आहे; कारण प्रथिनाचे विशेष गुणधर्म साखळीला जो अवकाशीय आकार आलेला असतो त्यावरून ठरतात. शास्त्रज्ञ असे मानत होते की, ॲमिनो आम्ले ज्या क्रमवारीने प्रथिनात बसविलेली असतात त्या क्रमवारीमुळे प्रथिनांची साखळी विशिष्ट आकार घेते. परंतु आम्लांची क्रमवारी आणि प्रथिनाने घेतलेला आकार यांच्यातील संबंध कुणीच निश्चित केला नव्हता. अशा अवस्थेत खरे तर क्रिक व त्याचे सहकारी यांनी हा संबंध उकलून डीएनएच्या रचनेचा प्रश्न हाती घेतला ही त्यांची निवड योग्य ठरली. त्यांना डीएनएच्या रचनेचा प्रश्न सोडविता आला; उलट ॲमिनो आम्लाची क्रमवारी व प्रथिनाचा आकार यांच्यातील संबंधाचा प्रश्न अजून सुटलेला नाही. प्रश्नाची निवड करण्याचे हे कौशल्य संगणकाच्या कार्यावलीत अजून तरी बसविता आलेले नाही.

संगणकाच्या कार्यावलीत जे बसविता येत नाहीत असे वैज्ञानिक संशोधनाचे आणखी दोन पैलू आहेत. पहिला असा की, जो प्रश्न आपल्यासमोर उभा आहे त्याचे सुलभ असे रूप काही गृहितके मान्य करून मांडणे. यात एक पथ्य पाळणे गरजेचे आहे ते असे की मूळ प्रश्नाचे हे सुलभ रूप इतकेही निराळे होऊ नये की प्रश्नाचे उत्तर आणि मूळ प्रश्न यात संबंधच राहणार नाही. ही जी प्रक्रिया चालते त्याला आसन्नीकरण (ॲप्रॉक्झिमेशन) असे म्हणतात. ही प्रक्रिया कार्यावलीत



अनुक्रमणिका

मांडता येत नाही. दुसरा पैलू म्हणजे 'दिशा बदलण्याचा'. एका विशिष्ट प्रश्नाची उकल शोधताना एका टप्प्यावर शास्त्रज्ञाला असे कळून चुकते की, आतापर्यंत आपण ज्या मार्गाने विचार करीत होतो, तो मार्ग आपल्याला प्रश्नाचे उत्तर मिळवून देणारा नव्हे. आपण नव्याने व निराळ्या मार्गाने विचार केला पाहिजे, हा निर्णय घेण्याचा टप्पा आला आहे. याची उमज शास्त्रज्ञाला त्याच्या अनुभवावरून येते. हा निर्णय ही संगणकाच्या कार्यावलीत ग्रथित होणारा नव्हे.

सायमनने वैज्ञानिक संशोधनाची प्रक्रिया कार्यावलीच्या पद्धतीने मांडता येते असा दावा मांडला. तो किती बाबतीत चुकीचा ठरतो हे आपण पाहिले. इतके असले तरी त्या दाव्यात काही तथ्य नक्कीच आहे. ते असे की, वैज्ञानिक संशोधनाच्या प्रक्रियेत 'समस्या-उकल' या टप्प्याला महत्त्व आहे. तो टप्पा आपल्याला कार्यावलीच्या स्वरुपात ग्रथित करता येतो आणि त्या टप्प्याने सदृशीकरण घडविता येते. पण हे मान्य करतानाच आपण वैज्ञानिक विचार किती अस्वाभाविक आहे, याची कबूली देत असतो. सायमन प्रभृतींनी ज्या कार्यावली तयार केल्या आहेत त्या सहज समजुतीच्या (कॉमनसेन्स) क्षेत्रात बसणाऱ्या नाहीत. उदाहरणार्थ, 'हस्ताक्षर ओळखणे' हे साधारण मनुष्यालाही सहज असते; पण संगणकाला ते करता येत नाही. यावरून असे म्हणता येते की, संगणकाच्या ठिकाणी 'प्रतिभा' नावाची गोष्ट नाही.

५

प्रतिभा म्हणजे नक्की काय हे सांगणे अवघड असले, तरी विज्ञानाच्या क्षेत्रातीर थोर व सृजनशील अभ्यासक त्यांच्या' ठिकाणच्या काही गुणांवरून हमखास ओळखता येतात. या थोर शास्त्रज्ञांच्या विचारांची प्रक्रिया वेगाने चालते; ते फार कष्ट घेऊ शकतात, त्यांची कल्पकता असाधारण असते, त्यांचे ज्ञान, आकलन व अभिव्यक्ती या गोष्टी इतरांपेक्षा काही विशेष असते, ते आकडेमोड जल्दीने करतात; हे किंवा यातील काही गुण अशा थोर शास्त्रज्ञांपाशी असतात.

पण थोर किंवा श्रेष्ठ शास्त्रज्ञांची खूण म्हणजे समकालीन व भविष्यकालीन शास्त्रज्ञांवर त्याचा पडलेला प्रभाव आणि विज्ञानाच्या एक किंवा अधिक शाखांतील संशोधनाला त्याने दिलेले वळण. न्यूटन, डार्विन, आइनस्टाईन हे श्रेष्ठ शास्त्रज्ञ म्हणून गणले जातात. याचे कारण त्यांचा प्रभाव हे आहे. अखेर अमक्याच्या ठिकाणी प्रतिभा आहे असे आपण केव्हा म्हणतो? जेव्हा त्याची थोरवी व लौकिक ही कालावर मात करून टिकून राहते तेव्हा. जेव्हा एखादा शास्त्रज्ञ असा शोध लावतो की ज्याच्या योगाने जगाच्या घटनेविषयीचे एक थक्क करणारे आकलन माणसाला होते तेव्हा त्या शास्त्रज्ञाच्या ठिकाणी अलौकिक प्रतिभा आहे अशी मान्यता मिळते. काही लोक असे सांगतात की अखेर प्रतिभावंत हा बहुमान समाजातील सामर्थ्यशाली लोकांनी कुणाला तरी दिलेल्या बक्षिसासारखा असतो. आपण पाहतो की 'आंतरराष्ट्रीय ख्यातीचे शास्त्रज्ञ' असा काही लोकांचा उल्लेख वृत्तपत्रातून वारंवार होतो आणि मग लोकही त्यांना आंतरराष्ट्रीय ख्यातीचे शास्त्रज्ञ मानू लागतात. 'प्रतिभावंत' हे देखील अशा रीतीने समाजाने घडविलेले एक बुजगावणे असू शकते. पण पुष्कळदा हेही खरे असते की, प्रतिभावंतांची कामगिरी वस्तुनिष्ठ निकषांना उतरणारी असते.

वैज्ञानिक प्रतिभा ही इतर कोणत्याही क्षेत्रातील प्रतिभेपेक्षा निराळ्या प्रकारची असते कारण वैज्ञानिक कार्य हे केवळ व्यक्तिगत नसून ते वैज्ञानिकांच्या सांघिक उद्योगाचे फल असते. त्यामुळे, काही लोक म्हणतात की, प्रतिभावंत वैज्ञानिकांची गरजच उरणार नाही. पुरेशी साधनसामग्री आणि प्रशिक्षित व निष्ठावान शास्त्रज्ञांचा संघ उपलब्ध असेल तर कोणताही शोध लागू शकतो. ओर्टेगा नावाच्या विचारवंताने तर असा अभ्युपगमच मांडला आहे की, प्रयोगाधारित विज्ञानाची प्रगती सामान्य बुद्धीच्या माणसाच्या हातूनच आली आहे. सारांश असा की, विज्ञानातील शोध आणि प्रगती कोणा एका मनुष्याच्या अवतरण्या- न अवतरण्यावर अवलंबून नाही. न्यूटन मोठा शास्त्रज्ञ खरा; पण तो जन्मला नसता तरी ग्रहमालेचे कोडे उलगडले गेलेच असते. पण कालिदास नसता तरी 'मेघदूत' लिहिले गेलेच असते असे आपण म्हणू शकत नाही.

६

ग्रुबेर नावाचा एक नामवंत मानसशास्त्रज्ञ आहे. डार्विनला उत्क्रांतीची संकल्पना कशी सुचली याचा तपशीलवार अभ्यास ग्रुबेरने केला आहे. डार्विनचा पहिला शोध प्राण्यांच्या उत्क्रांतीविषयी नव्हताच; तो होता प्रवाळाचे खडक कसे तयार होतात याविषयी. १८३५ साली डार्विन

दक्षिण अमेरिकेच्या पश्चिम किनाऱ्यावर होता. तेव्हा त्याला कल्पना सुचली की, जमीन खचून समुद्र घडत असताना प्रवाळ उंच वाढले व पाण्यापासून वर आले. मात्र प्रवाळ पाण्याच्या वर कुठपर्यंत वाढणार हे ठरलेले असते. त्या मर्यादेच्या पलीकडे ते वाढत नाही.

उत्क्रांतीच्या दिशेने डार्विनने टाकलेले पहिले पाऊल म्हणजे 'मोनॅाड' नावाच्या एकपेशी जिवांची त्याने केलेली कल्पना. ही कल्पना कोणत्या परिस्थितीत उद्‌भवली त्याचा थोड्या विस्ताराने विचार केला पाहिजे. जिवांच्या ज्या जाती (स्पेसीज) असतात त्यांच्याविषयी त्या काळी अशी समजूत होती की, प्रत्येक जातीचे एक स्वत्व असते आणि त्या स्वत्वामुळे जातीत काही बदल होतील किंवा तिची उत्क्रांती होईल, अशी कल्पना करणे शक्य नव्हते. त्या वेळी ल्येल नावाचा एक भूशास्त्रज्ञ होता. प्राण्याच्या जाती कशा निर्माण झाल्या व काही जाती का नष्ट झाल्या याबद्दल त्याने बराच विचार केला होता. ल्येलचा असा विचार होता की, भवतालच्या हवामानात किंवा परिस्थितीत विपरित बदल घडल्याने किंवा इतर जातींशी चाललेल्या चढाओढीत टिकाव न लागल्याने त्या नष्ट झाल्या असाव्यात. नवीन जाती कशा निर्माण होतात याविषयी तो म्हणतो की, 'जिवांच्या जाती एकामागून दुसरी अशा क्रमाने जन्माला आल्या व काही ठरावीक काळ जगून नाहीशा झाल्या.' यास, 'जाति-जननाच्या विशेष सिद्धांत' असे म्हणतात. डार्विनची 'मोनॅड' ही संकल्पना या सिद्धांताचाच एक भाग होती. पुढे 'ओरिजिन ऑफ स्पेसीज' ह्या ग्रंथात मात्र वरील विशेष सिद्धांताच्या खंडनाकडेच डार्विनने अधिक लक्ष दिले. या उदाहरणावरून जाता, जाता हे सांगितले पाहिजे की, शास्त्रज्ञ ज्या काळात व वैचारिक वातावरणात काम करीत असतो त्या काळातील विचारसरणींचा परिणाम त्याच्या संशोधनावर होत असतो. ल्येलच्या प्रभावामुळे डार्विन 'मोनॅड' या संकल्पनेच्या आडरानात शिरला. पण ही तत्कालीन विचारप्रणाली व तिचा प्रभाव संशोधनाची कार्यावली तयार करताना लक्षात घेतली जात नाही.

१८३७ मध्ये मोनॅड ही संकल्पना डार्विनने सोडून दिली व एक प्रकारे जीवसृष्टी कशी जन्माला आली हा प्रश्नच त्याने बाजूला ठेवला, पण हे केल्यामुळे त्याच्या पुढचा प्रश्न म्हणजे जातींचे स्वरूपांतरण कसे होते - पुष्कळच सोपा झाला. १८३८ सालीच डार्विनने हे झालेले सुलभीकरण स्पष्टपणे मांडले आहे. तो लिहितो, 'इतिहासात फार मागे जाण्यात काही तथ्य नाही. तसे मी करत गेलो तर मला 'पहिला डोळा कसा निर्माण झाला, शरीरातला कोणता मज्जातंतू प्रकाशाच्या बाबतीत संवेदनशील कसा झाला' अशा प्रश्नांची उत्तरे शोधावी लागतील व ते करणे अशक्य आहे.'

हे सर्व सांगताना हेतू असा आहे, की डार्विनच्या संशोधनात भूलभूलैय्या (फॉल्स स्टार्टस्) वेगवेगळ्या टप्प्यावर निर्माण झाले. मोनॅड ची संकल्पना हा पहिला भूलभुलैय्या होता. जिवांच्या उत्पत्तीच्या आदिम क्षणापर्यंत जाण्याची आकांक्षा धरणे हा दुसरा भूलभुलैय्या होता. जातींना सत्व असते व त्यामुळे त्या बदलू शकत नाहीत ही समजूत हा तिसरा भुलभुलैय्या. जातींचे स्वरूपांतरण (ट्रान्सम्युटेशन) हे मानल्यानंतर त्या स्वरूपांतरणाची यंत्रणा (मेकॅनिझम) शोधण्याच्या प्रयत्नाला लागणे ही चौथी दिशाभूल होती. या चुकभुलीतून बाहेर पडताना डार्विनला विलक्षण धैर्याचा एक निर्णय घ्यावा लागला. तो असा की, स्वरूपांतरण होते हे स्पष्ट आहे; ते होण्यामागची यंत्रणा माहीत नाही. हरकत नाही. स्वरूपांतरणाचा सिद्धांत मांडताना त्या यंत्रणेचा उलगडा केलाच पाहिजे असे नाही. न्यूटनच्या बाबतीतही तेच घडले होते. त्यालाही गुरुत्वाकर्षण का निर्माण होते, हे माहीत नव्हते. पण त्याने, तेवढ्यासाठी गुरुत्वाकर्षणाचा सिद्धांत मांडण्याचे लांबणीवर टाकले नाही.

डार्विनच्या संशोधनात किती भूलभुलैये आले ते आपण पाहिले. या संशोधनासाठी डार्विनने अनेक वर्षे घालविली. इतके सारे झाल्यावर जर डार्विन कोणत्याही निष्कर्षापर्यंत पोचू शकला नसता किंवा त्याचा उत्क्रांतीचा सिद्धांत चुकीचा ठरला असता, तर डार्विनचे आयुष्य व्यर्थ ठरले असते. मोठ्या कामामागे लागून परिश्रम करण्यातही मोठा धोका असतो. एक प्रकारचा झपाटलेला असल्याखेरीज शास्त्रज्ञ असे भव्य प्रकल्प हाती घेत नाहीत. संशोधन व्यर्थ गेल्याची उदाहरणे विज्ञानाच्या इतिहासात काही थोडी नाहीत. त्यामुळे बरेच शास्त्रज्ञ साविधगिरी दाखवून असाच प्रश्न हाती घेतात की त्या विषयींच्या शोधातून काही ना काही तरी हटकून हाती लागेल.

७

आपण ओटंगा या विद्वानाने मांडलेल्या अभ्युपगमाची माहिती वर घेतली आहे. या अभ्युपगमाचा मतितार्थ असा आहे की, वैज्ञानिक शोधासाठी प्रतिभा लागतेच

अनुक्रमणिका






असे नाही. विज्ञानाची बहुतेक प्रगती सामान्य बुद्धीच्या संशोधकांकरवीच झाली आहे. या अभ्युपगमाचा एक खुलासा थॉमस कुन्ट या विज्ञानाच्या इतिहासकाराने जो विचार त्याच्या 'द स्ट्रक्चर ऑफ सायंटिफिक रिव्हॉल्युशन' या ग्रंथात मांडला आहे, त्यावरून होऊ शकते. कुन्टचा विचार असा आहे की, विज्ञानाची बरीचशी प्रगती ज्याला तो 'प्राकृत विज्ञानाचा कालखंड' असे म्हणतो त्यात होते. प्राकृत विज्ञान म्हणजे असे विज्ञान की जे त्या काळी प्राकृत असणाऱ्या महत्त्वाच्या संकल्पनांच्या छायेत वावरते. उदा. न्यूटनने गुरुत्वाकर्षणाचा सिद्धांत मांडून वस्तूंच्या गतिशास्त्राची व्यवस्था लावली. ही व्यवस्था कायम धरून वैज्ञानिकांनी खूप नवे संशोधन केले. नेपच्यून, प्लुटो, यांच्यासारखे ग्रह शोधून काढले. गुरुत्वाकर्षणाच्या सिद्धांताला मानून हे जे संशोधन झाले त्याला प्राकृत विज्ञान असे म्हणता येईल. हे प्राकृत विज्ञान दोन-सव्वादोन शतके प्रगती करत राहिले. त्यानंतर आईनस्टाईनचा 'सापेक्षतेचा महासिद्धांत' आला. तेव्हा न्यूटनच्या सावलीत चाललेले 'प्राकृत विज्ञान' संपले व नवीन क्रांतिकारी शोधाच्या अंमलाखालील नवे प्राकृत विज्ञान सुरु झाले. न्यूटन, आईनस्टाईन, डार्विन असे शास्त्रज्ञ हे क्रांतिकारक शास्त्रज्ञ होत. बाकीचे त्यांच्या अधिपत्याखाली शोध लावणारे शास्त्रज्ञ हे पठडीतले शास्त्रज्ञ होत. ओर्टेगाच्या अभ्युपगमात पठडीतील शस्त्रज्ञांचे कार्य देखील महत्त्वाचे व प्रगती घडवून आणणारे असते, ह्यावर भर दिला आहे. प्रश्न असा विचारला जाईल की, काही शास्त्रज्ञ पठडीतील संशोधनावर समाधान का मानतात? तेही क्रांतिकारी महासिद्धांताचा शोध लावण्यासाठी का धडपडत नाहीत? याला उत्तर दोन प्रकारचे आहे. पहिले असे की, विज्ञानक्षेत्रातील त्यावेळची परिस्थिती क्रांतिकारी महासिद्धांताच्या स्थापनेस अनुकूल असेलच असे नाही. उदा. न्यूटनच्या गतिशास्त्राच्या सर्व गर्भितार्थांचे (इंप्लिकेशन्स) उच्चारण झाले नसताना त्या गतिशास्त्राचे उच्चारण करील असा नवा महासिद्धांत स्थापन होणार नाही. दुसरे हे की, अशा महासिद्धांताची कल्पना सुचणे ही फार अवघड गोष्ट असते.

बऱ्याच शोधांच्या बाबतीत असे आढळते की, ते दोन किंवा अधिक शास्त्रज्ञांना एकाच वेळी लागलेले असतात. डार्विनने 'निसर्गाच्या निवडीतून उत्क्रांती' या तत्त्वाचा शोध लावला त्या सुमारास वॅलेस नावाच्या शास्त्रज्ञालाही तोच सिद्धांत सुचला होता. डीएनए मध्ये जी अॅमिनो आम्लाची क्रमवारी असते तिचा शोध गिल्बर्ट व मॅक्झॅम हे हार्वर्डचे शास्त्रज्ञ आणि सँमर हा केंब्रीजचा शास्त्रज्ञ यांना एकाच वेळी लागला. अशी आणखीही उदाहरणे देता येतील. शोधांची ही जी आवृत्ती होते याचे कारण असे दिले जाते की, विज्ञानाच्या प्रगतीत शास्त्रज्ञाची भूमिका तुलनेने गौण असते. विज्ञानाच्या संबंधिक क्षेत्रात त्या वेळी उपलब्ध असणाऱ्या ज्ञानातच अशी काही घुसळण चाललेली असते की, तो विशिष्ट शोध लागणे अटळ असते. या विवेचनाचा गर्भितार्थ असा आहे की, शोधासाठी प्रतिभाशाली शास्त्रज्ञांची गरज असतेच असे नाही.

काही शोधांच्या बाबतीत असे म्हणण्यास वाव असतो, की तो शोध काही योगायोगाने लागला. फ्लेमिंगला लागलेला पेनिसिलीनचा शोध, बॉकरेलने लावलेला किरणोत्सर्गाचा शोध ही अशा शोधांची काही उदाहरणे. पण अशा शोधांचेही तपशीलवार विश्लेषण केले तर आपणास असे आढळून येईल की, शास्त्रज्ञाचे कष्ट व परिश्रम आणि त्याचा दांडगा अभ्यास यांचा वाटा या संशोधनात मोठा होता. योगायोगाची भूमिका केवळ दुय्यम होती. लुई पाश्चर हा बहिःपूरित आम्ल या रसायनाचा अभ्यास करीत होता. त्याने या आम्लाचे स्फटिक बनविले आणि सूक्ष्मदर्शकाखाली तपासले. तेव्हा असे आढळले की या स्फटिकांचे दोन प्रकार आहेत. पहिल्या प्रकारातील स्फटिक हे दुसऱ्या प्रकारातील स्फटिकांच्या आरशातील प्रतिबिंबाप्रमाणे आहेत. आपले डावे-उडवे हातही असेच प्रतिबिंबासारखे असतात. त्यामुळे त्याने स्फटिकांचा या वर्गांना डावे-स्फटिक व उजवे स्फटिक अशी नावे दिली होती. पास्तर पूर्वी अनेक वैज्ञानिकांनी या स्फटिकांचा अभ्यास केला होता; पण त्यांच्या ध्यानात ही वर्गवारी आली नव्हती. पाश्चरच्या या शोधामुळे रेणूंच्या रचनेच्या अभ्यासात मोठा बदल घडून आला. यात योगायोगाचा भाग म्हणून आता सांगितला जातो की, बहिःपूरित आम्लाची जी विशिष्ट जाती पाश्चर तपासत होता तिच्याच बाबतीत स्फटिकांचे हे वर्ग आढळून येतात; व तेही २६ सेंटिग्रेडपेक्षा कमी तपमान असेल तेव्हाच! पाश्चर नशिबवान असल्याने हे सर्व घटक एकत्र आले! पण ते विशिष्ट स्फटिक पाश्चरच्या आढळात आले हा जर योगायोग म्हणायचा, तर पाश्चरने बहिःपूरित आम्लांचा अभ्यास सुरू केला, त्याच्यापाशी सूक्ष्मदर्शक यंत्र होते इत्यादी गोष्टी देखील योगायोगाची गमके म्हणून मानाव्या लागतील.

याउलट विपरित योगायोगांच्या हकीकतीही थोड्या





नाहीत. एखाद्या निरीक्षणाचे महत्त्व वैज्ञानिकाला वाटले नाही व त्यामुळे महत्त्वाचा शोध राहून गेला असेही घडले आहे. लंबकाच्या आंदोलना विषयीचा नियम ॲरिस्टॉटलला सुचण्यास काहीच हरकत नव्हती. तो शोध ॲरिस्टॉटलला लागला नाहीच; पण त्यानंतर दोनहजार वर्षेदेखील कोणाला सुचला नाही. गॅलिलिओला तो शोध लागला! तेव्हा विज्ञानातील शोधांच्या बाबतीत नशीब, योगायोग अशा घटकांवर भर देण्यात हशील नाही. आपल्याभोवती असंख्य घटना सतत घडत असतात. त्यातील महत्त्वाच्या घटना टिपून त्यांचा खुलासा देण्यात शास्त्रज्ञाचे कौशल्य दिसून येते.

टीप - लुईस वोल्पर्ट हे नामांकित शास्त्रज्ञ व विज्ञान-प्रसारक आहेत. विख्यात 'रॉयल सोसायटी'चे ते सभासद आहेत. त्यांनी 'दि अनॅचरल नेचर ऑफ सायन्स' हे पुस्तक १९९२ साली लिहिले. ते लंडनच्या 'फेबर ॲण्ड फेबर' या प्रकाशकांनी प्रसिद्ध केले. त्या पुस्तकाचा परिचय करुन देणाऱ्या लेखमालेतील हा चौथा लेख आहे.



## ईश्वरसाक्षात्कार और चमत्कार

यहाँ पूछा गया कि, 'क्या हम भगवान का रूप अपनी आँखों देख सकते है?' सचमुच सवाल बहुत बड़ा है, लेकिन उसका उत्तर है, अति सरल। भगवान् अव्यक्त है और व्यक्त भी। साकार है और निराकार भी। ईश्वर है और नहीं भी। वह सगुण है और निर्गुण भी, सब प्रकार का है। यों तो जो विश्व सामने खड़ा है, सारा भगवान् का रूप ही है। लेकिन हम उसे उस प्रकार पहचान नहीं पाते। अपने चर्मचक्षुओंसे ऊपरी ढाँचा, आकारमात्र देखते है। अंतर का तत्त्व नहीं।

इसके अतिरिक्त ध्यान में मनुष्य की जैसी वासना होती है, तदनुसार भगवान उसे वैसा रूप दिखाता है। उपासकों ने अपने चित्त की एकाग्रता और इंद्रियों के आकर्षण से छूटने के लिए ध्यान की कल्पना की है। कोई चतुर्भुज विष्णु भगवान् का, कोई कृष्णचन्द्र का, कोई रामचन्द्र का, तो कोई ईसा का ध्यान करते और उस रूप में भगवान् को मानते है। कोई इस रूप का तीव्र ध्यान करता हो, रात-दिन उसका चिन्तन, मनन, भावन करता हो, तो उसके समाधानार्थ ध्यानावस्था में भगवान् वह रूप लेकर आ सकते है और इस तरह उसका समाधान हो सकता है।

उसे भगवद्-रूप का दर्शन हुआ या नहीं, इसकी दूसरों को कल्पना नहीं आ सकती। लेकिन ध्यान-समाप्ति के बाद उसका जो व्यवहार होगा, उस पर से लोगों को इसका पता चलेगा। अवश्य ही उसने अपनी कल्पना का ही ईश्वर देखा, परिपूर्ण नहीं। फिर भी उतने से भी उसके चित्त का रूप बदल जायगा। जिसका चित्त भगवद्दर्शन-प्राप्त, उससे स्पृष्ट रहेगा· उसके जीवन में प्रेम और करुणा देखने को मिलेगी।

चमत्कारों का मैंने काफी परीक्षण-निरीक्षण किया है। उनमें जो गुणविकासजन्य होते है, वे ही सही होते हे, लाभदायी और यौगिक होते हैं; बाकी सारे काल्पनिक। इनमें कुछ आश्वासनात्मक भी होते हैं, इसलिए लाभदायी होते है। कुछ नुकसान करनेवाले भी होते है। इसलिए गीता में श्रद्धा को सात्त्विक, राजस और तामस तीन भूमिकाओं में बाँटा गया है। ज्ञानदेव ने कहा है : श्रद्धा म्हणून पाते जो नये - यानी श्रद्धा कहनेमात्र से एकदम विश्वास मत करो, क्योंकि वह बेभरोसे की है। जैसे बुद्धी को त्रिविध कहा गया, वैसे ही श्रद्धा को भी त्रिविध माना गया है। मैंने जो अपनी चार शर्ते, कसोटियाँ रखी है, उन पर वह चमत्कार टिक गया, कसा गया तो ठीक, नहीं तो वह आश्वासनमात्र ही है। इतना ही कि 'आया और चला गया।'

चमत्कारों के बारे में अपना यही रुख है कि चमत्कार की एक डिक्शनरी बना दें, पर उसका विस्तार कभी न करें। 'चाबुक मारा जा रहा था भैसे को, पर उसका घाव हुआ ज्ञानदेव की पीठ पर।' ऐसे चमत्कार तो मैं मानने को राजी हूँ, क्योंकि समझ सकता हूँ की करुणा के कारण ज्ञानदेव के चित्त की भैसे के चित्त के साथ इतनी एकरूपता हुई कि उसका उन पर असर हुआ, जो करुणामूलक था। लेकिन 'एक दीवार थी, ज्ञानदेव उस पर बैठ गयेऔर दीवार घूमने लगी' यह मुझे नहीं जँचता। आखिर दीवार पर बैठकर चलने में क्या चमत्कार है? सामान्य ट्रेन भर-भर चलती है, क्या वह कम चमत्कार है? आज के लिए वह कौन-सी बड़ी बात है? उसका मुझे कतई आकर्षण नहीं। सामनेवाला शेर पर बैठकर आये तो उसका भी मुझे कुछ आकर्षण नहीं। लेकिन यह दीवार पर चढ़कर चलने का बिलकुल ही आकर्षण नहीं। शेरवाले का आकर्षण इसलिए कि उसने शेर को अपनाया, यानी वश में कर लिया। यह संभव है, असंभव नहीं।

विनोबा : अध्यात्म तत्त्वसुधा (पृ० ५३ ते ५६)






ग्रंथपरिचय

# चक्रीवादळ : वास्तवतेचे विदारक चित्र

डॉ० मीरा धांडगे

पाश्चात्य साहित्याच्या प्रभावातून विकसित झालेला 'कादंबरी' वाङ्मय प्रकार मराठी साहित्यात वेगवेगळ्या परिवर्तनातून अवतीर्ण झाला. 'सामाजिक वास्तव' हाच कादंबरीच्या निर्मितीचा मूळ गाभा असल्यामुळे ही परिवर्तने कादंबरीने अत्यंत तोलाने पेलली आणि अत्यंत सक्षमपणे साहित्यात मांडली. सामाजिक आशयाच्या माध्यमातून सामाजिक जीवनातील विविध समस्यांवर 'कादंबरी' लिहिली गेली. बाबा पद्मनजींच्या 'यमुना पर्यटन' (१८५७) पासूनच्या या प्रवाहात स्त्रीशिक्षण, बालविवाह, विधवाविवाह, जुन्या रूढी-परंपरा विरुद्ध व्यक्तिस्वातंत्र्य यासारख्या व्यक्तिनिष्ठ वा कुटुंबनिष्ठ विषयांबरोबरच सामाजिक अर्थव्यवस्थेचा ढळलेला तोल, त्यातून निर्माण होणारे प्रश्न, शेती, खेडे यांच्यात होणारी स्थित्यंतरे यांचा छेद घेत सामाजिक गतिमानतेची प्रचिती देणारी कादंबरी व्यक्तिकेंद्रीत, समाजकेंद्रीत, प्रसंगकेंद्रीत झालेली दिसते.

आजच्या विज्ञान-तंत्रज्ञानाच्या युगात मानवानेच निर्माण केलेल्या शोधातून एकूणच व्यवस्थापनाचे विश्व अत्यंत गुंतागुंतीचे आणि समजण्यापलिकडचे बनले आहे. विज्ञानाच्या माध्यमातून माणूस जितका पुढे येण्याचा प्रयत्न करतो तितके त्याचे स्वत:वरील नियंत्रण सुटत असलेले दिसते- साहजिकच त्यातून तो अत्यंत असाह्य, दुबळा, निराधार व एकाकी बनलेला दिसतो. या सर्व परिस्थितीतून माणूस आपली प्रस्थापित मूल्ये, श्रद्धा व व्यवस्था नाकारतो. मर्ढेकरांच्या म्हणण्याप्रमाणे आजच्या समाज व्यवस्थेतील माणूस उंदरा-मुंग्याप्रमाणे बनला असून त्याला कोणाचाही आधार राहिलेला नाही. विज्ञानाच्या प्रगतीबरोबरच मानवी रोजचे जगणे मात्र अस्तित्त्वाच्या अंधाऱ्या, अनिश्चित आणि सरकत्या वाळूत पाय घट्ट रोवून येणाऱ्या अनभिज्ञ वर्तमानाला सामोरे जावे लागणारे असेच आहे. आधुनिक काळातील मानवी वर्तमान जीवनात एक विस्तीर्ण भयानक पोकळी निर्माण झाल्याचे पडसाद वाङ्मयातून, विशेषत: कादंबरीतून दिसू लागलेले दिसतात. मानवी जीवनाच्या प्रवाहाबरोबर बदलत जाणाऱ्या कादंबरीचा घटना, कथानक, पात्रे, निवेदक, भाषा इ. घटकामधून रूपबंध बनलेला दिसतो. यापैकी एखादी घटनाच कादंबरीच्या केंद्रस्थानी होते आणि त्यामुळे कादंबरीचे रुप बदलते. त्या घटनेतून विविध पात्रे, प्रसंग यांची साखळी तयार होते व विस्तृत असा पट तयार होतो. घटनाच कादंबरीच्या निर्मितीचे साधन बनते.

'रारंग-ढांग' या कादंबरीमुळे सुपरिचित असलेल्या प्रभाकर पेंढारकरांची 'चक्रीवादळ' ही कादंबरी अत्यंत हृदयस्पर्शी वास्तवतेचे भयावह रूप सिद्ध करणारी आहे. १९ नोव्हे. १९७७ या दिवशी आंध्रच्या सागर किनाऱ्यावर चक्रीवादळ, मुसळधार पाऊस आणि जमिनीवर पसरलेली सागराच्या भरतीची चाळीस फूट उंचीची लाट. या सर्वांमधून कोसळलेली भीषण आपत्ती, या आपत्तीमुळे पसरलेला हाहा:कार ही घटना या कादंबरीचा विषय आहे. या अस्मानी संकटात मदतीला आलेल्या विविध संस्था, सरकार, त्याचबरोबर सामान्य नागरिक या सर्वांचीच मानसिकता या कादंबरीतून चित्रित झालेली दिसते. आजच्या विज्ञान युगात निसर्गाच्या विविध परिवर्तनाचा आणि हवामानाचा शोध लागत असतानाही हे अस्मानी संकट अत्यंत भयावह, प्रचंड हानिकारक आहे हे जाणूनही वैज्ञानिक संशोधकांची हातबलता, निसर्गापुढे विज्ञानाची शक्ती दुर्बल ठरते हे सिद्ध करते.

या संकटाच्या माध्यमातून मानवी मनाच्या विविध प्रवृत्ती, फिनिक्स पक्षाप्रमाणे निसर्गाच्या आपत्तीतून आत्मविश्वासाने आणि संयमाने उभे राहण्याची एकजूटीची ताकद संपूर्ण कादंबरीतून दिसू लागते. संकटावर मात करीत जगण्याची आणि जगविण्याची मानवी प्रवृत्ती बळ घेताना दिसते.

आंध्र प्रदेशाला लाभलेल्या सागर किनाऱ्यात पाऊस, भरती, वादळ आणि प्रचंड लाटा यांचा परिचय होता. त्यामुळे या लाटेचे गांभीर्य सहजतेने लक्षात येणे स्वाभाविक वाटते. या लाटे पूर्वीच्या काही घटना, एकूणच आलेल्या प्रसंगाकडे अत्यंत अलिप्तपणे पाहण्याची प्रवृत्ती दिसते. आयुष्याची तीस वर्षे रेल्वेच्या नोकरीत घालवलेला डिसिल्व्हा, त्याचा सहाय्यक

अनुक्रमणिका

फर्नांडिस किंवा कायम समुद्रावर राहणारे, समुद्राशीच संवाद करणारे, ब्रिटिश नेव्हिगेशन कंपनीचे कार्गोशिवाय जहाजावरील वर्षानुवर्षे समुद्राची विविध रूपे पाहिलेले, अनेक सुनामी अनुभवलेले कॅप्टन रॉस यांची मानसिकता, धैर्य यांचे दर्शन घडते. त्याचबरोबर कोमाली खेड्यातील पोचय्या आणि त्यांची पत्नी या भीषण पावसात गावातील शंभर वर्षांपूर्वी बांधलेल्या चर्चच्या इमारतीत निवाऱ्याला येणाऱ्या सर्व गावासह गाडले जातात. शाळा सुटल्यानंतर शाळेत थांबलेल्या हेडमास्तरांसमोर त्यांच्या मुलासह इतर मुले वाहून जाताना पाहण्याची वेळ येते. नवऱ्याच्या काळजीने अस्वस्थ झालेली सुबम्मा पोटच्या पोरासाठी रडू लागते. समुद्राची सर्व रूपे पाहिलेला अत्यंत धाडसी, हुशार, कसबी मच्छिमार अंजय्याला समुद्राच्या भीषण रौद्र रूपातून पत्नीला (सीतम्माला) वाचविता आले तरी स्वत:ला वाचविता येत नाही. यासारखे अनेक प्रसंग अस्वस्थ करतात.

त्याबरोबरच गाडीतील दीड-दोन हजार प्रवाशांना सुखरूप पुढच्या स्टेशनपर्यंत पोहोचवायचच, या जिद्दीने स्वत:ला व सहाय्यकाला सावरणारा डिसिल्व्हा, आईला नातू पहायचा आहे, म्हणून सीतम्माला सांभाळताना स्वत:चा प्राण गमावणारा अंजय्या, जहाजावरील सर्वांना जगण्याचा धीर देणारा धाडसी कॅप्टन रॉस, हेडमास्तर यासारख्या अनेक व्यक्तींची मानसिकता अंतर्मुख करते.

आलेल्या संकटाला कोणत्याही मतभेदाशिवाय, स्वत:चे अस्तित्त्व विसरून, सहकार्याची भावना विविध पातळीवरून व्यक्त होते. कॉलेजमध्ये शिकणाऱ्या विद्यार्थ्यापासून ते तुरुंगातील कैद्यांपर्यंत आलेले मदतीचे हात, त्यामागील मानवी संवेदना अत्यंत मार्मिकपणे कादंबरीतून आली आहेत. राजकीय व्यक्तिमत्त्वापासून सर्वसामान्य माणसांपर्यंतच्या प्रवृत्तीचे पडसाद स्पष्टपणे व्यक्त होतात. भरतीच्या लाटेमुळे मेलेल्या माणसांची आणि जनावरांची व्यवस्था लावण्याचे काम स्वीकारताना, तुरुंगाच्या बाहेर पडून आपली सुटका करता येईल या आशेने या कामासाठी तयार झालेले कैदी, तुरुंगाच्या बाहेरील मृत्यूचे थैमान पाहून ते विसरण्याचे पर्याय शोधू लागतात. विद्यापीठात शिकणारे विद्यार्थी केवळ समाजकार्य म्हणून या परिसरात येतात. पण हृदय पिळवटून टाकणारे दु:ख, स्वत:चे अस्तित्त्व पुसून गेलेला स्मशान - परिसर पाहून अत्यंत अस्वस्थ होतात. घडलेल्या घटनेचे विदारक वास्तव समाजासमोर व शासनासमोर येणे गरजेचे आहे म्हणून घरात ठेवलेले इमर्जन्सी फिल्म वापरून न्यूजरील करावयाचा आग्रह करणारी भास्कर अय्यरची पत्नी जानकी, नऊ महिने भरलेल्या सीताम्माला आणि अनाथ मुलांना साभाळण्यासाठी स्वत:चे करीयर विसरणारी मधू, संकटात अडलेल्यांना आसरा देणारे, धीर देणारे, अत्यंत आपलेपणाने आपल्या मिशनमध्ये सांभाळणारे स्वामीजी दिसतात. या सारख्या व्यक्तिचित्रांबरोबरच परिस्थितीचा फायदा घेऊन मुलांना विकण्याची प्रवृत्तीही दिसते. मानवी स्वभावाच्या, विविध वृत्ती - प्रवृत्तीचा शोध या कादंबरीतून होतो, गरीब- श्रीमंत इ. भेदाभेद टाळून केवळ माणुसकीचे विविध पैलू स्पष्ट होतात. अपरिहार्य पण दुर्दम्य संकटावर मात करण्यासाठी उभे राहिलेले लहानांपासून ते मोठ्यांपर्यंतचे हात एका भयाण रौद्र वास्तवासाठी सामोरे जाण्याची ताकद व्यक्त करतात.

कोणत्याही प्रकारच्या मानवी आपत्ती पेक्षा हा नैसर्गिक हल्ला सगळ्या सत्तेचा, साम्राज्याचा फोलपणाच स्पष्ट करणारा दिसतो. या सारख्या सातत्याने येणाऱ्या संकटांना जिंकण्यासाठी घरांच्या नव्या रचना, उपाययोजना सुचविणारे फ्रेड क्यूनी, राजकीय पातळीवर होणारी चर्चा, मंत्र्यांचे दौरे, प्रत्यक्षात मिळणाऱ्या मदतीचे स्वरूप कळिाचे प्रतिनिधीत्त्व करते. म्हणून एका वास्तव प्रसंगाची विदारक काहाणी कादंबरीचा केंद्रबिंदू बनते. वादळे, पूर, भुकंप इ. नैसर्गिक किंवा अनेक स्वरूपाच्या मानवी आपत्ती या मानवी जगण्याचा अविभाज्य भाग बनलेला आहे. त्यामुळेच पंचवीस वर्षांपूर्वीच्या चक्रीवादळाचे वर्णन त्यानंतर आलेल्या अशाच असाह्य संकटाने ताजे होते. आणि अंतर्मनात या संकटांची तुलना होऊन, पुन्हा-पुन्हा येणाऱ्या संकटाची मालिकाच मन:पटलावर तयार होते. त्यामुळेच या कादंबरीतील वास्तव हृदय पिळवटून टाकते. कादंबरीत असलेली रेखाटने अत्यंत बोलकी, विषयाच्या तीव्रतेत आणि वास्तवतेत भर घालणारी आहेत. म्हणून ही कादंबरी फक्त एका चक्रीवादळाचे चित्रण करणारी राहात नाही तर अनेक संकटातून निष्पन्न होणाऱ्या परिस्थितीचे प्रतिनिधित्त्व करणारी ठरते. साहजिकच तिचा परिणाम अत्यंत खोलवर होतो. कादंबरीचे रचनातंत्र, घटनांची मांडणी यापेक्षा तिच्या एकत्रित होणाऱ्या परिणामातच या कादंबरीचे यश आहे, हे मान्य करावे लागते.

❖❖❖

अनुक्रमणिका

# समाज परिवर्तनाची पुढील दिशा

श्रीकांत कारंजेकर

आज सामाजिक परिवर्तनाची चळवळ एका कुंठितावस्थेत सापडली आहे. या चळवळीचा अविभाज्य भाग असलेले स्वयंस्फूर्त कार्यकर्ते एक प्रकारची दिशाहीनता अनुभवत आहेत. स्वयंस्फूर्त संस्थांच्या (voluntary organizations) कार्याबद्दल प्रश्नचिन्ह उभे राहिले आहे. गेल्या ५०-६० वर्षांमध्ये अनेक प्रकारच्या स्वयंस्फूर्त संस्था समाजपरिवर्तनाचे कार्य चांगल्या प्रकारे करीत होत्या. त्या संस्थांचा ध्येयवाद हळूहळू लोपत चालला आहे. संस्थांचे विघटन होत आहे. या क्षेत्रामध्ये, कार्य करणाऱ्या अस्सल (genuine) कार्यकर्त्यांची व संस्थांची भर पडत नसून एकूणच मरगळलेले वातावरण निर्माण झाले आहे. आणि सामाजिक कार्यकर्ते आपली परिणामकारकता हरवून बसले आहेत.

हे सर्व बघून सामाजिक परिवर्तनाच्या चळवळीची व संस्थांची सध्या नेमकी काय गरज आहे, असे मत काही जण व्यक्त करीत आहेत. या संदर्भात परिवर्तनवाद्यांची चळवळ व स्वयंस्फूर्त संस्था याबद्दलचे असलेले सर्वसाधारण आक्षेप नमूद करु या.

परिवर्तनवादी चळवळ (विशेषत: पर्यायी विकासाची चळवळ) ही विकासविरोधी आहे. आपल्या देशाचा विकास व्हायला नको यासाठी परकीय शक्तींचे परिवर्तनवादी हस्तक आहेत. स्वयंस्फूर्त संस्था व स्वयंस्फूर्त कार्यकर्ते ही परदेशी पैशावर पोसलेली बांडगुळे आहेत. सरकारने जेव्हापासून विकासकार्याच्या अंमलबजावणीमध्ये स्वयंस्फूर्त संस्थांना (एन.जी.ओ.) सहभागी करून घ्यावयाचे ठरविले, तेव्हापासून स्वयंसेवी संस्था पावसाळी छत्रीसारख्या सगळीकडे उगवल्या आहेत. त्या शासकीय कंत्राटदार झाल्या आहेत. भ्रष्टाचाराचे अड्डे झालेल्या आहेत. स्वयंसेवी संस्थांमध्ये काही ध्येयवाद उरला नसून त्या चंगळवादी झाल्या आहेत. पुरोगामी व इहवादी चळवळ येथील उच्च संस्कृती, परंपरा व धर्म (विशेषत: भारतामध्ये हिंदू धर्म) यांचा अधिक्षेप करणारी असल्यामुळे, ती राष्ट्रवादी नाही. स्वयंस्फूर्त कार्यकर्त्यांची आज काही आवश्यकता नाही. त्यामुळे स्वयंस्फूर्त संस्था बंद केल्या तरी समाजाचे काही बिघडणार नाही, इत्यादी.

या आक्षेपांच्या संदर्भात परिवर्तनवादी चळवळ व स्वयंस्फूर्त संस्था यांचा विचार आपण करणार आहोतच. पण त्याआधी हे स्पष्ट केले पाहिजे की परिवर्तनवादी चळवळ व स्वयंस्फूर्त कार्यकर्ते म्हणजे डावी चळवळ व डाव्या विचारसरणाचे स्वयंस्फूर्त कार्यकर्ते या अर्थाने येथे मला अभिप्रेत आहेत. मी डावी विचारसरणी याचा अर्थ व्यापक स्वरुपात घेऊ इच्छितो. तिच्यामध्ये लोकशाही - समाजवादी, साम्यवादी, फुले - आंबेडकरवादी, गांधीवादी, पर्यावरणवादी, सर्वेदयी, पर्यायी विकासवादी, मानवतावादी, इहवादी, स्त्रीवादी या सर्वांचा समावेश करता येऊ शकेल.

या व्यापक परिप्रेक्ष्यामध्ये बघितल्यास एक प्रश्न समोर येतो की, फक्त आत्ताच परिवर्तनवादी चळवळ अस्तित्त्वात आली काय, याआधी समाज परिवर्तन होत नव्हते काय? तेव्हा हे स्पष्ट केले पाहिजे की परिवर्तन हा फक्त मानवी समाजरचनेचा गुणधर्म नसून संपूर्ण सृष्टीमध्ये व्यापक प्रमाणावर परिवर्तन होत असते. (उत्क्रांतीची प्रक्रिया ही एका अर्थाने परिवर्तनाची प्रक्रिया आहे आणि उत्क्रांतीचे नियम व्यापक संदर्भामध्ये सृष्टीतील, भौतिक, रासायनिक, जैविक या सर्व प्रक्रियांना लागू आहेत.) परंतु मानवी समाजरचनेच्या इतिहासातील कोणत्याही कालखंडापेक्षा या समकालीन कालखंडामध्ये परिवर्तनाची प्रक्रिया जाणीवपूर्वक जागतिक बनलेली आहे. त्यामुळे वैश्विक परिप्रेक्ष्यामध्ये आपण सध्याच्या समाजव्यवस्थेच्या वाटचालीचा विचार करु या.

जागतिक समाजरचनेच्या शेवटच्या मोठ्या हिमयुगा-नंतरचा १०००० वर्षांचा इतिहास तपासून बघितला तर हे लक्षात येईल की पाळीव प्राणी व शेतीचा शोध या दोन बाबींमुळे व्यापक प्रमाणावर परिवर्तन घडून आले. कंदमुळे-फळे गोळा करणाऱ्या व शिकार करणाऱ्या, भटक्या टोळी

समाजापासून एका ठिकाणी वस्ती करून राहणाऱ्या समाजामध्ये त्याचे परिवर्तन झाले. खेडी वसवली गेली. नगरराज्ये स्थापन झाली. त्यानंतरचे एक मोठे परिवर्तन औद्योगिक क्रांतीच्या रूपाने अवतरले. स्वस्त अश्मीभूत इंधनाचा वापर व त्यावर आधारित कारखानदारी यामुळे समाजाचे झपाट्याने नागरीकरण व शहरीकरण झाले. तंत्रवैज्ञानिक प्रगतीमुळे आज संपूर्ण जग हे वैश्विक ग्राम झाले असून कधी नव्हे तो या पृथ्वीतलावरील कोणताही माणूस किंवा समाज जागतिक अर्थ-राजकारणापासून अलिप्त राहू शकत नाही अशी अवस्था आली आहे. प्रत्येक माणसाचे आरोग्य हे ग्रहीय आरोग्याशी (planetary health) घट्टपणे निगडित झाले आहे.

## आजचे विनाशकारी संकट व परिवर्तनवाद्यांना नेमके काय हवे आहे?

आज जागतिक स्तरावर समाजरचना अभूतपूर्व अशा संकटात सापडली आहे. पृथ्वीतलावरील सजीवांच्या उत्क्रांतीचा इतिहास हा जरी ४०० कोटी वर्षे इतक्या प्रदीर्घ कालावधीचा असला तरी त्यातील बहुतांश कालावधी हा एकपेशीय सजीवाच्या उत्क्रांतीशी जोडला आहे. पहिले बहुपेशीय सजीव हे ७० कोटी वर्षांपूर्वी अस्तित्त्वात आले. या बहुपेशीय सजीवांच्या ५७ कोटी वर्षांच्या इतिहासामध्ये पृथ्वीतलावर आतापर्यंत ५ महाविनाशकारी संकटे येऊन गेली, ज्यामध्ये तत्कालीन कालखंडातील ५०% ते ९०% जीवजाती समूळ नष्ट पावल्या. मागील महाविनाशकारी संकट हे ६.७ कोटी वर्षांपूर्वी येऊन गेले होते. त्यावेळेस त्या कालखंडामध्ये डायनोसोर ही सर्वात वैशिष्टपूर्ण जीवजात होती, तिचा विनाश झाला. आज जगामध्ये दररोज ४० ते १०० जीवजाती नष्ट पावत आहेत. जैवविधतेचे (bio-diversity) प्राबल्य असलेली पर्जन्यवने (rainforests) झपाट्याने नाहीशी होत आहेत. प्रदूषण भयंकर गतीने वाढत आहे. मानवी अर्थव्यवस्था सृष्टीचा मूलाधारच नष्ट करीत आहे. या गतीने जैवविविधता कमी होत गेली व प्रदूषण वाढत गेले तर मानवी समाजरचनेला सहाव्या महाविनाशकारी संकटाला सामोरे जावे लागेल. त्यातून मानवजात वाचणे हे दुष्कर राहील.

याच विदारक पार्श्वभूमीवर परिवर्तनवाद्यांना सक्रिय हस्तक्षेप करायचा आहे. हे महाविनाशकारी संकट टाळण्यासाठी (ते टाळण्याची त्यांची ताकद आहे की नाही याचा आपण नंतर विचार करु या) त्यांना पर्यायी समाजरचना हवी आहे. काही लोकांचा आक्षेप असा आहे की परिवर्तनवादी त्यांना कशा प्रकारची समाजरचना हवी याची स्पष्टता व्यक्त करीत नाहीत. त्यामुळे परिवर्तनवाद्यांनी आपली भूमिका स्पष्ट करायला हवी. तसे वेळोवेळी ते आपली भूमिका स्पष्ट करत असतातच. परंतु येथे आपण परिवर्तनवाद्यांचा व्यापक स्तरावर विचार करीत असल्यामुळे (साम्यवाद्यांपासून मानवतावाद्यांपर्यंत) त्यांची सर्वसमावेशक भूमिका काय असू शकते याचा विचार करु या.

अन्न, वस्त्र, निवारा, आरोग्य, शिक्षण, सांस्कृतिक विकास या बाबतीत सर्वांच्या किमान गरजा भागतील अशी समाजव्यवस्था हवी.

प्रचलित विनाशकारी विकासाला विरोध, विकास हा शाश्वत हवा.

देशांतर्गत व जागतिक पातळीवर खरीखुरी लोकशाहीनिष्ठ अर्थ- राज्यव्यवस्था

सांस्कृतिक बहुविविधता, धार्मिक व अस्तिक यांच्यासोबत इहवादी व नास्तिक यांनाही जीवनपद्धतीची मोकळीक (एकमेकांना निर्दयीपणे चिरडून टाकण्याची मुभा नाही)

धार्मिक व सांस्कृतिक सहिष्णुता, मोनो-कल्चरचा आग्रह नको.

व्यापक प्रमाणावर समानतेचे धोरण (टोकाची विषमता नको, विषमतेचे प्रमाण कमी हवे)

जातिभेद, वर्गभेद नको, तरी पण दुर्बल घटकांच्या सबलीकरणासाठी वेगळे धोरण

सर्जनशील रोजगाराला वाव, अर्थव्यवस्थेचे विकेंद्रीकरण, अनिर्बंध शहरीकरणाला अटकाव

स्त्री-पुरुष समानता, स्त्रियांच्या सबलीकरणासाठी विशेष धोरण

लोकसंख्यावाढीला प्रभावी आळा

जागतिकीकरण (मक्तेदारी भांडवलशाही) नको. परंतु जागतिक परस्परावलंबन हवे. जागतिक स्तरावर संस्कृतीचे आदानप्रदान हवे, मोनोकल्चर नको.

हिंसात्मक, द्वेषमूलक वृत्तीला अटकाव, युद्धखोर आर्थिक-सामाजिक व्यवस्थेला नकार

आम्ही सर्व पृथ्वीवासीय एक आहोत (planetary citizenship) याचे भान, ग्रहीय आरोग्याचे संवर्धन

अनुक्रमणिका

करण्यासाठी कटिबद्धता

वर उल्लेख केलेल्या सर्वसमावेशक धोरणावर जनसामान्यांचीच काय, परिवर्तनवाद्यांचीही (जे एकूणच लोकसंख्येत अत्यल्प आहेत) व्यापक सहमती होऊ शकत नाही. याची कारणे वरवरची नाहीत किंवा पाचशे वर्षांचा इतिहास (पाश्चात्त्य भांडवलशाहीवादी साम्राज्यवादाचा) तपासून पाहिला तर त्यामध्ये याची उत्तरे सापडतीलच असेही नाही.

याची पाळेमुळे खूप खोलवर पसरलेली आहेत. उत्क्रांतीच्या प्रक्रियेमध्ये समूहमानसाचे भान हरपणे, माणसाचा स्वभाव घडणे, आध्यात्मिक, धार्मिक, ऐहिक पैलूवर जीवनदृष्टीमध्ये मूलभूत फरक तयार होणे, ज्यामुळे वारंवार संघर्षाची भूमिका तयार होणे इत्यादी घटकांचा व आजची समाजव्यवस्था विनाशकारी संकटामध्ये सापडण्याशी फार जवळचा संबंध आहे. हे सर्व आपण तपासून पाहिले तर या सर्व प्रश्नांना कसे सामोरे जायचे याची समाधानकारक उत्तरे (विशेषत: सर्वसमावेशक दृष्टिकोन व धोरणे ठरवितांना, ती सर्वोत्तम असतीलच असे नव्हे) मिळू शकतील.

### समूहमानस हरपण्याची प्रक्रिया

आजच्या समाजरचनेमध्ये माणूस हा अतिशय व्यक्तिवादी झाला आहे. समूहमनाचे भान त्याने गमावले आहे असा सर्वसाधारण आक्षेप घेतला जात आहे आणि तो रास्तच आहे. आदिवासी समूह जीवन व ग्रामप्रधान संस्कृतीचा ऱ्हास, गावाचे प्रश्न गावात सोडविण्याच्या पद्धतीचा ऱ्हास, नगर समूहातील सुट्या-सुट्या व्यक्ती, एकत्रित कुटुंबपद्धतीचा ऱ्हास व विभक्त कुटुंब पद्धती, हे या सर्वांचे द्योतक आहे. आधुनिक औद्योगिक समाजरचनेने लादलेले हे सर्व दुर्गुण आहेत, अशा एका मतप्रवाहाचे परिवर्तनवाद्यांमध्ये प्राबल्य आहे.

यासाठी एकीकडे ग्रामप्रधान संस्कृती व पारंपरिक नीतिमूल्ये यांची कास धरावी असा एक मतप्रवाह जोर पकडत आहे. त्यासाठी जागतिकीकरणाला तीव्र विरोध व विकेंद्रित ग्रामप्रधान संस्कृतीचा पुरस्कार हा एक मार्ग आहे. तर दुसरीकडे याला विरोध म्हणून आत्यंतिक व्यक्तिवादी दृष्टीकोन, समाजवादाला नकार व जागतिकीकरणाचा पुरस्कार अशा प्रकारचा दुसरा दृष्टिकोन जोर पकडत आहे. या दुसऱ्या दृष्टिकोनाचे उत्तम उदाहरण आहे, शरद जोशी यांनी त्यांच्या 'बस करा हे समाजसेवेचे ढोंग' या लेखामध्ये मांडलेली भूमिका. ते म्हणतात, "मी एक पराकोटीचा व्यक्तिवादी (individualist) माणूस आहे, व्यक्ती हेच विचाराचे केंद्र आहे, समाजाचे केंद्र आहे, निर्मितीचे केंद्र आहे. व्यक्तीची काळजी घेतली तर समाजाची काळजी घ्यायची काहीही आवश्यकता नाही".

शरद जोशी यांनी, आयन रॅन्ड ही (भांडवलशाहीचा पुरस्कार करणारी विचारवंत) त्यांची आवडती लेखिका आहे हे मान्य केले आहे, यात काही आपणास आश्चर्य वाटण्याचे कारण नाही.

समूह-मानस, माणसाचे का, केव्हा व कसे हरपले याचा उत्क्रांतिमय आढावा आपण घेऊ शकलो तर समूह मानस किंवा सामुदायिक जाणीव याचे आत्ताच आधुनिक समाजरचनेमध्ये भान हरपले आहे, ही ओरड निरर्थक आहे हे आपल्या लक्षात येईल.

४०० कोटी वर्षांच्या एकपेशीय सजावापासून बहुपेशीय सजीवांपर्यंतचा उत्क्रांतीचा इतिहास बघितला की हे लक्षात येईल, माणसाव्यतिरिक्त इतर सर्व सजीव निसर्गाशी एकरूप अवस्थेमध्ये जगत होते. माणूस जेव्हा २० लाख वर्षांपूर्वी अस्तित्वात आला तेव्हा तोसुद्धा निसर्गाशी एकरूप अवस्थेत जगत होता. त्याच्या उत्क्रांतीच्या इतिहासामध्ये त्याचे आत्मभान (self- consciosness) फार उशिरा म्हणजे १ लाख ते ५००० वर्षांपूर्वी अस्तित्वात आले. आत्मभान विकसित होण्याची प्रक्रिया संथपणे व टप्याटप्याने होत गेली. त्यामध्ये भाषेचा उगम या घटनेचा फार मोठा वाटा राहिला असला पाहिजे.

आत्मभान जागृत होण्याची प्रक्रिया सगळीकडे सारखी नव्हती. ऑस्ट्रेलियातील मूळचे रहिवासी आदिवासी समूह आत्तापर्यंत म्हणजे ४०००० वर्षे समूहमानसाच्या प्रभावाखाली होते. ते स्वत:ला निसर्गापासून अलग मानत नव्हते. माणूस, पशू, पक्षी, मासे हे सर्व एकच न बदलणाऱ्या स्थिर परस्परावलंबी प्रक्रियेचे भाग असून या सर्वांचा संबंध पूर्वजांच्या आत्म्याशी आहे अशी त्यांची धारणा होती. हे सर्व दर्शविते की तेथील आदिवासींची जाणीव ही समूहमानसाची होती. त्यांचा 'स्व' निसर्गामध्येच सामावला होता.

माणूस खऱ्या अर्थाने ५००० वर्षांपूर्वी स्वत:ला भोवतालच्या परिसरापासून फारसा अलग मानत नव्हता. परंतु हळूहळू जशी जशी नगरराज्ये स्थापन झाली व माणसाचे नागरीकरण सुरू झाले तशी तशी त्याची 'मी' पणाची जाणीव

अनुक्रमणिका

जागृत होत गेली. मी, माझे कुटुंब, माझी टोळी, माझी जात, माझा धर्म, माझे राष्ट्र, हा सगळा त्याचा प्रवास आहे. आज 'मी' पणाची जाणीव एवढी तीव्र आहे की सामुदायिक जाणिवेची सगळी बंधने कोसळत चालली आहेत. परमार्थाचा विचार कमी होणे व स्वार्थीपणाची भावना वाढत जाणे या वृत्तीवर मानवी मेंदूमध्ये जी नैसर्गिक बंधने (natural inhibitions) आवश्यक होती, ती न राहणे हे उत्क्रांतीच्या इतिहासाचे वाईट फळ आहे. उत्क्रांतीची प्रक्रीया कधीही दोषविरहित (flawless) राहत नाही, याचे उत्कृष्ट उदाहरण आहे.

'मी' पणाची जाणीव जितकी वाढत जाईल तितकी समूह मनाची जाणीव कमकुवत होत जाईल हा उत्क्रांतीचा व परिवर्तनाचा प्रवास आहे. आधुनिक औद्योगिक समाज-रचनेच्या आधी, ही सामुदायिक जाणीव कमी होण्याची प्रक्रिया सुरु होती. औद्योगिक क्रांतीचा दोष इतकाच आहे की तिने ही प्रक्रिया तीव्र केली. सुरुवात मात्र तिने केली नसल्यामुळे त्याचे अपश्रेय तिच्या पदरात टाकू नये.

माणूस हा सामाजिक प्राणी असल्यामुळे त्याला सध्याच्या अभूतपूर्व संकटावस्थेच्या संदर्भात इष्ट सामुदायिक कृतीसाठी कसे प्रवृत्त करायचे, हा एक कळीचा प्रश्न आहे.

सर्वसामान्य माणसांच्या अंगभूत शहाणपणाबद्दल (wisdom) परिवर्तनवाद्यांना खूप खात्री असते आणि त्याचा उद्घोष नेहमीच निरनिराळ्या वर्तनाच्या संदर्भात केला जातो. उदा. सर्वसामान्य जनतेने २००४ मध्ये पार पडलेल्या सार्वत्रिक निवडणुकीमध्ये अंगभूत शहाणपणाचे प्रदर्शन करुन मतदान केले व सत्तांतर घडवून आणले इ. जनसामान्यांच्या प्रवृत्तीबद्दल परिवर्तनवाद्यांचे हे आकलन उल्लेखनीय आहे. सर्व काही तज्ज्ञांच्या भरवशावर सोडायचे या अभिजनवादी (elitist) प्रवृत्तीवर अरुंधती रायने जो कडाडून हल्ला केला, ("तू निव्वळ लेखक आहेस. तुला धरणाच्या बांधकामाबद्दल काय कळते? अणुबॉम्बविषयीच्या धोरणाबद्दल काय कळते? हे मुद्दे तज्ज्ञांनी हाताळायचे असतात" अशी टीका करणाऱ्यांना उत्तर म्हणून) तो योग्यच आहे.

जनसामान्यांमध्ये एक प्रकारची शहाणपणाची प्रवृत्ती असली तरी तिच्या काही अगंभूत मर्यादा आहेत, त्याचाही गांभीर्यपूर्वक विचार करणे आवश्यक आहे. कारण जे गुणधर्म जनसामान्यांमध्ये नसतात, ते त्यांच्यामध्ये आहेत असे गृहीत धरण्याची घोडचूक परिवर्तनवादी [illegible] सतात.

जनसामान्यांचे शहाणपण हे तात्कालिक बाबींच्या संदर्भात असते. दूरदृष्टिकोनातून सम्यक विचार ते फारसा करू शकत नाहीत, या वस्तुनिष्ठ वास्तवासाठी मानवी उत्क्रांतीचा पूर्वेतिहास कारणीभूत आहे. माणसाच्या २० लाख वर्षांच्या पूर्वेतिहासामध्ये समस्या तात्कलिक स्वरुपाच्या असायच्या व त्याचे दुष्परिणामही स्थानिक स्वरूपाचे असायचे. उदा. न्यूझिलंडमधील माओरी या आदिवासी जमातीने १००० वर्षांपूर्वी मोआज, हंसपक्षी, बदक या जीवजातींचा त्या बेटावर समूळ विनाश केला. अर्थात याही गोष्टीचे काही जागतिक परिणाम तेव्हा होत होतेच. परंतु ते लक्षात घेण्याची कोणतीही प्रक्रिया त्यावेळी उपलब्ध नव्हती.

आजच्या जागतिकीकरणाच्या काळामध्ये निर-निराळ्या स्थानिक घटकांचे परिणाम हे स्थानिक राहिले नसून ते जागतिक झाले आहेत. सध्या जनसामान्यांच्या आवाक्यात ही समज आली तरी त्यांना त्यावर उपाय करण्याची कोणतीही निकड नसते. जनसामान्यांना जागतिक संदर्भात कार्यप्रवण कसे करायचे हा एक मोठाच प्रश्न आहे. दुर्दैवाने तज्ज्ञांच्या बाबतीत दुसऱ्या समस्या आहेत. तज्ज्ञ हे साधारणत: त्यांच्या विषयात उपाययोजना करण्याचे आवाहन करतात. म्हणून समग्रपणे त्याचा परिणामही होत नाही आणि परिवर्तनवाद्यांचे जागतिक प्रश्नांचे समग्र आकलनच कमी पडत चालले आहे, ही सध्याची वस्तुस्थिती आहे.

परिवर्तनवादी कार्यकर्त्यांचे आकलन मर्यादित असल्यास ते आपण समजू शकतो. परंतु परिवर्तनवादी अभ्यासकांचे समग्र आकलनसुद्धा थिटे असू शकते या वस्तुस्थितीने आपणा सर्वांस आत्मपरीक्षण करण्यास भाग पाडले पाहिजे. परंतु खेदाची परिस्थिती ही आहे की परिवर्तनवादी आपापल्या छोट्या वर्तुळातच मग्न असतात. कोणी तसा प्रयत्न करीत असेल तर त्यावर तो/ती निराशावादी आहे किंवा प्रतिक्रियावादी आहे असा शिक्का मारला जातो.

निसर्गाशी एकरूपता असणारी व समूहमानसाचा प्रभाव असणारी समाजव्यवस्था पुन्हा अस्तित्वात येणे कठीण आहे. माणूस पुन्हा एकदा सामुदायिक जाणिवेकडे वाटचाल करील या भाबड्या आशावादामध्ये मश्गुल राहणे निरर्थक आहे. त्याकाळच्या प्राथमिक समाजव्यवस्थेमध्ये जे जे काय होते ते त्यांना हेतुपूर्वक करावे लागत नव्हते. तो त्यांच्या जीवनाचा सहभाग होता. कारण सध्या काही मोजक्याच प्रामाणिक आध्यात्मिक प्रवृत्तीच्या व्यक्ती सोडल्यास इतरांना



अनुक्रमणिका

चराचराशी काही काळ किंवा सदासर्वकाळ तादात्म्य व एकरुपता अनुभवता येणे, ही एक खडतर साधना आहे.

निसर्गाशी एकरुपता साधण्याची मक्तेदारी फक्त अध्यात्मवाद्यांचीच असते, असे नव्हे. मिलिंद वाटवे यांच्या दृष्टिकोनातून नास्तिक साधना करणाऱ्या नास्तिकवाद्यांनाही हे शक्य आहे व ते त्यांनी पुढील शब्दांत व्यक्त केले आहे. 'मी' पणाचा भ्रम नाहीसा करणे याचाच दुसरा अर्थ विश्वव्यापक 'मी' ला ओळखणे. मी ही स्फूर्ती, हे स्पंदन या विश्वाच्या अस्तित्त्वाच्या मुळाशी आहे, ते अनुभवता येते'.

आज अध्यात्माचा झटपट अनुभव घेण्याची (ती एक खडतर साधना आहे हे विसरुन) एक मोठी लाट आली आहे. झटपट अध्यात्माच्या अर्थकारणाबद्दल डॉ. अजित दांडेकर यांनी खालील विचार मांडले आहेत.

'वेगवेगळ्या प्रकारचे आध्यात्मिक गुरु निर्माण करून जागतिक बाजारपेठेत त्यांचा पुरवठा करण्याच्या बाबतीत भारताने गेल्या पंधरा-वीस वर्षात फार मोठी आघाडी मारली आहे. याचे एकंदर स्वरूप जरी अनियंत्रित कुटिरोद्योगाचे असले तरी, मुंबई येथील एका वित्तसंशोधन संस्थेच्या (पाहणी) निष्कर्षानुसार वार्षिक पंचवीस हजार कोटी रुपयांची ही भक्कम राष्ट्रीय बाजारपेठ आहे आणि तिच्या वाढीचा दर सालाना (दरसाल) तीस टक्के एवढा जबरदस्त आहे'.

आजच्या व्यक्तिवादी जमान्यामध्ये समाज-परिवर्तनाच्या संदर्भात काय करता येऊ शकते?

जनसामान्यांना ग्रहीय परिप्रेक्ष्यामध्ये (planetary perspective) विचार करण्यास प्रवृत्त करण्याचे आव्हान परिवर्तनवाद्यांना स्वीकारावे लागले. समूह-मानसाकडे वाटचाल न करतासुद्धा सामूहिक कृती करणे शक्य आहे. आत्यंतिक व्यक्तिवादी वर्तन नको, परंतु किमान अर्थपूर्ण अस्तित्त्वासाठी आवश्यक तेवढे व्यक्तिवादी वर्तन व आपले अस्तित्त्व धोक्यात आहे याची जाणीवच, माणसांना समूह मानसाकडे वाटचाल न करता सामूहिक कृती करायला प्रवृत्त करेल. स्वार्थ व परमार्थ या द्वंद्वामध्ये न अडकता (कारण कोणत्याही गुणांचा अतिरेक हा मानवी अस्तित्त्वासाठी घातक आहे. निव्वळ परमार्थाची भावना प्रबळ असणारी माणसे, उत्क्रांतीच्या प्रक्रियेत नाश पावतील) जनसामान्यांना सामूहिक कृतीसाठी प्रवृत्त करण्याचे आव्हान अतिशय खडतर आहे. त्याचे पद्धतिशास्त्र (methodology) अजूनही दृष्टिक्षेपात येत नाही. त्यासाठी परिवर्तनवाद्यांना परस्परांमध्ये व्यापक सहमती घडवून आणावी लागेल. व्यापक सहमती घडवून आणण्याच्या या प्रक्रियेमध्येच त्यांना जनसामान्यांना कसे सहभागी करुन घेता येईल याचे योग्य पद्धतिशास्त्र गवसेल.

### मानवी स्वभावाची भूमिका

आधुनिक समाजव्यवस्था ही पराकोटीची विषमता, जातिभेद, वर्गभेद व धार्मिक तेढ यांनी चिरफाळलेली आहे. औद्योगिक समाजरचनेमध्ये हिंसाचार, लैंगिक विषमता, युद्धखोर वृत्ती यांनी तीव्रतम पातळी गाठली आहे. व्यवस्था परिवर्तन - विशेषतः आधुनिक भांडवलशाहीवादी अर्थराजकीय व्यवस्था - हा यावरील रामबाण उपाय आहे असे परिवर्तनवादी मानतात. आजच्या स्वरुपातील जागतिकीकरण हे दुसरे तिसरे काही नसून मक्तेदारी भांडवलशाही आहे; या अर्थाने परिवर्तनवाद्यांची जागतिकीकरणविरोधी भूमिका रास्तच आहे. परंतु सर्व काही दोष भांडवलशाहीला व भांडवलशाहीचे पुरस्कर्ते राष्ट्र-राज्यव्यवस्था यांना देता येत नाही. समस्या खूपच जटिल आहेत. त्याची पाळेमुळे मानवी स्वभावामध्ये (human nature) गुंतलेली आहेत. मानवी स्वभाव हा लाखो वर्षांच्या उत्क्रांतीच्या प्रक्रियेमध्ये घडला आहे. मानवी स्वभाव घडण्याच्या प्रक्रियेने मानवेतर पशूंपासून पूर्णपणे फारकत घेतलेली नाही. माणूस हा सृष्टीचा सर्वोच्च आविष्कार आहे, असे म्हणण्यात फक्त मानवकेंद्री (anthropocentric) अहंकारच दिसेल.

सामाजिक जीवशास्त्र (socibiology) ही ज्ञानशाखा प्राणी व माणसाच्या सामाजिक वर्तनाचा अभ्यास जीवशास्त्रीय भूमिकेतून (विशेषतः परिस्थिती विज्ञान व उत्क्रांतीच्या संदर्भामध्ये) करीत असते. सामाजिक जीवशास्त्रामध्ये मानवी स्वभावाचा अभ्यास केला जातो. मानवी स्वभाव घडण्यामध्ये परिस्थितीचा (पर्यावरणाचा) जितका प्रभाव असतो, तितकाच प्रभाव जनुकीय घडणीचा असतो, हे सत्य स्वीकारणे म्हणजे काही प्रतिगामी होणे नव्हे. परिवर्तनवाद्यांनी आपणास कोणी प्रतिगामी म्हणू नये म्हणून सोशिओबॉयोलॉजीला संपूर्णपणे नाकारणे हे योग्य नाही.

नैतिक जाणीव, प्रेम करण्याची क्षमता, समानुभूती (empathy) तर्कशक्ती या गुणांबरोबरच पुरुषांची हिंसक वृत्ती, वर्चस्ववादी वृत्ती, सूडाची भावना, द्वेषाची भावना या अवगुणांचासुद्धा मानवी स्वभावामध्ये अंतर्भाव होतो. हे अवगुण त्याच्या उत्क्रांतीच्या प्रक्रियेमध्ये समाविष्ट होते याचा






अर्थ असा होत नाही की या वृत्तींना कधी प्रतिबंध घालता येणार नाही किंवा यांनी आटोक्यात ठेवता येणार नाही.

आजचे परिवर्तनवादी हे साधारणत:पुरोगामी असतात. त्यांच्यामध्ये व्यवस्था परिवर्तनाच्या विचारांचे प्राबल्य असल्यामुळे, त्यांनी मानवी स्वभाव नाकारणे व मानवी मन हे कोऱ्या पाटीसारखे (blank slate) असून जे काय त्याला घडविते त्यामध्ये संस्कृतीचा फार मोठा वाटा असतो, या विचारसरणीचा प्रभाव त्यांच्यावर असणे स्वाभाविक आहे. परंतु 'मानवी स्वभाव' आहे, हे सत्य स्वीकारणे म्हणजे वंशवाद, लैंगिक विषमता, युद्ध, जातिसंहार, शुन्यवाद, प्रतिक्रियावादी राजकारण, मुले व दुर्बल घटक यांकडे दुर्लक्ष, यांचा पुरस्कार करणे आहे, असे मानणे चुकीचे आहे.

सामाजिक जीवशास्त्राबरोबर इतर ही ज्ञानशाखा- मानववंशशास्त्र, मानसशास्त्र, उत्क्रांती-मानसशास्त्र (evolutionary psychology), आचारविज्ञान (ethology), समाजशास्त्र - या मानवी स्वभावाचा अभ्यास करतात. या सगळ्या शास्त्रांच्या सम्यक अभ्यासातून आपणास मानवी स्वभाव समजून घेता येईल. याचा हा अर्थ नाही की हिंसात्मक प्रवृत्ती, परकियांचा द्वेष, वर्चस्ववादी वृत्ती हाच फक्त मानवी स्वभावाचा वारसा आहे. परंतु जेव्हा परिवर्तनवादी फक्त आपल्या सिद्धांन्ताला अनुकूल असेत निष्कर्ष (सहकार्याची भावना, प्रेम करण्याची क्षमता, नैतिक जाणीव, समानुभूती, तर्कशक्ती, इत्यादी) काढतात तेव्हा मानवी इतिहासाचा हा पण वारसा आहे. हे नमूद करावे लागते. मानवी स्वभावाचे हे पैलू मान्य करणे म्हणजे प्रतिगामी होणे नव्हे. यातील सर्वच गोष्टी आपणास तंतोतंत मान्य व्हायला पाहिजेत, असे नव्हे. आपले काही त्यासंबंधी मतभेदही असू शकतात. परंतु अशा प्रकारचे शास्त्रज्ञ हे पाश्चात्त्य संस्कृतीमध्ये वाढले असल्यामुळे व पाश्चात्त्य वर्चस्ववादी व व्यक्तिवादी विचारसारणीचा त्यांच्यावर प्रभाव असल्यामुळे त्यांच्या जीवनप्रणालीला अनुकूल अशीच सिद्धांत-मांडणी ते करीत असतात, असा आपण न्याय केला तर ती आपली आत्मवंचना होईल. व या न्यायाने आपणास हिंदुत्त्ववादी स्वदेशी विज्ञान मान्य करावे लागेल.

मानवी स्वभावाचा अभ्यास, आपणास परिवर्तनाचा मार्ग कसा राहू शकतो, याबद्दल काही इष्ट उपाय सुचवू शकतो. सुयोग्य शिक्षण पद्धतीने मानवी स्वभावामध्ये काही परिवर्तन होऊ शकते. परंतु त्याच वेळेस आपल्या लक्षात येते की मानवी स्वभाव ही काही कोरी पाटी नसल्यामुळे आपण त्यास कसेही बदलू पाहू म्हटले तर ते शक्य नाही, इस्त्राईलमधील किबूत्झ प्रकारच्या सामूहिक जीवनपद्धतीच्या प्रयोगावरुन हे सिद्ध झाले की मुलांना त्यांच्या आई-वडिलांपासून दूर ठेवून त्यांतील मुलांच्या स्वभावामध्ये इष्ट बदल झाले नाहीत. अशाच प्रकारचे सोव्हिएत रशियामधील बळपूर्वक केलेल्या सामूहिकीकरणाचे प्रयोग फसले.

मानवी स्वभाव ही एक स्थिर संरचना (stable structure) आहे. परंतु ती अतिशय स्थिर संरचना (superstable structure) नाही. तिला परिवर्तनाचे नियम लागू आहेत. फक्त ते परिवर्तन पुरेसा कालावधी देऊन व योग्य पद्धतीने व्हायला पाहिजे. याबाबतीत एकांगी अतिरेकी मार्गाचा पुरस्कार योग्य नव्हे. त्यामुळे मानवी स्वभावामध्ये इष्ट परिवर्तन होण्यासाठी आपण आशावादी राहायला पाहिजे. सुयोग्य शिक्षण पद्धती, योग्य मूल्य-निवड-प्रणालीचा (value judgement system) पुरस्कार व जीवन-दृष्टीमधील (world-view) बदल आणि व्यवस्था-परिवर्तन, यामुळे येणाऱ्या काही शतकांमध्ये मानवी स्वभावातील अनिष्ट प्रवृत्तींना आळा बसू शकेल. आणि काही आटोक्यात न येणाऱ्या हिंसात्मक प्रवृत्तींना योग्य न्यायप्रणालीद्वारा दमन यंत्रणा उभारुन अटकाव करावा लागेल. सुप्रजननशास्त्र (eugenics) व जनुकीय अभियांत्रिकी (genetic engineering) हे काही मानवी स्वभाव बदलण्याचे योग्य मार्ग नाहीत. या शास्त्रांच्या पुरस्कारामधून काही नवीनच नैतिक व सामाजिक समस्या उभ्या राहू शकतात, आणि त्या समस्या मानवी समाजव्यवस्थेच्या आटोक्याच्या बाहेर राहू शकतील.

### आध्यात्मिक व नास्तिक प्रेरणा

परिवर्तनवाद्यांमध्ये व्यापक सहमती घडवून आणण्यामध्ये मुख्यत: दोन पक्ष पडू शकतात, याची आपणास जाणीव ठेवावी लागेल. मी उल्लेख केलेल्या परिवर्तनवाद्यांच्या १० गटांपैकी (ही यादी सर्वसमावेशक नाही, डाव्या विचारसरणीमध्ये अजूनही काही गटांचा समावेश होऊ शकतो) साम्यवादी व इहवादी (इहवाद्यांमध्येसुद्धा काहीजण, धर्म व अध्यात्म नाकारत नाहीत. त्यांना फक्त धर्म व सार्वजनिक जीवन यामध्ये फारकत हवी असते) सोडले तर इतर ८ गटांमध्ये या आध्यात्मिक व नास्तिक या दोन्ही प्रेरणा

अनुक्रमणिका

असलेले तट असू शकतात. नास्तिक प्रवृत्तींची माणसे एकूणच समाजव्यवस्थेमध्ये कमी असली तरी परिवर्तनवाद्यांमध्ये त्यांचे प्रमाण तुलनेने जास्त आहे. परपस्परविरोधी वाटणाऱ्या या दोन प्रवृत्ती, एकमेकांना समजून घेऊन व्यापक सहमतीच्या धोरणातून सोबत कसे काम करू शकतील, याची पद्धती आपणास शोधून काढावी लागेल.

नास्तिकवाद्यांना आध्यात्मिक प्रेरणा समजून घेण्या-साठी (त्याला पूर्णपणे नकार न देता) असाच उदार दृष्टिकोन स्वीकारावा लागेल.

आध्यात्मिक प्रवृत्तीच्या मुळाशी गेल्यावर असे लक्षात येते की हे अनुभव येण्याची एक व्यक्तिनिहाय विशिष्ट क्षमता असते. जे देवधर्म मानतात त्यांनाच साधारणत: हे अनुभव येतात. जे देव-धर्म नाकारतात, ज्यांची जीवनदृष्टी नास्तिक किंवा विवेकवादी असते, त्यांना हे अनुभव सहसा येत नाहीत. या विश्वामध्ये देवाचे अस्तित्त्व आहे की नाही, हा एक सनातन वाद आहे. (काही लोक त्यामध्ये हा पैलू जोडतात की देवाचे अस्तित्त्व महत्त्वाचे नाही, मानवी अस्तित्त्व टिकून राहण्यासाठी देववादी अधिष्ठानाची आवश्यकता आहे) सध्याच्या मानवी ज्ञानाच्या काही मूलभूत मर्यादा असल्यामुळे देवाच्या अस्तित्त्वाबद्दलचे मत हे सर्वस्वी श्रद्धा (faith) या स्वरूपाचे असते.

सर्वप्रथम आध्यात्मिक किंवा अलौकिक अनुभव कसे येतात व त्याचे स्पष्टीकरण कसे करता येऊ शकते यासाठी दोन उदाहरणे बघू या.

डॉ. जेम्स ऑस्टीन या अमेरिकन चेताशास्त्रज्ञाला (neurologist) एके दिवशी लंडनमध्ये प्रवास करताना एक अलौकिक अनुभव आला. एकाएकी त्याला आपले व्यक्तिगत अस्तित्त्व हरपल्यासारखे झाले. सभोवतालच्या परिसरापासून वेगळे असलेले त्याचे अस्तित्त्व समग्र परिसराशी एकरूप झाल्याचे त्याला जाणवले. क्षणाक्षणाला जाणवणारा काळ त्याच्यासाठी थांबला असून, शाश्वत काळामध्ये प्रवेश केल्याचे त्याला जाणवले. तळमळ, मृत्यूचे भय थांबले असून एका परम सत्याचा आविष्कार झाल्याचा साक्षात्कार त्याला झाला.

हा असा अलौकिक अनुभव येऊनही डॉ. जेम्स ऑस्टीनने त्याला देवाच्या अस्तित्त्वाचा पुरावा म्हणून मानले नाही. त्याने या गूढवादी व आध्यात्मिक अनुभवाची चेताविज्ञानाच्या दृष्टिकोनातून चिकित्सा करण्याचा प्रयत्न केला.

त्याला या गोष्टीचा शास्त्रीय अभ्यास करताना असे आढळून आले की आध्यात्मिक अनुभवाचा संबंध मेंदूमधील ॲमिग्डाला या भागाशी आहे. काही ब्रेन सर्किट्समध्ये अडथळा येऊन ॲमिग्डालाची क्रिया मंदावली तर असे अनुभव येऊ शकतात. अशा वेळेस, ज्याच्यामुळे आपणास काळाची जाणीव होते व आपल्या सभोवतालच्या विश्वापासून आपले अस्तित्त्व वेगळे आहे असे जाणवते ते पेरीयटल लोब सर्किट्स शांत होतात. फंटल आणि टेम्पोरल लोब सर्किट्स संयुक्तपणे आत्मभान निर्माण करतात ते अशा वेळेस मोकळे होतात व आपले अलग अस्तित्त्व हरपल्यासारखे वाटते.

या पद्धतीने त्याने या अलौकिक अनुभवाचा शास्त्रीय परिभाषेतून उलगडा करण्याचा प्रयत्न केला. अशा प्रकारे चेता-धर्मशास्त्र (neuro-theology) हे अलौकिक अनुभवाचे ऐहिक परिभाषेमध्ये स्पष्टिकरण करू शकते.

टेम्पोरल लोब अपस्मार (temporal lobe epilepsy) या विकारामुळे डोस्टोव्हस्की, सेंट पॉल, प्राउस्ट हे भूत-पिशाच्चवादी भूमिकेतून पछाडले होते.

मार्क सल्झमनने एका जोगिणीची कथा सांगितली की जिला अनेक वर्षे प्रयत्न करूनही प्रामाणिकपणे ईश्वराचा अनुभव आला नाही. तिला टेम्पोरल लोब अपस्मारामुळे एकाएकी साक्षात्कार होऊ लागले.

डॉ. ॲन्ड्र्यू न्युबर्ग यांच्या मते, योग व प्रार्थनेच्या प्रभावाखाली, मेंदूचे पोस्टेरियर व सुपीरियर पेरीएटल लोब निष्क्रीय होऊन त्यांच्याकडे येणारी संवेदनाची माहिती थांबते. अशा वेळेस प्रीफिंटल कॉर्टेक्स अति-कार्यशील होतो. वारंवार मंत्र उच्चाराच्या प्रभावाखाली हायपोथॅलॅमसची कळ दाबली जाते. या प्रक्रियेमध्ये आध्यात्मिक अनुभव येऊ शकतात.

आध्यात्मिक अनुभवाचा, जीवशास्त्रीय व मानस-शास्त्रीय प्रक्रियेशी फार जवळचा संबंध असून त्याला एक प्रदीर्घ इतिहास आहे. तसा संबंध दाखविणे हे अगदी योग्य आहे. परंतु ज्यांना साधारणपणे नवयुगवादी विज्ञानाचे (new age science) पुरस्कर्ते म्हणून संबोधिले जाते, ते याचा संबंध आधुनिक भौतिकी व पुंजयामिकीशी (quantum mechanics) जोडतात. त्यांची भूमिका काय आहे ते आपण पाहू.

फ्रिझ्झोक कॅप्रा, डेव्हीड बॉम, अमित गोस्वामी हे भौतिकशास्त्रज्ञ या प्रकारच्या नवयुगवादी विज्ञानाचे पुरस्कर्ते आहेत. यातील एकाची भूमिका आपण तपासून पाहू या.








अनुक्रमणिका

फ्रिझ्झोक कॅप्रा याने त्याचा एक आध्यात्मिक अनुभव 'The Tao of Physics' या त्याच्या अतिशय लोकप्रिय पुस्तकामध्ये मांडला आहे. एकदा तो समुद्रकिनारी बसला असता, आपल्या श्वासोच्छ्वासाची लयबद्धता अनुभवत असताना, त्याला एक अलौकिक अनुभव आला. एकाएकी त्याला सभोवतालचा परिसर विलक्षण अशा वैश्विक नृत्यामध्ये सहभागी झाल्याचे जाणवले. त्याच्या शरीरातील अणू-रेणू व आसमंतातील अणू-रेणू या ऊर्जेच्या वैश्विक नृत्यामध्ये सहभागी झाले आहेत, असा प्रत्ययकारी अनुभव त्याला आला. याला त्याने 'शंकराचे तांडव नृत्य' (The Dance of Shiva) असे म्हटले आहे.

हा अनुभव अस्सल (genuine) आहे, यात काही शंका नाही परंतु त्यावर भाष्य कसे करायचे हा प्रश्नच आहे. फ्रिझ्झोक कॅप्रा यांनी यावरील भाष्य आधुनिक भौतिकीच्या विशेषत: पुंजयामिकीच्या संदर्भात केले आहे. त्याने अशी मांडणी केली आहे, पूर्वेकडील गूढवादी तत्त्वज्ञान - हिंदू, बौद्ध, ताओ - ही अशी एक परिपूर्ण तत्त्वप्रणाली आहे की जिच्यामध्ये आधुनिक भौतिकीच्या सिद्धांतांना पुष्टी मिळते.

फोटॉन (प्रकाशाचा कण) किंवा इलेक्ट्रॉन हे कधी लहरीसारखे वागतात तर कधी कणासारखे. पुंजयामिकी सिद्धांतानुसार अणूंच्या आतील क्रियांना - उदा. इलेक्ट्रॉन्सचे गतीचे नियम - हायझेनबर्गचे 'अनिश्चिततेचे' तत्त्व (uncertainty principle) लागू होते. या तत्त्वानुसार इलेक्ट्रॉनसारख्या आण्वीय कणाचे स्थान व त्याचा वेग या दोन्हीचीही निश्चिती एकाच वेळी करता येणे हे निर्विवादपणे अशक्य आहे. याचा अर्थ असा आहे की विश्वाच्या एका सूक्ष्म पातळीवर (अणूच्या) सुनिश्चितता नाही. हायझेनबर्गच्या अनिश्चिततेच्या मर्यादेमध्ये मॅक्स बॉर्नच्या संभवनीयतेच्या (statistical probability) तत्त्वावर काय संभाव्य आहे याचा अंदाज करता येतो.

पुंजयामिकीचा सिद्धांत हा प्रयोगात्मक विज्ञानाच्या (experimental science) क्षेत्रामध्ये अतिशय विश्वसनीय आहे. त्याने आजच्या इलेक्ट्रॉनिक्स या उपयोजित शास्त्राला बळकटी दिली आहे. परंतु त्याचा तत्त्वज्ञानात्मक नेमका अर्थ लावणे अतिशय अवघड बाब आहे. पुंजयामिकीच्या तत्त्वज्ञानात्मक अर्थाबद्दल दोन भौतिकशास्त्रज्ञांचेच एकमत नसते, तर परिवर्तनवाद्यांची व्यापक सहमती होणे अशक्य आहे.

'Doubt and Certainty' या पुस्तकामध्ये टोनी रॉथमन व जॉर्ज सुदर्शन या लेखकद्वयाने नवयुगवादी वैज्ञानिकांच्या तत्त्वांची, पुंजयामिकीच्या आधारावर अतिशय काळजीपूर्वक चिकित्सा केली आहे आणि त्यांच्या दाव्यामध्ये फारसा काही अर्थ नाही असा निष्कर्ष काढला आहे.

पुंजयामिकीव्यतिरिक्त दुसऱ्या प्रकारे कॅप्राच्या अलौकिक अनुभवावर भाष्य करता येऊ शकेल. समुद्रकिनारी तो बसला असता श्वासोच्छ्वासाची तो लयबद्धता अनुभवत असल्यामुळे त्याच्या मेंदूला प्राणवायूचा पुरवठा कमी झाला असेल. अशा अवस्थेमध्ये अलौकिक अनुभव येऊ शकतात, हे मानसशास्त्राने सिद्ध केले आहे. याही घटनेला (मेंदूमधील घडामोडी) काही पुंजयामिकीय आधार असेल. परंतु तो संबंध प्रस्थापित करून दाखविणे अवघड आहे आणि पुंजयामिकीपेक्षा मेंदूतील घडामोडी यांच्याशी आध्यात्मिक अनुभवाचा जास्त जवळचा संबंध आहे.

आध्यात्मिक प्रवृत्तीबरोबरच धर्म या संस्थेच्या भूमिकेचासुद्धा आढावा घेणे आवश्यक आहे. धर्म ही इतकी महत्त्वाची बाब आहे की जिच्याबद्दल परिवर्तनवाद्यांचे व्यापक सहमतीचे धोरण असणे आवश्यक आहे (जरी इहवादी कार्यकर्त्यांचा धर्मसंस्थेवर विश्वास नसला तरी).

प्राथमिक स्वरूपातील धार्मिक भावना किंवा अलौकिक विश्वास सर्व समाजांमध्ये आढळतात. या अर्थाने, या भावना जागतिक आहेत. 'beliefs in supernatural /religion' या गोष्टीचा समावेश मानवी वैश्विकांमध्ये (human universals) केला जातो. अशा प्रकारच्या वेगवेगळ्या मानवी वैश्विकांची डोनाल्ड ब्राऊन यांनी केलेली यादी 'The Blank State' या पुस्तकामध्ये दिली आहे. परिवर्तनवादी अभ्यासकांनी त्याची जरूर दखल घ्यावी. मानवी स्वभावाचा अभ्यास करण्यासाठी ही यादी उपयुक्त आहे.

धार्मिक भावना ही इतकी सार्वत्रिक प्रवृत्ती असल्यामुळे परिवर्तनवाद्यांनी तिच्याकडे दुर्लक्ष करणे अयोग्य होईल. संघ-विहिंपप्रणीत धार्मिक मूलतत्त्वावाद्यांचा प्रतिवाद करणे काही कठीण नाही. जगभरातील सर्व धार्मिक मूलतत्त्ववाद्यांना - ख्रिश्चन, मुस्लीम, ज्यु, बौद्ध इ. - नाकारणे तात्विकदृष्ट्या सहजशक्य आहे. कारण हा मूलतत्त्ववाद सहिष्णु नाही. तो सतत दुसऱ्या पक्षाचा तिटकारा, द्वेष करीत असतो. दुसऱ्या धर्माच्या द्वेषावरच त्यांचे अस्तित्व टिकून

अनुक्रमणिका

असते. महात्मा गांधीप्रणीत सौम्य व सहिष्णू हिंदू अस्मितेचा विरोध करणे (ते स्वत:ला सनातनी हिंदू मानत) सर्वोदय पुरस्कृत सर्वधर्मसमभाव याचा प्रतिवाद सातत्याने व कठोरपणे करीत राहणे हे अयोग्य आहे. इहवादी कार्यकर्त्यांनी या गोष्टी सोडून दिल्या तर परिवर्तनवाद्यांच्या व्यापक सहमतीच्या दृष्टिकोनातून सुयोग्य वातावरण तयार होईल. सहिष्णु, धार्मिक माणसे व त्यांच्या प्रामाणिक भावना यांच्याशी परिवर्तनवाद्यांचे शत्रुत्त्व असण्याचे काही कारण नाही.

वसंत पळशीकरांनी विचारवेध संमेलनाच्या अध्यक्ष-पदावरून खालील भूमिका मांडली जी या संदर्भात रास्त आहे.

'दुर्दैवाने स्वातंत्र्योत्तर काळात पुरोगामी, डाव्या, सेक्युलर परिवर्तनवादी चळवळीने, हिंदूधर्म समाजव्यवस्था व संस्कृती यांच्या परिष्करणाचा आग्रह राखण्याच्या भूमिकेचा त्याग करून, त्यांचा उच्छेद करण्याचीच मागणी आग्रहाने पुढे ठेवली आहे. महात्मा फुले व डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचा वारसा सांगत, समाजाचे पाऊल पुढे पडण्याची शर्त म्हणूनच ही मागणी ते करीत आहेत असे चित्र उभे राहिले आहे. जे जे हिंदू ते ते नाकारणे, जो,जो हिंदू त्याला त्याला प्रतिगामी, परिवर्तनाच्या विरोधी, हिंदुत्ववादी व शत्रू ठरविणे यावर जोर दिला जात आहे'.

पुढील समाजरचनेमध्ये धर्मभावना कमजोर होईल की बळकट होईल याबद्दल काही निश्चित भाकीत करणे कठीण आहे. धार्मिक भावना कमी होणे म्हणजे नक्की प्रगतीचे पाऊल आहे काय, याबद्दलही सांगणे यासाठी अवघड आहे की, एकूणच मानवी अस्तित्त्वाच्या समस्या जटिल आहेत. धार्मिक भावना, उत्क्रांतीच्या प्रक्रियेमध्ये त्याला जगण्यासाठी साहाय्य-भूत बाब म्हणूनच अस्तित्त्वात आली. तिचा एक 'मानवी वैश्विक' म्हणून उल्लेख केला जातो ते उगाचच नव्हे. जगभराच्या विविध समुदायांमध्ये ही भावना सार्वत्रिक आहे. त्यानंतर संघटित धर्म आले. हे सर्व संघटित धर्म, मानवी अस्तित्त्वासाठी साहाय्यभूत होते असे मात्र खात्रीने म्हणता येणार नाही. या सर्व संघटित धर्माची (हिंदू, मुस्लीम, बौद्ध, ख्रिश्चन, ज्यू इ.) इतिहासातील वाटचाल निव्वळ भूषणास्पद नाही. आजच्या घडीला हे मात्र नक्की, दुसऱ्यांचा द्वेष करणारा धार्मिक मूलतत्त्ववाद हा मानवी समाजाच्या प्रगतीला घातक आहे. सहिष्णू धार्मिक भावना पुढील वाटचालीसाठी कदाचित साहाय्यभूत ठरतीलही.

या सगळ्या तात्त्विक पार्श्वभूमीवर धर्मभावना नाकारणाऱ्या नास्तिक व इहवादी भूमिकेचे प्रयोजन काय आहे? प्राथमिक स्वरूपाच्या धार्मिक भावना ४०,००० ते ५,००० वर्षापूर्वी उत्क्रांत पावल्या. इहवादी व नास्तिक विचारांना इतका प्राचीन इतिहास नाही, त्यांचा इतिहास हा ५००० ते २००० वर्षे इतकाच प्राचीन आहे. धार्मिक भावनांना व्यक्तिगत व सार्वजनिक जीवनामध्ये काही स्थान न देता इहवादी बनणे हे काही अनारोग्याचे लक्षण नव्हे. नास्तिक व इहवादी भावनासुद्धा जीवन समर्थपणे व नीतिमत्तेने जगण्यास साहाय्यभूत असतात. इहवादीसुद्धा संतुलित विचारसरणीचा, आरोग्यवादी व नीतिमान राहू शकतो. तेवढी ताकद त्याने परिवर्तनाच्या प्रक्रियेमध्ये कमावली आहे.

नास्तिक माणसे जर बालपणी धार्मिक वातावरणा-मध्ये वाढली असतील तर, त्यांना ईश्वर व धर्मभावना नाकारण्यासाठी मानसिक संघर्ष करावा लागतोही, परंतु एकदा नास्तिक व इहवादी बनल्यावर त्यांना या भावना नाकारण्यासाठी फारसा मानसिक संघर्ष सहन करावा लागतोच असे नाही, कारण ती त्यांची सहजप्रवृत्ती बनून जाते. त्यांना कोणतेही आध्यात्मिक अनुभव येत नाहीत, अशी परिस्थिती घडते, यावर आध्यात्मिक प्रवृत्तीच्या माणसांनी विश्वास ठेवावा, व ते कोणत्याही विपश्यना, ध्यान-धारणा शिबिरात जात नाही याबद्दल त्यांना दोष देऊ नये, कारण त्यांना याची खरोखरच आवश्यकता नसते.

नास्तिक व इहवादी एकूणच संपूर्ण समाजामध्ये अल्पसंख्य असले तरी सध्या जगभराच्या सर्व समाजामध्ये त्यांची संख्या पसरली आहे, व ती पुढे वाढूही शकते. त्यांची पण एक जागतिक संस्कृती राहू शकते हे त्यांनी सिद्ध करून दाखविले आहे. सर्वसामान्यांना ही भीती राहू शकते की (आणि ती रास्त आहे) नास्तिकवाद्यांचे व इहवाद्यांचे रुपांतर (देवधर्माचे अधिष्ठान नसल्यामुळे) हे निर्दयी स्टॅलिनवाद्यां-मध्ये होईल. पण आता ही भीती फक्त त्यांच्यापुरतीच शिल्लक राहिली नाही. धार्मिकवाद्यांनी हे सिद्ध करून दाखविले आहे की त्यांचे रूपांतर तालिबानी किंवा मोदीवादी प्रवृत्तीमध्ये होऊ शकते.

परिवर्तनवाद्यांमध्ये धार्मिक व इहवादी या दोन्ही प्रवृत्तीची माणसे आहेत. त्यांचे सहमतीचे काय धोरण राहू शकते?

डोळस श्रद्धा जरूर असाव्यात. परंतु अंधश्रद्धांना, बुवाबाजीला थारा नको. धर्मभावनेचा आविष्कार शक्यतो

अनुक्रमणिका






वैयक्तिक जीवनात किंवा छोट्याशा समूहात व्हावा, परंतु समाजाच्या व्यापक पातळीवर त्याचा आग्रह धरू नये. इहवाद्यांनी प्रामाणिक, सहिष्णू धर्मभावनेचा आदर करू नये. तसेच धार्मिकांनी इहवाद्यांची हेटाळणी करू नये. मतपरिवर्तन करण्याची प्रत्येकाला मोकळीक असावी. परंतु हे प्रयत्न प्रामाणिक असावेत. द्वेषाला थारा नको.

धार्मिक भावनेबद्दल, ती एक 'मानवी वैश्विक' बाब आहे, हे तर सिद्ध झाले आहे. येथे वैश्विक म्हणजे पृथ्वीपुरताच मर्यादित, या अर्थाने घ्यायला पाहिजे. धार्मिक भावना ही ग्रहीय घटना (planetary phenomenon) आहे. ती खरोखरच वैश्विक घटना (cosmic phenomenon) असेल काय, हे आपण तपासून पाहू या. त्यासाठी आपणास जीवशास्त्रीय उत्क्रांतीची प्रक्रिया समजून घ्यावी लागेल.

आपल्या पृथ्वीवरील उत्क्रांतीचा इतिहास ४०० कोटी वर्षे इतका प्रदीर्घ असून, एकपेशीय सजीवापासून बहुपेशीय सजीव व माणूस हा प्रवास आहे. या प्रवासामध्ये जटिलता निर्विवादपणे वाढली असली तरी उत्क्रांतीची प्रक्रिया प्रगतीपर आहे काय, माणूस हा या प्रक्रियेचा सर्वोच्च आविष्कार आहे काय, या प्रश्नाचे उत्तर ठामपणे होय, असे देता येणे अवघड आहे.

पृथ्वीवर ज्याप्रमाणे ४०० कोटी वर्षांची उत्क्रांतीची प्रक्रिया घडली आहे, ती काही अटळपणे पूर्वनिश्चित स्वरूपाची (pre-determined) अशी प्रक्रिया नाही. एखादी ऑडिओ टेप पूर्णपणे गुंडाळली (rewind) व नंतर वाजवली तर ती पुन्हा पूर्वीसारखीच व त्याच क्रमाने वाजते, तशी उत्क्रांतीची प्रक्रिया असती तर ती गुंडाळली तर पुन्हा माणसाची उत्पत्ती व्हायला पाहिजे. परंतु असे होण्याची सुतराम शक्यता नाही. माणसाऐवजी दुसरा कोणताही आत्मभान असलेला बुद्धिमान प्राणी उत्क्रांत पावू शकतो. आणि तसे झाले तर त्या बुद्धिमान सजीवाच्या वैश्विक बाबी (universals) वेगळ्या राहू शकतील. याचा अर्थ असा की धार्मिक भावना सध्याच्या पृथ्वीच्या विशिष्ट ऐतिहासिक प्रक्रियेमध्ये 'वैश्विक' (planetary) असल्या तरी खऱ्या अर्थाने 'वैश्विक' (cosmic) असतीलच असे नव्हे.

वरील विधानाला आपण अजूनही दुसरे पैलू जोडू शकतो. समजा यदाकदाचित माणसासारखा माणूस उत्क्रांत पावला परंतु त्याच्या मेंदूच्या रचनेमध्ये काही बदल झाले तर, धार्मिक भावना तयार व्हायलाच पाहिजे असे नव्हे. आध्यात्मिक किंवा धार्मिक प्रवृत्तींच्या माणसांना संपूर्ण विश्वच (असंख्य तारे, तारकाकुले, ग्रह यांचा समुच्चय) आध्यात्मिक भावनांनी भारलेले आहे असे वाटते. या विश्वामध्ये असे असंख्य ग्रह असू शकतील, ज्यावर माणसासारखे बुद्धिमान व स्वजाणीव असलेले सजीव (परंतु ते माणसासारखे बिलकुल दिसणार नाही) उत्क्रांत पावलेले असू शकतील. याचा अभ्यास करणारे विज्ञान, परग्रहवासीय-जीवन-शास्त्र (The science of extraterrestrial life) हे जोतिषशास्त्रासारखे मिथ्याविज्ञान (pseudo-science) नाही.

खरोखरच आध्यात्मिक व धार्मिक भावना वैश्विक (cosmic) असल्या तर, त्याचा अनुभव येणारे असंख्य बुद्धिमान सजीव या विश्वामध्ये अस्तित्वात असतील. नेमकी परिस्थिती काय आहे, हे अजूनपर्यंत आपण परग्रहवासीयांच्या संपर्कात न आल्यामुळे, कळू शकत नाही. त्यामुळे धार्मिक भावना वैश्विक आहे की नाही, हा प्रश्न सध्यातरी अनुत्तरित आहे.

## रचनावादी दृष्टिकोनाचा प्रभाव

परिवर्तनवाद्यांच्या एका विशिष्ट वर्तुळामध्ये रचनावादी (design) दृष्टिकोन खूप लोकप्रिय आहे आणि या दृष्टिकोनावर विश्वास असणारी संख्या परिवर्तनवाद्यांमध्ये भरपूर आहे. साधारणत: नवयुगवादी कार्यकर्त्यांचा (new age activists) रचनावादी दृष्टिकोनावर खूप विश्वास असतो. या विश्वासातून ते परिवर्तनवादी कार्य करीत असतात.

रचनावाद्यांच्या दृष्टिकोनातून संपूर्ण विश्व व सजीवसृष्टी ही एक भव्य रचना (grand design) आहे. (सृष्टी ही एक भव्य-दिव्य रचना आहे असे एकदा मानले की या रचनेमागे कोणी रचनाकार (designer) ईश्वर असेल, असे मानणे ओघाओघानेच आलेच!) या रचनावादी दृष्टिकोनाला 'मानवीय तत्त्वाने' (anthropic principle) भक्कम आधार दिला आहे.

माणूस हा या विश्वामध्ये अस्तित्वात यावा या हेतूनेच या संपूर्ण विश्वाची निर्मिती झाली आहे, असे मानवीय तत्त्वाचे प्रतिपादन आहे. विश्वातील अनेक स्थिरांकांच्या (constants) किंमती आज आहेत त्यापेक्षा थोड्या जरी वेगळ्या असत्या, तरी माणूस अस्तित्वात आला नसता.

गुरूत्वाकर्षण बल, सशक्त आण्विक बल (strong

अनुक्रमणिका

nuclear force), अशक्त आण्विक बल (weak nuclear force), विद्युतचुंबकीय बल, हे विश्वातील सर्व रचनांचा (तारे, तारकाकुले, ग्रह, जीवसृष्टी) मूलाधार आहेत. या चार बलांच्या आज ज्या किंमती आहेत त्यात अतिसूक्ष्म जरी फरक पडला असता तरी विश्वामध्ये स्थिर रचना अस्तित्त्वात आल्या नसत्या, पर्यायाने जीवसृष्टी व मानवाची निर्मिती झाली नसती. मानवाची निर्मिती या विश्वामध्ये शक्य व्हावी म्हणून आज या सर्व स्थिरांकांच्या योग्य किंमती आढळून येतात. त्याच बरोबर इलेक्ट्रॉन व प्रोट्रॉन यांच्या वस्तुमानाचे गुणोत्तर, विश्वाच्या प्रसरणाचा वेग, विश्वाची एकविधता (homogeneity of universe), विश्वाचे वस्तुमान, प्रोट्रॉन कणाची स्थिरता, इत्यादी स्थिरांकांच्या किंमती इतक्या अचूकपणे जुळल्या आहेत (fine tuned) की जीवसृष्टीच्या उत्क्रांतीसाठी आवश्यक असणारी सर्व परिस्थिती निर्माण व्हावी व मानवाची उत्पत्ती शक्य व्हावी.

आता हे सत्य आहे की या विश्वामध्ये जे काही घडते, त्याला या सर्व गोष्टी कारणीभूत आहेत. हे सर्व काही असेच आहे म्हणून माणूस विश्वामधील अब्जावधी ताऱ्यांमधून (विश्वातील एकूण ताऱ्यांची संख्या $१०^{२२}$, एकावर बावीस शुन्ये) एका ताऱ्याच्या ग्रहावर अस्तित्त्वात आला आणि वैश्विक घटनांचा अर्थ लावू शकला. आणि हे विश्व कसे भव्य, दिव्य आहे, याचा त्याला साक्षात्कार होऊ शकला.

याच रचनावादी दृष्टिकोनाच्या संदर्भात, मानवी समाजरचनेतील परिवर्तनाची प्रक्रिया बघितली तर असा निष्कर्ष काढला जाऊ शकतो की सध्या ज्या काही गंभीर समस्या आहेत त्या तात्कालिक आहेत, अंतिमत: समाजरचना प्रगतीच्या दिशेनेच वाटचाल करील. पृथ्वीवरील जैविक रचना व मानवी समाजरचना अंतिमत: शुभाकडेच वाटचाल करीत आहे, हा एक आशावादी दृष्टिकोन म्हणून ठीक आहे. परंतु हा आशावाद नवयुगवादी परिवर्तनवाद्यांकडून भाबड्या पद्धतीने व्यक्त होतो आहे; त्यामुळे या युगातील कळीच्या प्रश्नांना परिवर्तनवादी सामोरे जात नाहीत.

भव्य 'रचना' या पलिकडे जाऊन विचार केला तर, विश्वाच्या स्वरुपाच्या संदर्भात रचनावादी दृष्टिकोनाची मर्यादा लक्षात येऊ शकते.

महास्फोटाच्या सिद्धांतानुसार (big bang theory) आपले विश्व १५०० कोटी वर्षांपूर्वी निर्माण झाले आणि त्याच वेळेस स्थळ, काळाची निर्मिती झाली. सध्या विश्व हे प्रसरण पावत असून अजून काही अब्ज वर्षे ते प्रसरण पावत राहील. विश्व हे सतत प्रसरण पावत राहील व लाखो अब्ज वर्षानंतर ($१०^{१०५}$ वर्षे, एकावर एकशे पाच शून्य वर्षे) त्याचा उष्णीय मृत्यू (heat death) होईल, की काही अब्ज वर्षानंतर ते महाअंत:स्फोटाच्या अवस्थेला (big crunch) जाऊन पोहचेल, यापैकी काय नेमके घडू शकेल, हे, विश्व खुले आहे की बंद आहे यावर अवलंबून आहे. यामध्ये काही वैश्विक परिमाणे अजून अज्ञात आहेत (जसे विश्वामध्ये एकूण किती वस्तुमान आहे, सीमान्त घनता किती आहे, न्यूट्रिनो कणांना वस्तुमान आहे काय? इत्यादी) त्यामुळे विश्वशास्त्रज्ञ अजूनही विश्वाच्या भवितव्याविषयी काही नेमके निष्कर्ष काढू शकत नाहीत.

आपले विश्व हे एकुलते एक आहे काय, या प्रश्नाचे उत्तर असे की ते कदाचित एकमेव नसेल, ते एका बहुविश्वाचा (multiple universe) भाग असू शकते. या बहुविश्वामधील वेगवेगळ्या विश्वांमध्ये मूलभूत बलांची किंमत वेगवेगळी राहू शकते किंवा इतर प्रकारची बले राहू शकतात आणि त्या विश्वामध्ये स्थिर रचना एकतर असणार नाही किंवा असतील तर सर्वस्वी अनाकलनीय अशा स्वरुपाच्या असतील. सध्याच्या मानवी ज्ञानाच्या मर्यादा आपणास याबद्दल काही ठाम निष्कर्ष काढू देत नाहीत, परंतु याचे आपण भाकीत करू शकतो की ज्या विश्वामध्ये स्थिर संरचना (stable structures) नाहीत आणि माणसासारखा आत्मभान असणारा व विश्वाचा अर्थ लावू पाहणारा बुद्धिमान सजीव नाही, त्या विश्वामध्ये अशा प्रकारचे प्रश्न उद्‌भवणार नाही.

वरील दृष्टिकोन आपणास रचनावाद्यांच्या विचारांतील मर्यादा जाणवून देतो. रचनावाद्यांवर जो भव्य दिव्य रचनांचा प्रभाव असतो तो किती निष्फळ आहे, ते येथे कळते. याचा अर्थ असा नव्हे की वैश्विक जीवनाला काही नीतिनियम नाहीत, त्यांच्या अस्तित्त्वामागे काही उद्देश नाही, जीवन हे निरर्थक आहे. याचा अर्थ एवढाच आहे की मानवकेंद्री नीतिमूल्यांच्या, आकलनाच्या काही मूलभूत मर्यादा आहेत. आपणास वाटते तसे रचनांचे नियम एकमेवाद्वितीय नाहीत. तसेच रचना प्रगतीकडे वाटचाल करू शकतात किंवा विनाशही पावू शकतात.

सजीव सृष्टी ही एक अचूक रचना आहे. त्यामुळे मानव हा सृष्टीचा अचूक नमुना (perfect design) आहे, अशा प्रकारच्या विचारसरणीचा फोलपणा येथे आपणास कळू





शकतो. दुर्दैवाने परिवर्तनवाद्यांमध्ये हीच रचनावादी विचार-सरणी खूप लोकप्रिय आहे. अंतिमत: सगळे काही ठीकठाक होईल या विचारांचा पगडा सर्वसामान्यांवर आहे आणि तो परिवर्तनवाद्यांवरही आहे. जीवन जगण्यासाठी अशा गोष्टींचा आधार असतो हे तर खरे आहेच, परंतु सध्याच्या समाज-रचनेच्या समस्या इतक्या गंभीर होत चालल्या आहेत की त्यावर योग्य उपाययोजना करण्यासाठी हे एवढे पुरेसे नाही.

या सर्व तात्त्विक पार्श्वभूमीवर आपण परिवर्तन-वाद्यांच्या कार्याचे मूल्यमापन करू या.

### परिवर्तनवाद्यांच्या कार्याचे मूल्यमापन

परिवर्तनवाद्यांमध्ये दोन प्रकाराचे पक्ष आहेत. एक आहे परिवर्तनवादी चळवळ, दुसरा पक्ष आहे, स्वयंस्फूर्त संस्था. अर्थात दोन्हीमध्ये काही वॉटर टाईट कंपार्टमेंट नाही. परिवर्तनवादी चळवळ एखाद्या स्वयंसेवी संस्थेचे संचालन करीत असते किंवा एखादी स्वयंस्फूर्त संस्था परिवर्तनवादी चळवळीचे सूत्रसंचालन करीत असते.

परिवर्तनवादी चळवळी या साधारणत: संघर्षवादी असतात. जेथे कोठे अन्याय असेल, शोषण असेल, विनाशकारी विकासाचा प्रकल्प राबविला जाणार असेल तेथे तेथे त्याविरुद्ध जनमत जागृत करून, संघर्षाचा पवित्रा घेऊन, त्या त्या प्रश्नाची तड लावणे अशा प्रकारे चळवळीतील कार्यकर्ते काम करीत असतात. कधी कधी हा लढा नर्मदा बचाव आंदोलन सारखा स्थानिक स्वरुपाचा असतो तर कधी कधी हा लढा जागतिक व्यापार परिषद (WTO) यांच्या धोरणाविरुद्ध, जगभरातील कार्यकर्त्यांचे आंदोलन अशा स्वरूपाचा व्यापक असतो. परिवर्तनवादी चळवळीचे वैशिष्ट्य हे असते, लढा स्थानिक असो वा व्यापक स्वरूपाचा, परिवर्तनवादी कार्यकर्त्यांची तात्त्विक भूमिका एक ना एक प्रकारे वैश्विक असते. समाजपरिवर्तनाची दिशा कशी असावी अशा प्रकारचे त्यांचे व्यापक चिंतन असते.

परिवर्तनवादी चळवळीचे आर्थिक स्रोत हे लोक-वर्गणी, देणगी अशा स्वरूपाचे असतात. कार्यकर्ते हे एकतर पूर्णवेळचे असतात किंवा आपापला नोकरीधंदा सांभाळून अर्धवेळ कार्य करणारे असतात. पूर्णवेळचे कार्यकर्ते हे एकतर कोठून तरी मिळणाऱ्या मानधनावर जीवन जगत असतात किंवा ते आपला खर्च कौटुंबिक नात्यातून भागवितात. नवरा नोकरी करतो, बायको पूर्णवेळची कार्यकर्ती किंवा याच्या उलटही. क्वचितच मित्रपरिवाराच्या मदतीनेसुद्धा संसार चालविला जातो. साधारणपणे ज्यांच्या चळवळी व्यावसायिक असत नाहीत, ध्येयवादी असतात, अशा कार्यकर्त्यांच्या खर्चाचे आधार प्रामाणिक असतात आणि त्यांचे राहणीमान त्यांच्या सामाजिक-आर्थिक पार्श्वभूमीवर तुलनेने साधेच असते.

परिवर्तनवादी चळवळीच्या तुलनेमध्ये स्वयंस्फूर्त संस्था ह्या संघर्षात्मक कार्यापेक्षा रचनात्मक कार्यामध्ये जास्त गुंतलेल्या असतात. यातील कार्यकर्तेसुद्धा पूर्णवेळचे किंवा अर्धवेळचे असतात. स्वयंसेवी संस्थांना रचनात्मक कार्य करण्यासाठी देणग्या, लोकवर्गणी किंवा देशी, विदेशी फंडिंग एजन्सीकडून प्रकल्पाधारित रक्कम मिळत असते. साधारणत: स्वयंस्फूर्त संस्था एक ना एक प्रकारे शाश्वत विकासाचे (sustainable development) काम करीत असतात. (या लेखाच्या मर्यादेमध्ये आपण निव्वळ भूतदयावादी, कल्याण-कारी कामाचा विचार करणार नाही) यामध्ये शाश्वत शेती, पाणलोट क्षेत्रविकास, जलव्यवस्थापनाच्या सुयोग्य पद्धती, सुयोग्य तंत्रज्ञान, पर्यायी ऊर्जा, पर्यायी आरोग्य व शिक्षण व्यवस्था, आदिवासी, स्त्री, दलित इत्यादी दुर्बळ घटकांचे सबलीकरण, मानवी हक्कांची धोरणवकिली, इत्यादी कार्यांचा समावेश होतो. यात कार्य करणारे व्यावसायिक कार्यकर्ते सोडले तर (अर्थातच स्वयंस्फूर्त चळवळीपेक्षा स्वयंस्फूर्त संस्थांमध्ये व्यावसायिक कार्यकर्ते जास्त आढळतात, या वस्तुस्थितीमागे बरीच कारणे आहेत, त्यामधील एक महत्त्वाचे कारण हे आहे की तेथे तुलनेने जास्त पैसा मिळतो) जे ध्येयवादी कार्यकर्ते असतात त्यांची जीवनदृष्टी व्यापक असते; अंतिमत: समाजपरिवर्तनाच्या उद्देशातून त्यांनी हे कार्यक्षेत्र निवडलेले असते.

समाजपरिवर्तनाच्या वाटचालीमध्ये या दोन्ही भूमिका महत्त्वाच्या असतात. संघर्षात्मक चळवळींना रचनात्मक कार्याची जोड न मिळाल्यास समाजपरिवर्तनाचे कार्य अधूरे राहील. स्वयंसेवी संस्थांनी सूक्ष्म पातळीवर (micro-leveol) शाश्वत विकासाचे उत्कृष्ट नमुने सिद्ध करून दाखविले आहेत. शाश्वत शेतीपासून ते सुयोग्य तंत्रज्ञानापर्यंत पर्यायी विकासाचे आर्थिक व सामाजिकदृष्ट्या, समतामूलक, किफायतशीर, नमुने (models) रचनात्मक कार्याद्वारा सध्या उपलब्ध झाले आहेत. स्वयंस्फूर्त कार्यकर्ते हे चळवळीतील कार्यकर्त्यापेक्षा जास्त पैसा मिळवू शकत असल्यामुळे त्यांचे राहणीमान त्यांच्या तुलनेमध्ये जास्त समृद्ध

असते. अर्थातच येथे सुद्धा ध्येयवादी कार्यकर्ते त्यांच्या आर्थिक-सामाजिक पार्श्वभूमीवर तुलनेने कमी पैशातच भागवत असतात. (दोन्ही पक्षांचे राहणीमान साधेच असावे ही आदर्शाची परिस्थिती आहे आणि ज्याने त्याने प्रामाणिकपणे व अंतर्मुख होऊन हे आदर्श पाळावेत.)

परिवर्तनवादी चळवळी व स्वंयस्फूर्त संस्था या परस्परपूरक असल्या तरी त्यांच्यामध्ये कधीकधी एक प्रकारचे हेवेदावे असतात. जनसामान्यांना - ज्यांचा या कार्यामुळे काही लाभ होत नाही त्यांचा - स्वयंस्फूर्त संस्थांबद्दल एक आकस असतो व तो आपण समजू शकतो. परंतु चळवळीतील कार्यकर्त्यांनाही त्यांच्याबद्दल आकस असू शकतो. याबद्दल, संघर्षात्मक चळवळीपुढे रचनात्मक कार्याची कनिष्ठता हा दृष्टिकोन असला तरी, संस्थांच्या कार्यकर्त्यांचे राहणीमान हा आकसाचा मुद्दा असतो, व तो एकदम बिनबुडाचा आहे असे नव्हे. सध्या एक व्यापक सर्वेक्षणात्मक अभ्यासाची आवश्यकता आहे. ज्यामध्ये चळवळीतील कार्यकर्ते व संस्थात्मक कार्यकर्ते यांच्या राहणीमानाचे तुलनात्मक मूल्यमापन व्हावे. या दोघांमध्ये सरासरी किती तफावत आहे हे बघितले जावे.

स्वयंस्फूर्त कार्याबद्दल अगदी टोकाची भूमिका शरद जोशी यांनी खालील शब्दांमध्ये व्यक्त केली आहे.

"या देशातील जे स्वयंस्फूर्त कार्य गेल्या वीस-पंचवीस वर्षांत मी बघितले त्यावरून माझे अशा कार्याविषयीचे मत प्रतिकूल झाले आहे. कार्यकर्त्यांचा छुपा पण प्रखर अहंकार, त्यांची ढोंगबाजी, त्यांची नाटके, सेवेच्या बुरख्याखाली स्वत:ची सोय पाहणे, त्यांच्यातले हेवेदावे, त्यांच्यातील व्यासंगाचा अभाव, मूळ प्रश्न टाळून उगाचच काहीतरी छोटेसे पॅचवर्क स्वरूपाचे कार्य करीत राहण्याची आत्मगत प्रवृत्ती हे सगळे विचारात घेता अशा स्वरूपाच्या कामाची समाजाला काही आवश्यकता नाही असे माझे स्पष्ट मत आहे."

कदाचित इतक्या टोकाची आक्षेपाची भूमिका सर्वसामान्य चळवळीतील कार्यकर्त्यांची नसेलही; परंतु स्वयंस्फूर्त कार्यकर्त्यांबद्दल रोष आहे हे नक्की.

स्वयंस्फूर्त संस्थांबद्दलच्या रास्त आक्षेपाचा आपण येथे विचार करू या.

संस्थांचे कार्यकर्ते चळवळीमध्ये सहभागी होत नाहीत, हा एक प्रमुख आक्षेप आहे. याचे उत्तर असे आहे की हा ज्याच्या त्याच्या पिंडाचा प्रश्न आहे. कोणाला रचनात्मक कार्याची रुची असते. तर कोणाचा पिंड असतो संघर्षात्मक चळवळीचा आणि कोणी या सर्व प्रक्रियेचे साहाय्यभूत असे अभ्यासक असतात. प्रत्येकाला आपापल्या कार्यासाठी अवकाश असतो, ज्याने त्याने आपापला पिंड पाहूनच कार्य करावे. या सर्वांच्या कामाचे नेटवर्किंग होऊ शकत नाही असे नाही. सर्वांचा एका सामूहिक ध्येयाचा कार्यक्रम आखला जाऊ शकतो, त्यासाठी प्रामाणिक प्रयत्न करावे लागतील.

या आक्षेपाचे शेवटचे तार्किक टोक परिवर्तनवाद्यांचा राजकीय प्रक्रियेमध्ये सहभाग, येथपर्यंत जाऊन पोहचू शकते. राजकारण हे इतके महत्त्वाचे क्षेत्र आहे की (या लेखामध्ये पुढे आपण त्याचा विचार करणारच आहोत) परिवर्तनवाद्यांनी त्यापासून दूर राहिल्यास समाजपरिवर्तनाचे पुढचे पाऊल समर्थपणे टाकता येणार नाही. अशा परिस्थितीमध्ये सगळेच परिवर्तनवादी राजकीय प्रक्रियेमध्ये सहभागी होऊ शकतील काय? शक्यच नाही. हा पुन्हा पिंडाचा प्रश्न आहे. काहीच परिवर्तनवाद्यांना या प्रक्रियेमध्ये सहभागी होण्याची रुची असू शकते.

दुसरा मुद्दा आहे, संस्थात्मक कार्यकर्त्यांच्या राहणीमानाच्या दर्जाचा. व्यावसायिक (सामाजिक) कार्यकर्त्यांचा आपण येथे विचार करू नये, कारण त्यांचा दृष्टिकोन व्यावसायिक असतो. शाळा, कॉलेज, कारखाना, सरकारी नोकरी किंवा इतर कोठे नोकरी केली तर जो पैसा मिळतो, तो येथे मिळतो म्हणून शुद्ध नोकरी करणे हा त्यांचा दृष्टिकोन असतो. ते चंगळवादी असतात यात फारसे काही आश्चर्य नाही. पाणलोटक्षेत्र विकास किंवा संपूर्ण स्वच्छता कार्यक्रम यामध्ये पैसा भरपूर मिळतो म्हणून त्यामध्ये खूप व्यावसायिक स्वयंसेवी संस्था घुसल्या आहेत, त्यांच्यामुळे स्वयंस्फूर्त संस्था बदनाम होत नाहीत, कारण त्यांच्याकडून कोणीच फारशी अपेक्षा करीत नाही.

परंतु जेव्हा ध्येयवादी कार्यकर्ते, ज्यांनी प्रामाणिकपणे व मेहनतीने संस्थेची उभारणी केली ते, चंगळवादी होऊ लागतात, तेव्हा खूप वाईट वाटते. अशा कार्यकर्त्यांमुळे खरे पाहता स्वयंस्फूर्त संस्था/चळवळ बदनाम होते. त्यामुळे अस्सल परिवर्तनवादी स्वयंस्फूर्त संस्थेमध्ये पंचतारांकित राहणीमानाला थारा नको.

सर्वात दुर्दैवाची परिस्थिती जेव्हा चांगल्या ध्येयवादी संस्थेतील संपूर्ण ध्येयवाद संपून जातो, तेव्हा असते. त्याच्यासारखी क्लेशकारक परिस्थिती दुसरी कोणती नसते.

अनुक्रमणिका








सध्या काही संस्थांची परिस्थिती अशी झाली आहे की ज्या मोजक्याच ध्येयवादी कार्यकर्त्यांनी संस्था काही वर्षापूर्वी सुरु केली, त्यांचे नेतृत्त्व संपल्यावर हळूहळू जे फक्त नोकरी म्हणून संस्थेमध्ये काम करायला आले (बऱ्याच वेळा स्वयंस्फूर्त कार्याचा पसारा जेव्हा वाढतो, तेव्हा ध्येयवादी कार्यकर्ते उपलब्ध न झाल्यामुळे व्यावसायिक कार्यकर्त्यांना कामावर ठेवावे लागते) त्यांनी हळूहळू संस्था आपल्या कब्जात आणण्यास सुरुवात करावी आणि बघताबघता त्या संस्थेचे नैतिक अधपत:न सुरु व्हावे!

ही दुख:दायक परिस्थिती आपण कशी टाळू शकतो? एकतर संस्थेच्या कामाचा पसारा खूप वाढवू नये, दुसरा मार्ग असा की ध्येयवादी नेतृत्त्वाची दुसरी फळी तयार करावी व संस्था हळूहळू त्यांच्या ताब्यात द्यावी. तिसरा मार्ग, जेव्हा संस्थेतील ध्येयवाद लोप पावतो तेव्ह संस्थेचे विसर्जन करावे. संस्थासंचालनाचे अजूनही काही प्रामाणिक मार्ग असू शकतात. त्यांची वाट चोखाळावी. शेवटी स्वयंस्फूर्त संस्था एक प्रयोगच आहे. यामध्ये कटू अनुभव आले तरी नाउमेद होण्याचे कारण नाही.

परिवर्तनवादी चळवळ आणि स्वयंस्फूर्त संस्था यांच्या कार्याला आपापल्या मर्यादा आहेतच. टोकाची भूमिका न घेता त्या एकमेकांना पूरक कशा होतील याची प्रामाणिक वाट शोधली पाहिजे. सर्व चळवळी किंवा सर्व स्वयंस्फूर्त संस्था बंद कराव्यात, हा दृष्टिकोन अंतिमत: घातक आहे.

माणसामध्ये स्वार्थाची भावना असते हे तर खरेच, परंतु तेवढेच म्हणणे पुरेसे नाही. स्वार्थाबरोबर त्याला परमार्थ साधण्याची प्रामाणिक इच्छा असते. स्वार्थ आहे याचा अर्थ परमार्थ आहे हे नाकारणे नव्हे. स्वयंस्फूर्त संस्थांमध्ये कार्य करताना परमार्थ साधताना स्वार्थही साधता आला (जीवन जगण्याचा सृजनशील मार्ग या अर्थाने) तरते उत्तमच आहे.

काही स्वयंस्फूर्त संस्था/कार्यकर्ते यांना समाजसेवी किंवा स्वयंसेवी संस्था/कार्यकर्ता असे संबोधणे आवडत नाही. सेवा या शब्दाबद्दल सौम्य आक्षेप समजू शकतो. निव्वळ रिलीफ वर्कपुरते - ते ही कधीकधी आवश्यक असते - कार्य सीमित न ठेवता त्यापलीकडे जाऊन लोकांना आपले प्रश्न सोडविण्यासाठी प्रवृत्त करणे, लोकांसमोर पर्यायी पद्धती ठेवणे, हे ध्येय जास्त योग्य आहे. परंतु सेवा या शब्दाचा तिटकारा, 'माणूस हा स्वार्थी आहे, मला आवडते म्हणून मी हे कार्य करतो, मला कोणाची सेवा करयची नाही' अशा शब्दामध्ये जेव्हा व्यक्त केली जाते, तेव्हा एकाच वेळेस त्या कार्यकर्त्याचा अहंकार व न्यूनगंड या दोन्ही प्रवृत्ती दिसून येतात. न्यूनगंड या अर्थाने की सेवा म्हटले की समानुभूती, परमार्थ, वैश्विक परस्परावलंबन इतक्या गोष्टी मान्य कराव्या लागतात. आणि हेच नेमके मान्य करताना त्यांना आपल्यात काही कमी आहे असे वाटून, ते कबूल करणे जड जाते.

सर्वात शेवटी स्वयंस्फूर्त कार्याची मूलभूत आवश्यकता आहे काय, या प्रश्नाला आपल्याला सामोरे जावे लागेलच. स्वयंस्फूर्त कार्याचे प्रयोजन अजून संपले नाही हे ठासून सांगण्याची तयारी ठेवावी लागेल. ज्याने त्याने फक्त आपापले पाहावे, या दृष्टिकोनातून सध्या समाजाच्या समस्या आटोक्याच्या बाहेर होत चालल्या आहेत. जो तो आपापल्या पिंडानुसार कार्य करीत असला तरी त्याचे नेटवर्किंग होऊ शकते, सर्वांचे एक सहमतीचे धोरण व कृति-कार्यक्रम होऊ शकतो आणि ग्रहीय आरोग्याचा सर्वसमावेशक मुद्दा जेव्हा ऐरणीवर येतो, तेव्हा सर्वसहमतीचे मार्ग चोखाळणे अत्यावश्यक होते.

लोकसहभाग व लोकांनीच स्वत:चे प्रश्न सोडवावेत, याची गरज तर आहेच, परंतु यामध्ये आजकाल कार्यकर्ते जी पोपटपंची करतात ती मात्र उबग आणणारी असते. सर्वच जर लोकांकडून आपसूक होणार असेल तर परिवर्तनवादी चळवळ व संस्था यांची आवश्यकता काय आहे?

स्वयंस्फूर्त संस्थांची एका मर्यादेमध्ये समाजाला गरज आहे, हे ठासून सांगण्याची आता वेळ आली आहे. मिलिंद बोकील यांनी खालील शब्दांमध्ये स्वयंस्फूर्त संस्थांची आवश्यकता याबद्दल उत्कृष्ट मांडणी केली आहे.

'नियमाची गुलाम असणारी शासनसंस्था, स्वार्थाने आंधळी होणारी बाजारपेठी व्यवस्था आणि स्थितिवादी धर्म ह्यांच्या मर्यादा उल्लंघून जाणारी एक पर्यायी यंत्रणा किंवा माध्यम समाजास आवश्यक असते आणि हे माध्यम म्हणजे स्वयंस्फूर्त संस्था, ही त्याची खरी ओळख आहे'.

### परिवर्तनवाद्यांचा राजकारणाशी संबंध

परिवर्तनवाद्यांचे राजकारणाशी काय संबंध असावेत हा एक कळीचा प्रश्न आहे. आजच्या अर्थव्यवस्थेचे व समाजव्यवस्थेचे नियंत्रण राष्ट्र-राज्यव्यवस्थेद्वारा होत असते. ऐतिहासिक कालापासून म्हणजे ४०००-५००० वर्षापासून कोणत्या ना कोणत्या प्रकारची राज्यव्यवस्था अस्तित्वात होती.

देशांतर्गत व जागतिक पातळीवर आता सध्याच्या राज्यव्यवस्थेचे जनसामान्यांप्रति असलेले उत्तरदायित्त्व दिवसेंदिवस कमी होत चालले आहे. लोकशाहीप्रधान राज्यव्यवस्था ही सध्याच्या काळामध्ये सर्वोत्तम असली तरी ती सध्या लोकांच्या व परिवर्तनवाद्यांच्या अपेक्षा पूर्ण करण्यामध्ये अपयशी ठरली आहे.

आपण प्रथम देशांतर्गत राज्यव्यवस्थेचा विचार करू या. आजच्या देशांतर्गत अर्थव्यवस्थेची व राज्यव्यवस्थेची परिस्थिती आता हाताबाहेर गेली आहे. सध्याचे त्याबद्दलचे वास्तव इतके विदारक आहे की परिवर्तनवाद्यांना ते सुधारण्याचा काहीच मार्ग दिसत नाही. एकेकाळी परिवर्तन-वाद्यांना - म्हणजे २५-५० वर्षापूर्वी - राज्यव्यवस्थेमध्ये हस्तक्षेप करण्यास थोडाफार अवकाश उपलब्ध होता. समाजवादी, शेकाप, मार्क्सवादी, काँग्रेसअंतर्गत काही गट, हे परिवर्तन-वाद्यांना अनुकूल असे पक्ष तेव्हा उपलब्ध होते. परंतु आता राजकीय हस्तक्षेपाचा अवकाशच संपुष्टात आल्यासारखा आहे. काँग्रेस हा मध्यममार्गी पक्ष आहे व तो कधीच पुरोगामी किंवा परिवर्तनवादी नव्हता, पण त्याच्या राजकारणाचे झपाट्याने भाजपकरण होत आहे. समाधानाची बाब ही आहे की काँग्रेस भाजपासारखे उघड-उघड धार्मिक मूलतत्त्ववादी राजकारण करीत नाही. परिवर्तनवाद्यांचा भरवसा तिसऱ्या आघाडीवर होता, (भाजप व काँग्रेस सोडून) पण आता तिसऱ्या आघाडीचा अवकाश जवळजवळ नष्ट झाला आहे. लोहियावादाचे आता हिणकस अशा मुलायम व लालूप्रणीत राजकारणामध्ये रूपांतर झाले आहे. सध्या भारतीय राज-कारणामध्ये इतक्या परस्परविरोधी संधीसाधू अशा प्रादेशिक पक्षांचा बोलबाला आहे की त्यांच्यापासून संघराज्य व्यवस्थेला धोका पोहचत आहे.

आपण जागतिक राजकारणाचा सध्याचा पोत काय आहे ते बघू या. जागतिक राजकारणाची सध्याची परिस्थिती अतिशय विदारक आहे. सोव्हिएत रशियाप्रणीत समाजवादी राज्यव्यवस्था कोसळून पडल्यावर अमेरिकेच्या साम्राज्यवादी धोरणाला काही अटकाव उरला नाही. त्यांच्या हितरक्षणासाठी सगळे जगच त्यांना जणू काही खुले झाले आहे, संयुक्त राष्ट्रसंघ बड्या साम्राज्यवादी राष्ट्रांचा गुलाम झाला आहे. त्यांच्या हिताच्या दावणीला जागतिक बँक, विश्वव्यापार संघटन, आंतरराष्ट्रीय नाणे निधी (IMF) सारख्या आंतरराष्ट्रीय वित्त संस्था बांधल्या गेल्या आहेत. मक्तेदारी भांडवलशाहीसाठी त्यांनी जागतिकीकरण हे गोंडस नाव दिले आहे. नैसर्गिक साधनसंपत्तीची अंदाधुंद लूट करून विनाशकारी विकास घडवून आणण्यासाठी 'खाउजा' (खाजगीकरण, उदारीकरण, जागतिकीकरण) नीती सध्या कटिबद्ध आहे.

काही लोकांचा प्रश्न असा असतो की आजच्या युगातील जीवनमान वैश्विक आहे, त्यामुळे जागतिकी-करणाला आपण कसा काय विरोध करू शकतो? अर्थातच त्यावर आपली वैचारिक स्पष्टता हवी. जागतिकीकरणाला विरोध म्हणजे (बड्या राष्ट्रांनी हुशारीने नियम बनवून आपणास काही पण विकायचे, परंतु आपला माल मात्र निकृष्ट दर्जाचा ठरवून त्याला नाकारायचे) फक्त मक्तेदारी भांडवलशाहीला विरोध, जागतिकीकरणाला विरोध म्हणजे जागतिक किंवा ग्रहीय परिप्रेक्ष्याला नाकारणे नव्हे. भविष्यामध्ये वैश्विक स्वरुपाची लोकशाहीप्रधान समाजरचना (आज युरोपातील राष्ट्रे युरोपियन कम्युनिटीच्या स्वरुपांत एकत्र आली आहेत तसे) अस्तित्त्वात येणार असेल तर त्याला आमचा विरोध नाही, ही वैचारिक स्पष्टता हवी.

आज बड्या राष्ट्रांबरोबर जगातील इतर सर्व राष्ट्रे आपापल्या परीने नैसर्गिक साधनसंपत्तीची लूट करण्यामध्ये गुंतली आहेत, त्यामुळे पृथ्वीवरील जैव-पर्यावरणीय व्यवस्था (bio-ecological system) धोक्यात आली आहे. नैसर्गिक संसाधनांचा वापर इतक्या मोठ्या प्रमाणावर आहे की जागतिक लोकसंख्या पुढे १०-१५ अब्जांवर स्थिरावली तरी सर्वांनाच अमेरिकेतील दरडोई जीवनमानाचा स्तर गाठून तो कायम ठेवायचा म्हटला तर येणाऱ्या एका सहस्रकामध्ये असंख्य सूर्याएवढे वस्तुमान खर्च होईल. येथे हे लक्षात ठेवले पाहिजे, पृथ्वीपेक्षा सूर्याचे वस्तुमान हजारो पटीने जास्त आहे. आणि या सर्वांसाठी दरवर्षी विकासाच्या ६-८ % वाढीव दराने तर शेकडो सूर्याएवढे वस्तुमान खर्च होईल.

पृथ्वी ही बंदिस्त प्रणाली (closed system) आहे, त्यामुळे प्रचलित विकासाचा दर अगदीच अशक्यप्राय आहे, तो या शतकातच बंद व्हायला पाहिजे. आपली सध्याची विज्ञान-तंत्रज्ञानात्मक प्रगती पाहता आंतरग्रहीय किंवा आंतरतारीय नैसर्गिक संसाधने आपणास वापरायला मिळणार नाहीत, भलेही आंतरराष्ट्रीय साधनसामग्री आम्हाला कशीही लुटता आली तरीही!

दोन विचारवंतांनी या चिंताजनक परिस्थितीबद्दल गंभीर

इशारा देऊन ठेवला आहे. 'एकॉलॉजिस्ट' या नियतकालिकाचे संपादक एडवर्ड गोल्डस्मिथ ह्यांनी काही वर्षापूर्वीच इशारा दिला होता की, पृथ्वीवरील जैव-पर्यावरणीय व्यवस्था वाचविण्यासाठी ५००० दिवसांमध्ये काही गंभीर उपाययोजना केली नाही तर भयंकर वैश्विक आपत्ती येऊ शकते. हा इशारा आपणास फार हास्यास्पद किंवा निराशावादी वाटू शकतो. कारण दोनशे वर्षापूर्वीच्या माल्थसला व जॉर्ज ऑर्वेलच्या '१९८४' ला इतिहासाने खोटे ठरविले आहे. (खरेच का?) आता गोल्डस्मिथसारखे पर्यावरणवादी जे परिघावरचे विचारवंत आहेत (marginal thikers) त्यांना फारसे गंभीरपणे घ्यायचे नसेल तर मार्टीन रीजसारखे विश्वशास्त्रज्ञ, जे मुख्य प्रवाहातील विचारवंत (mainstream thikers) आहेत त्यांचा इशारा आपण लक्षात घेऊ या. त्यांनी सांगून ठेवले आहे की एकविसावे शतक कदाचित मानवी समाजव्यवस्थेचे शेवटचे शतक असेल. विनाशकारी संकटातून वाचण्याची शक्यता फक्त ५० % आहे.

पर्यावरणाचा ढासळणारा समतोल या गोष्टीचा, राजकारणाच्या संदर्भात विचार करण्याचे कारण हे आहे की आजचे अर्थकारणाचे व विज्ञान-तंत्रज्ञानात्मक हस्तक्षेपाचे धोरण, राजनीतीच ठरवीत असते. प्रत्येक समस्येवर विज्ञान-तंत्रज्ञानप्रणीत योग्य तोडगा असतो, त्यातून अर्थव्यवस्थेचा गाडा सुधारता येऊ शकतो, हा भ्रम राज्यव्यवस्थेने सर्वदूर पसरविला आहे. उदा. पाणी समस्येवर ५ लाख कोटी रु. खर्च करून आंतरनदीय जोडणी करा इ. ह्याशिवाय एक स्वप्न दाखविले जात आहे की पृथ्वीबाहेर सूर्यमालिकेतील इतर योग्य ग्रहावर मनुष्यवस्ती करता येईल किंवा आपल्या सूर्य-मालिकेच्या बाहेर दुसऱ्या सूर्यमालिकेतील योग्य ग्रहावर वसाहत करता येईल. उद्याची तंत्रज्ञानात्मक प्रगती काय असेल याचे आत्ता भाकीत करणे कठीण आहे. परंतु हा दावा अशक्यप्राय जरी नसला तरी सहजसाध्यसुद्धा नाही. यात फक्त इतकीच जोड द्यावी लागेल की प्रदूषणाच्या विळख्यात सापडलेल्या व जीवन जगण्यासाठी आवश्यक साधन-सामुग्रीपासून वंचित अशा बहुसंख्य सर्वसामान्यांना हे शक्य न होता, काही मूठभर अभिजन, दुसऱ्या ग्रहावर राहायला जाऊन विनाशापासून आपली सुटका करून घेतील.

मार्टीन रीजच्या गंभीर इशाऱ्यामध्ये, पर्यावरणाचा समतोल ढासळणे, ग्लोबल वॉर्मिंग, जैवविविधता ऱ्हास, किरणोत्सारी प्रदूषण, ॲटमबॉम्बचा वापर, बायोटेक्नोलॉजी-मधील घातक प्रयोग, या बाबींबरोबर, (जी इतरही पर्यावरणवादी वैज्ञानिकांची मांडणी असते) त्यांनी एकविसाव्या शतकातील येऊ घातलेल्या तंत्रवैज्ञानिक क्रांतीची दिशा याचाही समावेश केला आहे. नॅनोमशीन्स, सुपर इंटेलिजन्ट कॉम्प्युटर, विश्वशास्त्राच्या प्रयोगामध्ये वापरले जाणारे महाप्रचंड ऊर्जानिर्मिती करणारे पार्टिकल ॲक्सेलरेटर (particle accelerator) या सर्व क्षेत्रातील तंत्रवैज्ञानिक प्रगतीचा, पृथ्वीचा विनाश घडवून आणण्यामध्ये सहभाग राहू शकतो, ही गंभीर चेतावणी त्यांनी दिली आहे. तात्पर्य हे की कोणतीही तंत्रवैज्ञानिक क्रांती ही मूल्यनिरपेक्ष असते, हा भ्रम राजकारण्यांनी बाळगला तरी, परिवर्तनवाद्यांनी तो बाळगू नये.

या सगळ्या विनाशकारी गोष्टींचा परिणाम काय असू शकतो? आपल्यामधील काही मोजकी चतुर व श्रीमंत माणसे दुसऱ्या ग्रहावर वस्ती करायला निघून जातील. पृथ्वीवर मात्र मानवजातीच्या विनाशाबरोबरच इतर असंख्य जीवजातींचा विनाश होईल. यात शक्यता ही आहे की काही जीवाणू (hyperthermophiles आणि extremophiles) जे समुद्राच्या तळाशी ज्वालामुखीच्या सान्निध्यात १००० से. पेक्षा जास्त तापमानावर सुद्धा जिवंत राहतात किंवा २-३ कि.मी. खोलवर भूगर्भामध्ये अतिशय तप्त वातावरणात जीवन जगू शकतात, ते फक्त वाचतील. सूर्य आणखी ५०० कोटी वर्षे अस्तित्वात राहणार असल्यामुळे, पृथ्वीवरील उत्क्रांतीची प्रक्रिया थांबणार नाही. उत्क्रांतीची प्रक्रिया पुढे चालविण्याची जबाबदारी पुन्हा एकदा एकपेशीय सजीवावर येईल. ही प्रक्रिया, रिवाईन्ड होऊन पुन्हा पहिलीसारखीच चालणाऱ्या टेपसारखी नसल्यामुळे, माणसासारखा आत्मभान असलेला, बुद्धिमान सजीव उत्क्रांत पावण्याची शक्यता अतिशय कमी आहे.

या संदर्भात हे उल्लेखनीय आहे की पृथ्वीवरील कोणतीही जीवजात ही अंतिमत: विनाश पावणारीच असते. जीवजातींचे सरासरी अस्तित्त्व हे ८० लाख ते १ कोटी वर्षांचे असते. माणसाचा उत्क्रांतीचा इतिहास हा फक्त २० लाख वर्षांचा आहे. अजून लाखो वर्षे तो अस्तित्त्वात राहू शकतो.

या पार्श्वभूमीवर परिवर्तनवादी काय हस्तक्षेप करु शकतात, हा कळीचा प्रश्न आहे. देशांतर्गत व जागतिक पातळीवर कोठेही ही प्रक्रिया थांबविण्याची आणि प्रचलित अर्थ-राजकीय व्यवस्थेचा मूलभूत पोत बदलण्याची ताकद, परिवर्तनवाद्यांची

नाही. परिवर्तनवाद्यांनी आपल्या ताकदी-विषयी उगीचच भ्रम बाळगू नये. परंतु परिवर्तनवाद्यांना एक मात्र नक्की करता येऊ शकते. या संभाव्य संकटाबद्दल भाबड्या आशावादाला थारा न देता त्यांनी आपलेच प्रबोधन करुन घ्यावे आणि अर्थ-राज्यव्यवस्थेतील निवडक संवेदनशील व्यक्तिंना, समूहांना याबद्दल सजग करुन धोरणात्मक बदल घडवून आणण्यासाठी प्रवृत्त करावे. या प्रक्रियेने थोडीशी जरी गती (momentum) पकडली तरी पुढे त्याचा मोठा परिणाम होऊ शकेल.

जागतिक अर्थ-राजनीतीला योग्य दिशा देण्यासाठी संयुक्त राष्ट्रसंघ व जागतिक बँक, WTO, IMF, हे सपशेल अपयशी ठरल्यामुळे दुसरे पर्याय शोधणे आवश्यक आहे. जॉर्ज मॉनबियाट याने एक पर्याय सुचविला आहे, जो अतिशय उपयुक्त ठरु शकेल.

जॉर्ज मॉनिबियाट यांच्या मते लोकशाहीप्रधान पर्यायी संसदेची स्थापना करण्याचा आपण सर्वांनी गांभीर्याने विचार करावा. सध्याच्या संयुक्त राष्ट्रसंघामध्ये देश लहान असो की मोठा, प्रत्येक राष्ट्राला एका मताचा अधिकार व स्थायी सदस्यांना व्हेटो वापरण्याचा अधिकार असतो. या योजनेमुळे ५ बडी राष्ट्रे आपल्या हिताला अनुकूल असेच निर्णय घडवून आणतात. प्रस्तावित पर्यायी जागतिक संसदेमध्ये लोकसंख्यानुसार (प्रत्येक १ कोटी लोकसंख्यामागे १ मत) मताचा अधिकार असेल. सध्याची लोकसंख्या ६०० कोटींची असल्यामुळे जागतिक संसद ही ६०० प्रतिनिधींची असेल व ते जागतिक अर्थ-राजकारणामध्ये परिणामकारक हस्तक्षेपाची भूमिका ठरवतील. या पर्यायी संसदेमध्ये कोणालाही व्हेटोचा अधिकार राहणार नाही. प्रतिनिधी निवडीची प्रक्रिया व जागतिक संसदेचे कामकाज लोकशाही पद्धतीचे चालेल.

अशा प्रकारची पर्यायी जागतिक संसद स्थापण्यास सध्याच्या राष्ट्रराज्यांकडून विरोध होऊ शकेल. परंतु परिवर्तनवाद्यांनी पुरेशी जनजागृती घडवून आणली आणि प्रसंगी संघर्षाची भूमिका घेतली तर ती भविष्यामध्ये अस्तित्त्वात येऊ शकेल.

सध्या 'जागतिक सामाजिक मंच' (WSF) हे एक पर्यायी व्यासपीठ, परिवर्तनवाद्यांच्या प्रयत्नातून अस्तित्त्वात आले आहे. राजकीय हस्तक्षेपाचे अजूनही काही मार्ग असू शकतात. परिवर्तनवाद्यांना, याबद्दल व्यापक विचारमंथन करुन व कृतिकार्यक्रम आखून या संदर्भात पुढील पावले उचलता येतील.

एक मात्र नक्की, कुमार सप्तर्षी यांची ही भूमिका योग्य आहे की 'सामाजिक कार्यकर्त्यांनी आम्ही अराजकीय आहोत असा दावा करणे योग्य होणार नाही. ते राजकीयदृष्ट्या रास्त भूमिका घेणारे असावे लागतील'.

### परिवर्तनवाद्यांनी टाळावयाचे धोके

परिवर्तनवाद्यांना कार्यक्रमाच्या अंमलबजावणीची धोरणे आखताना अतिसुलभीकरणाचे (oversimplification) मार्ग टाळावे लागतील. परिवर्तनवाद्यांचे काही आवडते सिद्धात असतात. त्या सिद्धांतांची मर्यादा लक्षात घ्यावी लागेल. कोणत्या संदर्भात ते लागू पडतील याचा पण सारासार विचार करावा लागेल. यासाठी त्यांना वैश्विक दृष्टिकोन योग्य ती मदत करु शकेल. हा मुद्दा खालील काही प्रतिनिधिक उदाहरणांवरुन स्पष्ट होऊ शकेल.

१. विकेन्द्रीकरणाचे धोरण चांगले असते. परंतु विकेन्द्रीकरणाचे जसे फायदे आहेत तसे तोटेही असू शकतात. पंचायतराज्य व्यवस्था जर योग्य पद्धतीने राबविली गेली नाही तर भ्रष्टाचाराला खूप वाव मिळतो, आणि स्थानिक स्वरुपाचा भ्रष्टाचार हा काही व्यापक पद्धतीच्या भ्रष्टाचारापेक्षा कमी धोकादायक नसतो. अंतिमत: ज्यांच्या हितासाठी ही व्यवस्था आहे, त्यांना तिचा काही लाभ होत नाही.

२. संगणक क्रांती, माहिती तंत्रज्ञान क्रांती खूप फायदेशीर आहे. अर्थव्यवस्थेचे विकेन्द्रीकरण होते, दळणवळणातील वेळ वाचतो, जग हे वैश्विक ग्राम झाले आहे. माणसे एकमेकांच्या जवळ येत चालली आहे, अंतिमत: जग हे ज्ञानाधरित असेल, इत्यादी.

संगणक क्रांतीने संपर्काच्या काही समस्या नक्कीच सोडवल्या आहेत. काही क्षेत्रामध्ये संगणक अत्यावश्यक आहे. परंतु सरसकट संगणकाची भलावण करु नये. संगणकाने काही क्षेत्रामध्ये उत्पादन-व्यवस्थेचे स्थलांतर, शेअर बाजारातील चढ-उतार, हे सर्व संगणक क्रांतीनेच व्यापक झाले आहे. संगणक व इतर इलेक्ट्रॉनिक्स वस्तू यांनी मानवी जीवन सुलभ केले असले तरी त्यांच्या अंदाधुंद वापरामुळे, इलेक्ट्रॉनिक्स कचऱ्याच्या प्रदूषणकारी समस्येने अक्राळ विक्राळ रुप धारण केले आहे. चंगळवादाला प्रोत्साहन दिले जात आहे. ज्ञानापेक्षा माहितीचा महापूर आला आहे. जगभराच्या तरुणांनी, मूलभूत उत्पादन










प्रक्रिया, जीवनाला आधारभूत असलेली बायोमास उत्पादन प्रक्रिया आणि त्याला साहाय्यभूत असणारे उद्योगधंदे यामध्ये सहभागी होण्याऐवजी त्यांना संगणक/इलेक्ट्रॉनिक्सच्या निरर्थक जाळ्यामध्ये ओढले आहे. या क्षेत्रामध्ये काही लाख लोकांना रोजगार मिळाला असेल परंतु कोट्यावधी लोकांचा रोजगार हिरावून घेतला आहे.

सायबर क्रांतीपायी चंद्राबाबू नायडूंच्या आंध्र-प्रदेशामध्ये शेतीव्यवस्थेकडे दुर्लक्ष्य केले गेले आणि शेतकरी देशोधडीला लागले.

दुसरा धोका असा आहे की संगणक-क्रांतीमधून पुढे सुपर इंटेलिजन्ट कॉम्प्युटर्स निघतील आणि माणसाचे माणूसपण हरवून त्याचे मशिनीकरण होईल. त्यामुळे एकूणच तंत्रवैज्ञानिक प्रगतीचा पुरस्कार करण्यासंबंधीचा दृष्टिकोन तारतम्य बाळगणारा ठेवावा लागेल.

३. अपारंपरिक पर्यायी ऊर्जा (renewable energy) अतिशय उपयुक्त व प्रदूषणविरहित आहे. परंतु पुढील जगातील ऊर्जेची समस्या, ऊर्जेची मागणी कितीही वाढली तरी, ही अपारंपरिक ऊर्जा सोडवू शकते हा एक भ्रम सध्या आहे. आपली समाजरचना तंत्रवैज्ञानिक प्रगतीच्या (त्याच्या जोडीने अधोगतीच्या पण) अत्युच्च पातळीला येऊन पोहचण्यामध्ये पारंपरिक, अश्मीभूत स्वस्त इंधनाची (कोळसा, खनिज तेल, नैसर्गिक वायू इ.) महत्त्वाची भूमिका राहिली आहे. सध्या एकूणच जगात मुठभर समृद्धीची बेटे निर्माण झाली आहेत आणि त्यांना चंगळवादाची सूज आली आहे. त्यामध्ये या स्वस्त नैसर्गिक संसाधनांचा फार मोठा हातभार राहिला आहे. कारण आजच्या जागतिक अर्थव्यवस्थेची प्रमुख ऊर्जा तीच आहे. आता येणाऱ्या ५०-१०० वर्षामध्ये ही अश्मीभूत ऊर्जा पूर्णपणे संपुष्टात येईल, तेव्हा या समृद्धीच्या बेटांचे काय होईल हे पाहणे उद्बोधक होईल. अपारंपरिक ऊर्जा या अश्मीभूत इंधनाची जागा भरून काढील काय? मुळीच नाही. सध्याच्या ऊर्जा-वापराच्या वाढीव दराशी समतुल्य ऊर्जा-निर्मितीचे उद्दिष्ट तिला गाठावे लागेल, त्यामुळे प्रदूषण न करता व्यापक प्रमाणावरची ही ऊर्जा-निर्मिती शक्य नाही. सौर ऊर्जा, बायोमास ऊर्जा, पवन ऊर्जा, वापरामध्ये काही फारसे प्रदूषण होत नसेल तरी या ऊर्जा साधनांच्या निर्मितीमध्ये मात्र भरपूर प्रमाणात प्रदूषण होते. उदा. सोलर फोटोव्होल्टाईक पॅनेलच्या व इलेक्ट्रॉनिक्सच्या निर्मिती-मध्ये पर्यावरणाचे प्रदूषण होतेच. त्यामुळे मानवाला आपल्या गरजा सीमित ठेवल्याशिवाय दुसरा कोणताही पर्याय नाही. मानवाच्या वीस लाख वर्षाच्या इतिहासातील गेली २००-३०० वर्षे ही समृद्धीची राहिली (जुन्या काळच्या कोणत्याही राजा-महाराजापेक्षा आजच्या उच्च मध्यमवर्गानेसुद्धा जास्त नैसर्गिक संसाधने वापरली) आणि अजून पुढे ५०-१०० वर्षे कदाचित समृद्धीची राहतील, पण याला कोठेतरी लगाम बसणार आहे.

### परिवर्तनवाद्यांसमोरील आव्हाने

संपूर्ण पृथ्वी ही एक सजीव संरचना (living organism) आहे असा जेम्स लवनॉकचा गैया अभ्युपगम (Gaia hypothesis) सांगतो. त्याने दिलेला हा दर्जा सर्वानाच पटेल असे नाही. हे मात्र सत्य आहे की आपले मूलभूत अस्तित्त्वच पृथ्वीच्या जैविक आरोग्यावर (biospheric health) अवलंबून आहे. त्यामुळे या परिसंस्थेच्या शाश्वत संवर्धनासाठी आणि तदनुषंगाने आत्ताची अर्थ-राजकीय व्यवस्था कशी असावी व पुढे तिने कसा आकार घ्यावा यासाठी नैसर्गिक संसाधनांच्या मर्यादा राहणारच. या मर्यादा आपण ओलांडण्याच्या - तंत्रवैज्ञानिक प्रगतीने - प्रयत्न केला तर त्यात नवीनच समस्या उभ्या राहणार. यावर आपण तोडगा काढू शकतो हा आपला भ्रम आहे. नैसर्गिक प्रक्रिया या उत्तमप्रकारे चक्रीय (cyclic) आणि जटिल असतात. त्यांचे सदृशीकरण (simulation) करणे अशक्यप्राय नाही, पण कठीण नक्कीच आहे. त्यात माणूसपण हरवण्याचा धोका आहे.

सायबर क्रांतीचा अतिरेक, जैवविविधता नष्ट होणे, नैसर्गिक संसाधनांचा अमर्यादित वापर, भयानक गतीने वाढणारे प्रदूषण, दहशतवादी ॲटमबॉम्ब, आंतरराष्ट्रीय झेनोफोबिक धोरणे, माणसांना कोठल्याही वाटेवर घेऊन जाऊ शकतात. निसर्गामध्ये स्वयंसेवी संघटनेची व प्रक्रिया दुरुस्तीची स्वयंप्रेरणा असते. ही गोष्ट खरी असली तरी प्रक्रिया हाताबाहेर गेली तर विनाश अटळ असतो; हे आतापर्यंत उत्क्रांतीच्या प्रक्रियेमध्ये (५७ कोटी वर्षामध्ये) ५ वेळा घडले आहे (५० ते ९० % जीवजातींचा विनाश) माणूस हा आत्मभान असलेला कितीही बुद्धिमान प्राणी असला तरी अनियंत्रित प्रक्रियेने (runaway process) त्याचा ही विनाश घडून येऊ शकतो, हे लक्षात घेऊन पुढची पाऊले योग्यच राहतील, हे आव्हान स्वीकारावे लागणार आहे, आणि तेथेच आपल्या सर्वांचा कस लागणार आहे.

आपल्याला देशांतर्गत लोकशाहीप्रधान समाज-व्यवस्था टिकवायची आहे. त्याच बरोबर आंतरराष्ट्रीय राजकारणाचा पोतही खराखुरा वैश्विक व लोकशाहीप्रधान राहील याची काळजी

घ्यायची आहे. लोकशाहीपेक्षा दुसरी सर्वोत्तम व्यवस्था अजून इतिहासाच्या वाटचालीमध्ये आपणास सापडली नाही. परिवर्तनवाद्यांची अंतिमत: राजकीय प्रक्रियेपासून अलिप्तता राहू शकणार नाही. अर्थव्यवस्था शाश्वत विकासाची कशी राहील हे राजकीय हस्तक्षेपावरच अवलंबून राहील.

परिवर्तनवाद्यांची सध्याची ताकद मर्यादित आहे. त्याचबरोबर गेल्या २०-३० वर्षांमध्ये ही ताकद न वाढता ती घटलेलीच आहे. त्यामुळे आपल्या क्षमतेबद्दल कोणाचाही भ्रम नको. याचा अर्थ परिवर्तनवाद्यांनी काहीच करू नये, हातपाय गाळून भूमिगत राहावे असे नाही. परिवर्तन-वाद्यांबद्दल एकूणच समाजामध्ये फारशी आपुलकीची भावना असेलच असे नाही. युटोपियन, आदर्शवादी, परंतु भ्रष्टाचार सहन करणारे, अशी त्यांच्याबद्दलची प्रतिमा असू शकते. महात्मी गांधींच्या काळामध्ये समाजसेवकाबद्दल जो आदर होता, तो आता राहिला नाही. 'सगळेच चोर आहेत' ही आजची आवडती विचारसरणी होत चालली आहे. अशा प्रतिकूल परिस्थितीमध्ये परिवर्तनवाद्यांनी 'पणती जपून ठेवा, अंधार फार झाला' ही विचारसरणी मनात गृहीत धरून आपापले कार्य करीत राहावे.

समाजपरिवर्तनाच्या प्रक्रियेमध्ये चळवळ, स्वयंस्फूर्त संस्था आणि याला सहाय्यभूत असणारे अभ्यासक या तिन्ही घटकांचे महत्त्व राहणार आहे, याबद्दल आपल्या मनात संभ्रम नको. तसेच परिवर्तनवाद्यांमध्ये व्यापक सहमतीचे धोरण असले तरी मतभिन्नता ही राहणारच. ही मतभिन्नता सिद्धांत, धोरण, तात्कालिक व दूर दृष्टिकोनातली उद्दिष्ट्ये, या चारही बाबीविषयी राहणार. मानवी स्वभावाचा (human nature) अभ्यास हे दर्शवितो की जीवनदृष्टीमध्ये (world-view) फरक हा राहणारच. मानवी स्वभाव ही काही अति स्थिर संरचना नाही. तिला ही परिवर्तनाचे गतिशास्त्र लागू आहे. पुढे मानवी स्वभावामध्ये फरक पडला तरी व क्लोनिंगचे कितीही प्रयोग झाले तरी त्यामध्ये विचारांचे मोनोकल्चर होणार नाही, बहुविधता टिकून राहील, हे माणूसपणाचे सत्त्व राहणार आहे, त्यामुळे एकाच तत्त्वप्रणालीने सर्व जग भारावून जाईल हा धोका नाही, हे लक्षात घ्यावे. परस्परांमध्ये मतभिन्नता असली तरी तो परिवर्तनवाद्यांचा दुबळेपणा राहणार नाही. उलट हे त्याचे बलस्थान राहील. मतभिन्नतेमुळे परिवर्तन-वाद्यांतर्गत हुकूमशाहीला वाव राहणार नाही, परिवर्तनाची प्रक्रिया एकांगी राहणार नाही.

परिवर्तनवाद्यांमध्ये लोकशाहीचे धोरण आवश्यक आहे. टीकाटीप्पणी, प्रसंगी हेटाळणी, उपेक्षा सहन करण्याची आपणा सर्वांना तयारी ठेवावी लागणार आहे. 'अंतिमत: सत्याचा विजय होतो', असा विश्वास कोणाचा असल्यास, या प्रक्रियेमध्ये त्याचाही कस लागणार आहे.

परिवर्तनवाद्यांमध्ये परस्परसंबंधात स्वीकारार्हतेबद्दल सगळ्या समस्या आहेतच, तर जनसामान्यांमध्ये त्यापेक्षा जास्तच असणार. जनसामान्यांच्या सहभागाबद्दल जसे अतिसुलभीकरण नको तसेच त्यांना बरोबर न घेण्याची भूमिका नको. याच बरोबर परिवर्तनवाद्यांना शासनसंस्थेचे सहकार्य घ्यावे लागेल, प्रसंगी त्यांच्याशी संघर्ष करावा लागेल. या प्रक्रियेमध्ये पुन्हा उपेक्षा, हेटाळणी, हेतुबद्दल साशंकता, कोर्टकचेऱ्या, खटले, वाळीत टाकणे, सर्वात शेवटी नेस्तनाबूत करणे, या सर्व बाबींना तोंड द्यावे लागणार आहे.

एकट्या परिवर्तनवाद्यांकडून समाजपरिवर्तनाचे शिव-धनुष्य पेलवणार नाही, त्यामध्ये सर्वांचाच सहभाग आवश्यक आहे. आज दुसरे कोणी हे प्रश्न ऐरणीवर आणत नाहीत म्हणून परिवर्तनवाद्यांना हस्तक्षेपाची भूमिका पुढाकार घेऊन पार पाडावी लागत आहे.

परिवर्तनवाद्यांना जे परिवर्तन झपाट्याने व्हावे असे वाटते त्याची गती खरोखरच तशी राहील याची काहीही खात्री देता येणार नाही. सर्वांना बरोबर घेऊन चालायचे म्हटल्यावर त्याची गती धीमी राहणार, याची त्यांनी जाणीव ठेवावी.

या लेखाच्या मर्यादेमध्ये व्यापक परिप्रेक्ष्याची (वैश्विक) मांडणी केल्यामुळे ती विस्कळीत राहिली आहे, याची मला जाणीव आहे. याबद्दल पुढे मी पुस्तकरूपाने विस्तृत अशी मांडणी करण्याचा प्रयत्न करणार आहे आणि तरीही ती परिपूर्ण नक्कीच असणार नाही, याला जशा मानवी ज्ञानाच्या मर्यादा आहेत तशा माझ्या आकलनाच्या मर्यादा राहणार आहेत. समाज-परिवर्तनाच्या संदर्भात या आधीही पुष्कळांनी मांडणी केलेली आहे आणि पुढेही पुष्कळजण मांडणी करीतच राहतील. तरीही मतभिन्नता राहणारच. विचारांची बहुविधता हे आरोग्याचे लक्षण आहे. आणि आपल्या आरोग्यासोबत ग्रहीय आरोग्याचा (planetary health) घट्ट बांधणीचा मुद्दा तर आहेच!

या विचारमंथनातून व किमान कृतिकार्यक्रमा-वरील सामूहिक सहमतीमधून नवीन मन्वंतर घडेल अशी आपण सर्वजण आशा करू या.

❖❖❖

# समाजवादासंबंधी प्रश्नपत्रिका

## डॉ० सुभाष आठल्ये

तुमच्या मनातील, कल्पनेतील समाजवादाविषयी खालील प्रश्नांची उत्तरे द्यावी

१. साम्यवाद (कम्युनिझम, मार्क्सिझम) व समाजवाद हे एकच आहेत काय?

२. नसल्यास त्यांमधील महत्त्वाचे फरक कोणते ते खालील मुद्यांच्या आधारे लिहावे, किंवा आणखी मुद्दे जोडावे.

२.१ कामगार वर्गाची हुकूमशाही

२.२ उत्पादन साधने वैयक्तिक मालकीची असावी की समाजाच्या?

२.३ उत्पादन साधने समाजाच्या मालकीची म्हणजे कोणाच्या-राज्य शासनाच्या की अन्य कोणाच्या?

२.४ खाजगी मालमत्ता असावी काय? असावी असे मत असेल तर तीवर मर्यादा काय असावी? ती कोणी व कशी अमलात आणावी?

२.५ वैयक्तिक किंवा कुटुंबाच्या मासिक उत्पन्नावर मर्यादा काय असावी? ती मर्यादा कोणी व कशी अमलात आणावी?

२.६ सेवा-उद्योग- ज्यात कोणतेही उत्पादन होत नाही - खाजगी असावे की सरकारी?

२.७ उत्पादित व कच्च्या मालाचा साठा व वितरण, तसेच धान्याचे/फळांचे प्रक्रिया, साठा व वितरण खाजगी-रीत्या व्हावे की सरकारीरीत्या? की दोन्ही?

२.७ (अ) शासनाने अन्नधान्याचा बफर स्टॉक किती ठेवावा? उत्पादित सर्व शेती उत्पादन शासनाने विकत घेणे कितपत योग्य ठरेल?

(ब) शासनाने विकत घेतलेल्या कृषी मालाची साठवणूक, वितरण इ. वर होणारा खर्च, त्याची सांडलवंड, कीड लागणे यामुळे होणारे नुकसान यांची भरपाई कशी करायची?

(क) यामुळे अन्नधान्याची विक्रीची किंमत वाढून दारिद्र्य रेषेखालील लोकांना त्या परवडेनाशा होतात. त्यासाठी मग पुन्हा सरकारला त्यावर सबसिडी द्यावी लागते. हा खर्च चिरंजीवी अर्थव्यवस्थेला पूरक ठरेल की मारक? हीच गोष्ट सर्व सरकारी उत्पादनांच्या बाबतीत लागू होते काय?

२.८ वरील २.७ मधील गोष्टी खाजगी क्षेत्रात ठेवायच्या असल्या तर त्यावर सरकारी नियंत्रणे किती प्रमाणावर असावी?

३. नफा म्हणजे शोषण हे आपल्याला मान्य आहे काय?

३.१ प्रायसिंग पॉलिसी कशी अवलंबावयाची? सरकारने दूध, ब्रेड इ. नित्याच्या वापराच्या वस्तूंचे उत्पादन व विक्री आपल्या हाती घेताना ना नफा ना तोटा तत्त्वावर उत्पादने जनतेला उपलब्ध करून देऊ असे म्हटले होते. पण अनावश्यक खर्चाचे अनेक घटक या उत्पादनाशी निगडीत होतात व उत्पादन खर्च वाढतो. अशावेळी लावलेली किंमत 'रास्त' म्हणता येईल का?

३.२ समाजवादी समाजरचनेत सर्व गोष्टी शासनाने पुरवाव्यात असे ठरवले तर व्यक्ती स्वातंत्र्याचे, कोणालाही कोणताही व्यवसाय निवडीच्या घटनेने दिलेल्या स्वातंत्र्याचे काय?

४. भांडवलाची उभारणी कशी करावी? समाजवादी रचनेत भांडवलाची आवश्यकता असते काय?

५. भागधारकांना लाभांश द्यावा काय? नफ्याच्या किती भाग भागधारकांना द्यावा?

६. भांडवल बाजाराची, शेअर बाजाराची आवश्यकता समाजवादी रचनेत आहे का? खाजगी भागधारकांना आपली गुंतवणूक परत मिळविण्याचा हक्क आहे का? शेअर बाजार नसल्यास ती गुंतवणूक परत करण्याची दुसरी कोणती व्यवस्था समाजवादी रचनेत आहे?

७. विषमता काही प्रमाणात सह्य व आवश्यक असते काय?

८. कोणत्या कारणाने निर्माण झालेली विषमता न्याय्य व सहन करण्यासारखी असते? कोणत्या कारणाने निर्माण झालेली विषमता अन्याय्य व सहन करण्यासारखी असते, की जिचे निर्मूलन कोणतीही किंमत देऊन समाजवादी रचनेत होणे अत्यावश्यक आहे?

९. उच्चतम वेतन (उत्पन्न) व नीचतम वेतन (उत्पन्न) यांचे प्रमाण काय असावे? हे समाजवादी रचनेत ठरवून देऊन त्याची अंमलबजावणी करावी काय? कशी करावी? त्या अंमलबजावणीचे परिणाम काय होतील?

१०. सध्याची लोकशाही चालू ठेवल्यास, निवडून आलेल्या पक्षाने समाजवादी धोरणे न राबवता भांडवलशाही धोरणे राबवली तर काय करणार? लोकशाही समाजवादामध्ये निवडून

अनुक्रमणिका






आलेल्या सरकारवर समाजवादी धोरणाची जबरदस्ती कशी करणार? केल्यास ते लोकशाहीला धरुन होईल की कसे?

११. लोकशाही समाजवाद व समाजवादी लोकशाही असे दोन शब्दप्रयोग करण्यात येतात. त्यात तुम्हाला काय फरक दिसतो?

१२. सध्याच्या सरकारी उद्योगधंद्याच्या खाजगीकरण, निर्गुंतवणुकीकरण करण्याच्या धोरणाबाबत एक समाजवादी म्हणून आपले मत काय आहे?

१३. शेती, उद्योगव्यवसायावरील- कोटा, लायसेन्स, इन्स्पेक्टर्स, नियंत्रणे वगैरे कमी व्हायला हवीत का अधिक सर्वकष व्हायला हवीत?

१४. आयात-निर्यातीवरील निर्बंध व कर/ अनुदाने कमी केल्यास भारतीय उद्योग/ सेवा/ शेती परकीय स्पर्धेला चांगल्या रितीने तोंड देईल असे तुम्हाला वाटते की तसा आत्मविश्वास तुम्हाला नाही? या बाबतीत आजता-गायतचा अनुभव आपल्यामागे कसा आहे?

१५. पूर्ण समता असल्याशिवाय लोकशाही राबवता येणे शक्य नाही, तसा प्रयत्नच करु नये असे आपले मत आहे काय?

१६. समाजवादी शासनात आर्थिक शिस्त आवश्यक आहे काय? तुटीचा अर्थभरणा किंवा कर्जभरणा किती प्रमाणात असावा? शासनाच्या उत्पन्नाच्या किती टक्के भाग शासकीय कर्मचाऱ्याचे वेतन व इतर एस्टॅब्लिशमेंट यासाठी खर्च व्हावा?

१७. शासकीय व खाजगी कर्मचाऱ्यांना नोकरीची, बढतीची, निवृत्ती वेतनाची शाश्वती किती प्रमाणात असावी?

१८. कल्याणकारी धोरणाबद्दल आपले मत काय आहे? (कल्याणकारी धोरणे म्हणजे बेकारी, गरिबी, वृद्धत्त्व, शारीरिक व मानसिक अपंगत्त्व, सामाजिक मागासलेपण, पोरकेपण अशा विविध कारणांनी मागे पडणाऱ्या (Handicapped) व्यक्तींना खास भत्ते, सोयी व सवलती देऊन त्यांचे जीवन सुसह्य करणे.)

१९. ओ.बी.सी., शेड्युल्ड कास्टस् व ट्राइब्स वगैरेना मिळणाऱ्या सवलती मधून त्यांच्यामधील क्रीमी लेयरला वगळण्याबद्दल आपले काय मत आहे?

२०. काम मिळणे हा प्रत्येकाचा मूलभूत हक्क आहे व प्रत्येकाला काम पुरवण्याची जबाबदारी समाजवादी शासनाने घ्यावी, असे आपणास वाटते काय?

२१. खुल्या बाजारापेक्षा अधिक संवेदनक्षम व कार्यक्षम व जलद अशी मागणी व पुरवठा यांचे संतुलन साधणारी यंत्रणा समाजवादी व्यवस्थेत आहे?

२२. सहकारी संस्था त्यांच्या अंतर्गत सामर्थ्याने खाजगी संस्थांशी स्पर्धा करुन उभ्या रहाव्या, वाढाव्या असे आपल्याला वाटते, का त्यांना शासकीय सहाय्याचे टेकू लावणे आवश्यक आहे असे आपल्याला वाटते?

२३. ज्या देशातील जनतेची व त्यामुळे राज्यकर्त्यांची व नोकरदारांची, नैतिक पातळी अत्यंत खालावलेली आहे, त्या देशांत सरकारचा अर्थव्यवहारातील भाग कमीत कमी असणे निर्धोक की जास्तीत जास्त असणे अधिक निर्धोक (Safe)?

२४. खाजगी क्षेत्रातील आरक्षण ठेवण्याच्या सूचनेविषयी आपले काय मत आहे?

२५. सरकारी नोकरांना संप करण्याचा अधिकार नाही हे त्यांच्या सेवाशर्तीतच आहे. असे असतानाही शर्ती मोडून संप करण्याचे त्यांना 'मूलभूत स्वातंत्र्य' असावे असे आपणाला वाटते का?

२६. बंद पुकारणे सामूहिक मागणी - कलेक्टिव बार्गेनिंग- साठी आवश्यक वा रास्त वाटते का?

२७. केरळ उच्च न्यायालयाने बंद पुकारण्याला प्रतिबंध करणारा निर्णय दिला व तो योग्य असल्याचा १९९८ मध्ये सर्वोच्च न्यायालयाने निर्णय दिला. त्यानंतरही बंद पुकारले गेले व बंद पुकारणाऱ्यांवर कारवाई झाली नाही. न्यायालयाचे निर्णय धुडकावून देण्याने लोकशाही क्षीण होते असे आपले मत आहे का?

२८. बँका, आयुर्विमा, शिक्षणसंस्था या सार्वजनिक उपयोगाच्या संस्थातील नोकरदारांनी आपल्या मागण्यासाठी संपावर जाणे एकवेळ मान्य केले तरी त्यांनी सार्वत्रिक बंद पुकारणे समर्थनीय ठरते असे आपले मत आहे का?

२९. कोणत्याही कारणांनी - महत्त्वाच्या, बिनमहत्त्वाच्या- सर्वच पक्ष बंद पुकारतात व तो बहुतेक वेळा जबरदस्तीने पाळायला लावला जातो असे चित्र दिसते. याबाबत आपले काय मत आहे?

३०. बंद, संप, 'नियमानुसार काम' (खरे म्हणजे हे काम न करणेच असते), इत्यादी शिवाय नोकरदारांना, कामगारांना न्याय मिळेल अशी परिणामकारक अन्य व्यवस्थेचा पर्याय आपण सुचवू शकाल का?



नसता, फुलांचं शब्दांनी रसाळ वर्णन केलं तर ते खरं ठरेल का? आंबा न पाहता, न चाखता आंब्याचं कितीही तर्कसंगत वर्णन केलं तरी त्यात खऱ्या आंब्याची चव, स्वाद, सौंदर्य अनुभवता येतं का? अन्न-अन्न म्हणून हजारवेळा घोकलं तर भुकेचं शमन होईल का? मला सांगा, तुम्ही रोज काही वेळ गाढ झोपा, झोपताना मी कधी झोप घेतली नसेल तर झोप कशी असते ते तुम्हाला मी सांगू शकेन का? तुम्ही प्रत्यक्ष गाढ झोपा. त्यानंतर ती कशी ते कळेल. तेच मी तुम्हाला सांगतो. इथे मौन अवस्थेत तुम्ही दोन वर्षं माझ्याजवळ रहा. मग तुमच्या सर्व शंकांची उत्तरं मी अवश्य देईन.'

तिथे बसलेला बुद्धाचा एक पूर्णप्रज्ञ शिष्य सारीपुत्र बुद्धाचं ते म्हणणं ऐकून जोरात हसू लागला. मोग्गलायनने त्याला त्याच्या हसण्याचं कारण विचारलं. तो हसत म्हणाला, 'या माणसाच्या या बोलण्यावर विश्वास ठेवू नका. तो महाधूर्त आहे. तुम्हाला नक्कीच फसवील.' मोग्गलायन त्याच्याकडे आश्चर्याने पाहू लागला. सारापुत्र म्हणाला, 'असं माझ्याकडे पाहू नका. मी खरं तेच सांगतो आहे. दोन वर्षांपूर्वी मी असाच फसून मौनावस्थेत गेलो. प्रत्यक्षानुभूती शून्यावस्थेत गेलो.

चोवीस तास मी त्याच अवस्थेत असतो. बोलतो, चालतो, बसतो, खातो-पितो सगळं करतो पण फक्त शरीरच ते सवयीनं करीत असतं. माझी ती उन्मनी अवस्था कधीच मला सोडून जात नाही. सत्याची प्रत्यक्षानुभूती आल्यावर सत्य म्हणजे काय हा प्रश्न उरतोच कुठे? आंबा प्रत्यक्ष चाखल्यावर आंबा कसा असतो हे विचारायचं कशाला? जे माहीत नाही ते विचारावं लागतं. पण जे आपल्याला नीट ठाऊकच आहे, त्याबद्दल आपण कधी विचारत बसत नाही. तसं दोन वर्षातील बुद्धाच्या सान्निध्यातील मानानं त्या सत्याची, त्या शून्यावस्थेची अनुभूती तुला आल्यावर, प्रश्न कुठे शिल्लक राहतील? तेव्हा विचारायचं असेल तर आताच विचार, आता तुला बोलता येते आहे, तर्क करता येतो आहे, ग्रंथांचे आधार आठवत आहेत. बुद्धांच्या सहवासात तुझ्या वासनेच्या साऱ्या गाठी-ग्रंथी विरघळून गेल्यावर तुझा 'मी'च उरणार नाही. मग प्रश्न कुठला?'

❖❖❖

अनुक्रमणिका

आपल्या ग्रंथालयात अवश्य हवीत अशी

## प्राज्ञपाठशाळा मंडळ ग्रंथमालेची

संग्राह्य वैचारिक मराठी प्रकाशने

| | सुधारित किंमत २० नोव्हेंबर २००६ पासून लागू |
|---|---|
| ❑ वैदिक संस्कृतीचा विकास (तिसरी आवृत्ती) । तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी | ३०० रु. |
| ❑ अद्वैतसिद्धीचे मराठी भाषांतर (पूर्वार्ध) । ब्र. स्वामी केवलानंद सरस्वती | २०० रु. |
| ❑ पुरोहितवर्गवर्चस्व व भारताचा सामाजिक इतिहास । डॉ. सुमंत मुरंजन | १२० रु. |
| ❑ हिंदी साहित्यविचार । प्रा. प्यारेलाल गोहेल | २५ रु. |
| ❑ श्री. यशवंतराव चव्हाण अभिनंदन ग्रंथ | ६० रु. |
| ❑ संशोधन साधना । डॉ. वसंत स. जोशी | ६० रु. |
| ❑ तरंगयामिक व पुंजयामिक । मा. ग. टोळे | २० रु. |
| ❑ आर्यांच्या सणांचा प्राचीन व अर्वाचीन इतिहास । ऋग्वेदी | १५० रु. |
| ❑ वागीश्वरी । डॉ. गो. के. भट | ६० रु. |
| ❑ प्रस्थानभेद (प्राचीन १४ विद्यांची माहिती) पुनर्मुद्रण । गं. वा. लेले | ५० रु. |
| ❑ गिर्यारोहण परिचय । अच्युत खोडवे | ४० रु. |
| ❑ इतिहासाचे तत्त्वज्ञान (दुसरी आवृत्ती) । सदाशिव आठवले | १३० रु. |
| ❑ दासशूद्रांची गुलामगिरी (भाग २) । शरद पाटील | १५० रु. |
| ❑ शाहीर हैवती । डॉ. शिवाजीराव चव्हाण | ४० रु. |
| ❑ गीताचिकित्सा । भाऊ धर्माधिकारी | १४० रु. |
| ❑ तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी (चरित्र) । सौ. मालती देशपांडे | २५ रु. |
| ❑ बौद्ध धर्माचा अभ्युदय आणि प्रसार । प. ल. वैद्य | ५० रु. |
| ❑ हिंदू धार्मिक परंपरा आणि सामाजिक परिवर्तन (संवर्धित दुसरी आवृत्ती) । मे. पुं. रेगे | १६० रु. |
| ❑ पाच पुस्तक-परीक्षणे । वा. म. कुलकर्णी | ६० रु. |
| ❑ भेदविलोपन : एक आकलन । अशोक केळकर | ३० रु. |
| ❑ कॉलिंगवुडची कलामीमांसा - एक भाष्य । रा. भा. पाटणकर | १०० रु. |
| ❑ धर्मश्रद्धा : एक पुनर्विचार । दि.के. वेडेकर | ३० रु. |
| ❑ आचार्य शं. द. जावडेकर : व्यक्तित्त्व आणि विचार | १०० रु. |
| ❑ तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, कार्य आणि विचार | १५० रु. |
| ❑ इहवाद आणि सर्वधर्मसमभाव । मे. पुं. रेगे | १२० रु. |
| ❑ प्राज्ञपाठशाळा आणि तिची परंपरा | २०० रु. |
| ❑ चार्वाक : इतिहास आणि तत्त्वज्ञान (तृतीयावृत्ती) । सदाशिव आठवले | १०० रु. |
| ❑ विनोबांची संस्कृत साम्यसूत्रे (रसग्रहणात्मक मराठी अनुवाद) । वसंत नारगोलकर | १२० रु. |
| ❑ नागरी समाज, राज्यसंस्था आणि लोकतंत्र : भारतीय संदर्भात विवेचन । द.ना. धनागरे | ४० रु. |
| ❑ प्राचीन भारत : समाज आणि संस्कृती (निवडक मौलिक लेखांचा संग्रह) । डॉ. म. अ. मेहेंदळे | ५५० रु. |
| ❑ हिंदुधर्माची समीक्षा आणि सर्वधर्मसमीक्षा (दुसरी आवृत्ती) । तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी | २२५ रु. |
| ❑ पाश्चात्त्य नीतिशास्त्राचा इतिहास (दुसरी आवृत्ती) । प्रा. मे. पुं. रेगे | १६० रु. |

१) ग्रंथालये व संस्थांना किंमतीत १० टक्के सूट. पोस्टेजचा खर्च वेगळा पडेल. २) व्ही.पी. ची पद्धत नाही.
३) पैसे मनिऑर्डरने वा ड्राफ्टने पाठवावेत.

संपर्कासाठी पत्ता : चिटणीस, प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५ गंगापुरी, वाई ४१२८०३ (जि. सातारा)

हे मासिक घ.वा. जोशी यांनी अक्षरसाहित्य, ३५, गुरुकृपा सो., शाहूनगर, गोडोली, सातारा ४१५००१ येथे छापून सरोजा भाटे यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.







अनुक्रमणिका